# सार्थपंचदशी.

हें पुस्तक

**रा० रा० खंडो कृष्ण उर्फ बाबा गर्दे,**

**अ० डेप्युटी एजुक्याशनल इन्स्पेक्टर विजापूर**

**यांनीं**

मराठींत भाषांतर करून तयार केलें

तें

**रा० रावजी श्रीधर गोंधळेकर**

**यांनीं**

पुणें पेठ शनिवार मेहुणपुरा येथें आपले " जगद्धितेच्छु "
छापखान्यांत छापिलें.




**आवृत्ति २ री.**



**ता० १ माहे जानेवारी सन १९०२**

**मि० मार्गशीर्ष वद्य ७ शके १८२३**

**किंमत ३॥ रुपये.**

# प्रस्तावना



श्लोक.

॥ ज्यामार्जी धृतिपर्वतीं नवविधा भक्ति नद्या वाहती । कामक्रोध पशू विवेक हरिला भांबावूनी राहती
॥ छायाशांति जिथें सुशील बहुत विद्यातरूची पडे । विद्यारण्य खराचि हा मग भवश्रांता न कां आवडे

संस्कृत भाषेंत वेदांतावर पुष्कळ ग्रंथ आहेत. हरंतु पंचदशीसारखा सुबोध, कडीदार व सर्वमान्य ग्रंथ दुसरा नाहीं असें कोणीही अद्वैतवादी कबूल करील. हा ग्रंथ महापंडित विद्यारण्य यांणीं सर्व उपनिषदांचें तात्पर्य काढून मोठ्या चातुर्यानें रचला आहे. परंतु तो संस्कृत भाषेंत असल्यामुळें प्राकृत मुमुक्षुजनांस त्याचा रस घेण्यास मार्गच नव्हता. तो मार्ग खुला करण्याच्या उद्देशानें कोणी एका विद्वान गृहस्थानें या सुप्रसिद्ध ग्रंथावर मराठी भाषेंत टीका केली, परंतु ती टीका मूळ संस्कृत टीकेचें केवळ शब्दशः भाषांतर असल्यामुळें व ग्रंथकाराची मराठी भाषा थोडीशी पौराणिक तऱ्हेवर असल्यामुळें त्यापासून प्राकृत जनांस उपयोग व्हावा तसा झाला नाहीं असें बहुतेक वाचकांकडून आह्मांस समजलें. ही मुमुक्षूंची अडचण दूर करावी असें माझ्या मनांत बऱ्याच दिवसांपासून वागत होतें. परंतु नोकरीची उपाधि व दुसऱ्या अनेक कारणांनीं ती इच्छा तशीच राहिली. पुढें कांहीं दिवसांनीं ती इच्छा पूर्ण होण्यास अनायासें संधि मिळाली. ती अशी कीं, हा ग्रंथ माझ्या एका मित्रास समजून देत असतां त्याणें आपल्या उपयोगाकरितां दररोज दहा श्लोकांचें भाषांतर मजकडून करून घ्यावें आणि घरीं जाऊन लिहून ठेवावें. असा क्रम त्यानें ग्रंथ संपेपर्यंत चालविला. तें सर्व भाषांतर पाहून वरील अडचण दूर करण्यास हें बरें आहे असें मला वाटलें. परंतु ग्रंथ बराच मोठा असल्यामुळें तो प्रसिद्ध करण्याचें काम तसेंच तहकूब ठेवून या टीकेबरोबरच जन्मलेली आमची दुसरी कन्या गीतपंचदशी हिला आधीं पुढें केली. ती मुमुक्षुजनाचित्तास कितपत प्रिय होते हें पाहून, नंतर हें भाषांतर छापावें असें आमच्या मनांत होतें, त्याप्रमाणें गीतपंचदशीच्या बहुतेक प्रती खपल्यावरून हा ग्रंथ छापण्यास आह्मांस उमेद झाली.

पंचदशींतील प्रमेय सुलभ रीतीनें प्राकृत मुमुक्षूंस समजावा इतकाच या भाषांतराचा उद्देश आहे, ह्मणून प्रत्येक श्लोकाखालीं त्याचें भाषांतर न देतां, वाचकांस सुलभ रीतीनें वाचतां येऊन त्यांतील अर्थ समजावा अशा रीतीनें सुबोध असें निबंधरूपानें भाषांतर केलें आहे. श्लोकार्थ समजून घेणाऱ्याच्या सोयीकरितां ते ते श्लोक खालीं देऊन त्याचें भाषांतर श्लोकांच्या अंकड्यांसहित वर दिलें आहे. तेवढ्यावरून अधिकारी मुमुक्षूंस श्लोकांचा अर्थ सहज ध्यानांत येईल.

आतां या ग्रंथापासून विषयी जनांस मुमुक्षा, मुमुक्षूंस मोक्ष, व मुक्तास आनंद होवो, इतकीच जगन्नियंत्यास प्रार्थना आहे.

# ग्रंथार्पण.

## श्लोक.

विद्यारण्यबुधें सुबोध रचिली वेदोदधी मंथुनी ।
झाली जी भवरोगपीडित जना मात्राचि संजीवनी ॥
ऐशी पंचदशी मुमुक्षुकरितां जी प्राकृतीं आणिली ।
श्रीमन्मातुल रंगनाथचरणीं कृष्णात्मजें अर्पिली ॥ १ ॥

खंडो कृष्ण ऊर्फ बाबा गर्दे.

# सार्थपंचदश्याम्

## तत्त्वविवेकाख्यम्

### प्रथमं प्रकरणम् ।

( मंगलाचरणम् )

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जगत्प्रपंचासहवर्तमान जें मूल अज्ञान तेंच कोणी एक मकर ( सुसर ) तिचा ग्रास करून टाकणें हेंच मुख्य कृत्य ज्याचें असा जो आनंददायक आनंदरूपी परमात्मा गुरु त्याच्या पदकमलाला नमस्कार असो. ॥ १ ॥ त्या श्रीसद्गुरूच्या पदकमलद्वयाची सेवा करून ज्यांचें चित्त निर्मल झालें आहे, अशा पुरुषांना सुलभ रीत्या तत्त्वज्ञान व्हावें ह्मणून आह्मी येथें तत्त्वविवेकाचें निरूपण करितों. ॥ २ ॥ जाग्रदवस्थेमध्यें भासणारे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, हे पांच विषय जरी एकमेकांपासून भिन्न दिसतात, तथापि त्या सर्वांचें ज्ञान ह्मणून एकच आहे. उदाहरण, आह्मास घट दिसतो आणि शब्द ऐकूं येतो. येथें जरी घटापासून शब्द भिन्न आहे, तरी त्या दोहोंचें ज्ञान एकच आहे. ॥ ३ ॥ त्याचप्रमाणें स्वप्नांतील प्रकार—स्वप्न ह्मणजे जागृतीमध्यें जें आह्मांस विषयज्ञान होतें त्याचाच संस्कार ज्या अवस्थेमध्यें पुनः इंद्रियांच्या साहाय्यावांचून उमटतो ती अवस्था. या दोनही अवस्थांमध्यें भेद इतकाच कीं, स्वप्नांतील पदार्थ केवळ भासरूप असून कालांतरीं त्यांचा उपयोग होत नाहीं, आणि जागृतींतील पदार्थ अधिक स्थिर असून कालांतरीं त्यांचा उपयोग होतो. असा जरी भेद आहे तरी त्या अवस्थेंतील ज्ञान ह्मणून एकच आहे. ॥ ४ ॥ वर आह्मी जागृती आणि स्वप्न या दोनही अवस्थांतील ज्ञानांचें ऐक्य सिद्ध केलें. आतां सुषुप्तींतील ज्ञानाविषयीं विचार करूं. कोणी ह्मणेल कीं सुषुप्तींतील ज्ञानच मुळीं नाहीं. तर ही शंका योग्य नाहीं. कारण झोंपेंतून उठलेला मनुष्य असें सांगतो कीं, “ मी इतका वेळ सुखानें निजलों होतों. मला

---

सच्चिदानंदाय नमः ॥ नमः श्रीशंकरानंदगुरुपादांबुजन्मने ॥ सविलासमहामोहग्राहग्रासैककर्मणे ॥ १ ॥ तत्पादांबुरुहद्वंद्वसेवानिर्मलचेतसाम् ॥ सुखबोधाय तत्त्वस्य विवेकोऽयं विधियते ॥२॥ शब्दस्पर्शादयो वेद्या वैचित्र्याज्जागरे पृथक् ॥ ततो विभक्ता तत्संविदैकरूप्यान्न भिद्यते ॥ ३ ॥ तथा स्वप्नेऽत्र वेद्यं तु न स्थिरं जागरे स्थिरं ॥ तद्भेदोऽतस्तयोः संविदेकरूपा न भिद्यते ॥ ४ ॥ सुप्तोत्थितस्य सौषुप्ततमोबोधो भवेत्स्मृतिः ॥ सा चावबुद्धविषया-

कांहीं समजलें नाहीं " असें जें त्याला स्मरण होतें तें पूर्वीच्या अनुभवावांचून कसें होईल ? जेथें स्मरण आहे, तेथें पूर्वीचा अनुभव असलाच पाहिजे. अमुक स्थळीं अमुक पदार्थ आहे असें समजण्यास जसा डोळा पाहिजे, तसा तो नाहीं असें समजण्यासही डोळाच पाहिजे. त्याप्रमाणें " कांहीं नाहीं " असें समजणें हें देखील ज्ञानच आहे, ह्मणून जागृती व स्वप्न यांप्रमाणें निद्रेंतही अज्ञानाचें ज्ञान आहे ही गोष्ट निर्विवाद सिद्ध झाली. ॥ ५ ॥ " मला कांहीं समजलें नाहीं " असें जें हें सुषुप्तींतील अभावज्ञान तेंही जाग्रत्स्वप्नांतील ज्ञानाप्रमाणें विषयापासून मात्र भिन्न आहे; ज्ञानापासून भिन्न नाहीं. याठिकाणीं कांहीं न समजणें हाच विषय. ह्मणून स्वप्नांतील व जागृतींतील ज्ञानांत जसा भेद नाहीं तसा या उभयावस्थांतील ज्ञानांत व सुषुप्तींतील ज्ञानांतही भेद नाहीं. याप्रमाणें जाग्रत्स्वप्नसुषुप्ती या तीनही अवस्थांमध्यें ज्ञान एकच रूपानें असतें हें सिद्ध झालें. ॥ ६ ॥ एकाच दिवशीं जाग्रत्स्वप्नसुषुप्ती या तीनही अवस्थांतील ज्ञान जसें एकच आहे, त्याप्रमाणें आजपर्यंत गेलेला काळ व पुढें येणारा काळ ह्मणजे दिवस, महिने, वर्षें, युगें व कल्पांचीं कल्पें जरी लोटलीं तरी ज्ञानाचा अभेदच आहे. आतां ज्या अर्थीं सर्वकाळ ज्ञानाचें ऐक्य आहे त्या अर्थीं तें उत्पत्ति–विनाशशून्य व स्वयंप्रकाश असलेंच पाहिजे; कारण यास उत्पत्ति–विनाश आहेत, असें जर ह्मणावें तर त्या उत्पत्ति–विनाशांस पहाणारा कोणी साक्षी असलाच पाहिजे. उत्पत्ति–विनाश ज्याचे त्यास दिसणें अगदीं अशक्य आहे. या साक्षीरूप ज्ञानाचे उत्पत्ति–विनाश दुसऱ्या एका साक्षीरूप ज्ञानास दिसतात असें जर ह्मणावें तर तेंही संभवत नाहीं; कारण या साक्षीवांचून दुसरें ज्ञानच नाहीं. याजवर दुसरी अशी शंका आहे कीं; वरील साक्षीरूप ज्ञानावांचून दुसरें ज्ञानच नाहीं असें ह्मटलें तर त्याला कोणी पहाणारा नसल्यामुळें साक्षीचेंही अस्तित्व नाहींसें होईल; तर याचें उत्तर हेंच कीं, वर सिद्ध केलेलें ज्ञान दुसऱ्या ज्ञानाला विषय न होतां प्रत्यक्ष आहे. घटादिपदार्थांची गोष्ट तशी नाहीं. ते प्रत्यक्ष होण्यास इंद्रियादि ज्ञानसाधनांची गरज आहे. तशी याला गरज नाहीं; हें आपणास आपणच जाणतें असेंही ह्मणतां कामा नये. कारण तसें मानल्यास कर्मकर्तृत्वविरोध होईल. ह्मणजे कर्म आणि कर्ता एकच होईल. ह्मणून हें ज्ञान नित्य असून स्वयंप्रकाश आहे असें कबूल करणें भाग आहे. ॥ ७ ॥ वर सिद्ध केलेलें जें नित्य आणि स्वयंप्रकाश साक्षीज्ञान तेंच आत्मा ह्मणणें योग्य आहे; कारण आत्मा सच्चिदानंदरूप आहे असें श्रुति ह्मणते. हें साक्षीज्ञानही सच्चिदानंदरूपच आहे. तीन रूपांपैकीं पहिलीं दोन तर वर सिद्ध केलींच आहेत. आतां यास आनंदरूपता कशी येते ती सिद्ध करून दाखवितों. जीवाची प्रीति सुखावर साहजिक आहे ह्मणून जेथें ज्या मानानें सुख असतें तेथें त्या मानानें प्रीति असते, या नियमावरून ज्या वस्तूचे ठायीं निःसीम प्रेम आहे, ती वस्तु परमानंदरूप असलीच पाहिजे. आतां आत्म्यावर आमची निरतिशय प्रीति आहे ह्मणून आत्मा प-

---

वबुद्धं तत्तदा तमः ॥ ५ ॥ स बोधो विषयाद्भिन्नो न बोधात्स्वप्नबोधवत् ॥ एवं स्थानत्रयेऽप्येका संवित्तद्वद्दिनांतरे ॥ ६ ॥ मासाब्दयुगकल्पेषु गतागम्येष्वनेकधा ॥ नोदेति नास्तमेत्येका संविदेषा स्वयंप्रभा ॥ ७ ॥ इयमात्मा परानंदः परप्रेमास्पदं यतः ॥

रमानंदरूप आहे, ही गोष्ट सिद्ध आहे. आतां कोणी अशी शंका घेईल कीं, "मला मरण येवो, मी व्यर्थ जन्मलों." असा केव्हां केव्हां आपल्याविषयींचा कंटाळा आढळतो. मग आत्मा निःसीम प्रीतीस विषय आहे असें कसें ह्मणतां? कारण यावरून आत्म्याविषयींचे प्रीतीसच मुळीं व्यत्यय येतो. मग ती निःसीम आहे ही गोष्ट तर दूरच. या शंकेचें समाधान असें कीं, वरील प्रकारें आत्म्याविषयींचा जो द्वेष केव्हां केव्हां आढळतो, तो केवळ देहाच्या संबंधानें आहे. आत्म्याच्या संबंधानें नव्हे. मनुष्यावर कांहीं वाईट प्रसंग गुदरला ह्मणजे हा देह नको, प्राण नको, कांहीं नको, दे माय धरणी ठाय, अशी मनुष्याची स्थिति होते, तीही आत्मसुखाकरितांच होते. ॥ ८ ॥ पुत्रादिकांवर जी आह्मी प्रीति करितों ती केवळ आत्मसुखाकरितां, व आपल्यावर जी करितों ती प्रीति दुसऱ्याकरितां कधींही नसते. ह्मणून आत्मा परमानंदरूप आहे ही गोष्ट अगदीं निर्विवाद सिद्ध आहे, ॥ ९ ॥ याप्रमाणें ज्ञानाचें नित्यत्व सिद्ध करून तें ज्ञान सच्चिदानंदरूप असल्यामुळें तेंच आत्मा ठरलें. हें आत्म्याचें सच्चिदानंदरूप केवळ युक्तीनेंच ठरलें, व त्यास श्रुतिप्रमाण नाहीं असें मात्र कोणी समजूं नये. कारण तशाच लक्षणांनीं युक्त परब्रह्म व त्याचें आणि आत्म्याचें ऐक्य वेदांतांत सिद्ध केलें आहे; ह्मणून श्रुति आणि युक्ति या दोहोंच्या कसोटीनें आत्मा सच्चिदानंदरूप आहे हें सिद्ध झालें. ॥१०॥ या आत्म्याची परमानंदरूपता अशी आहे कीं, एकीकडून पाहिलें असतां तिची प्रतीति आहे, आणि दुसरीकडून पाहिलें असतां तिची प्रतीति नाहीं; असें नजरेस येतें. त्या आनंदाचें भान नाहीं ह्मणावें तर मनुष्याची प्रीति स्वतःवर निःसीम आहे. कारण, विषयसौंदर्यज्ञान जाहल्यावांचून प्रीति उत्पन्नच होत नाहीं. बरें त्याचें भान मनुष्यास आहे ह्मणावें तर त्याची विषयांवर इतकी कां आसक्ति असावी? फलप्राप्ति जाहल्यावर साधनास कोण विचारितो. निरतिशय आनंदाचा लाभ जाहला असतां क्षणिक आणि साधनावर अवलंबून असणारें जें वैषयिक सुख त्याजवर मनुष्याचें मन जाईल काय? परंतु विषयावर आमची आसक्ति फारच आहे, तेव्हां त्या आनंदाचें भान आहे असेंही ह्मणतां येत नाहीं. याप्रमाणें दोन्हीकडून दोष येतात. ह्मणून भान आणि अभान हीं दोन्ही रूपें आत्म्यास आहेत ह्मणणें भाग आलें. ॥ ११ ॥ पण तसें जर ह्मणावें, तर एकाच वस्तूस एकदम भान आणि अभान कसें संभवेल असा एक प्रश्न उत्पन्न होतो. तर याजवर आह्मी असें पुसतों कीं, तुह्मी जो असंभव मानितां त्यास दोन कारणें असलीं पाहिजेत. एक—कोणीही अशी गोष्ट जगामध्यें पाहिली नसावी. दुसरें—तिजविषयीं कोणचीही उपपत्ति जुळूं नये. हीं दोन्ही येथें संभवत नाहीत. अशा गोष्टी जगामध्यें द-

---

मा न भूवं हि भूयासमिति प्रेमात्मनीक्ष्यते ॥ ८ ॥ तत्प्रेमात्मार्थमन्यत्र नैवमन्यार्थमात्मनि ॥ अतस्तत्परमं तेन परमानंदतात्मनः ॥ ९ ॥ इत्थं सच्चित्परानंद आत्मा युक्त्या तथाविधम् ॥ परं ब्रह्म तयोश्चैक्यं श्रुत्यंतेषूपदिश्यते ॥ १० ॥ अभाने न परं प्रेम भाने न विषये स्पृहा ॥ अतो भानेप्यभातासौ परमानंदतात्मनः ॥ ११ ॥ अध्येतृवर्गमध्यस्थपुत्राध्ययनशब्दवत् ॥ भानेऽ-

ष्टीस पडतात हें पुढील दृष्टांतावरून चांगलें ध्यानांत येईल. कल्पना करा कीं, कोणी एका गृहस्थाचा मुलगा वेदशाळेंत अध्ययन करीत आहे. एके दिवशीं आपल्या वर्गातील मुलाबरोबर पंचिकेची तो आवृत्ति उच्च स्वरानें करीत असतां शाळेबाहेरच्या पडवींत त्याचा बाप येऊन ऐकत उभा राहिला. त्यास हा माझ्या मुलाचा स्वर आहे असें विशेषेंकरून सांगतां जरी न आलें, तथापि त्या सर्व घोषांत आपल्या मुलाचा स्वर खचित आहे असें सामान्यत्वेंकरून त्यास समजतें. त्याप्रमाणें आत्मानंदाचें भान आहे असें ह्मणण्यास प्रत्यवाय कोणता ? याविषयीं उपपत्तीही तशीच जुळते. वस्तूचें भान असून अभान जें होतें तें केवळ प्रतिबंधानें होतें. ॥ १२॥ प्रतिबंध ह्मणजे आहे व भासतें अशा व्यवहारास ज्या योग्य वस्तु त्यांच्याठायीं वरील आहे व भासतें याच्या विरुद्ध, नाहीं, व भासत नाहीं; अशा व्यवहाराची जी उत्पत्ति तीच येथें प्रतिबंध असें समजावें. ॥ १३ ॥ आतां हा प्रतिबंध वरील दृष्टांतावरून कसा जुळतो तो पहा. दृष्टांतांत पुत्रध्वनि विशेषेंकरून ध्यानांत न येण्यास कारण समानाभिहार ( सर्वांबरोबर सारख्या स्वरानें पठन करणें ) हेंच होय. त्याप्रमाणेंच आत्मा नित्य प्रतीतीस येण्यास येथें मुख्य प्रतिबंध ह्मटला ह्मणजे अविद्या होय. विपरीत ज्ञानास तीच कारण होय. ॥ १४ ॥ आतां ती अविद्या कोणची याचा विचार करूं. परंतु तिचें स्वरूप सांगण्यापूर्वी तिचें मूळ जी प्रकृति ती प्रथम सांगतों. जिच्यामध्यें सच्चिदानंद ब्रह्माचें प्रतिबिंब आहे व जीमध्यें सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण सारख्या मानानें आहेत तिला प्रकृति असें ह्मणतात. ॥ १५ ॥ तिचे दोन प्रकार आहेत. जीमध्यें शुद्ध सत्त्वगुण अधिक असून इतर दोन गुणांनीं तो गढूळ जाहलेला नसतो; तिला माया असें ह्मणतात. व जीमध्यें तो गुण इतर दोन गुणांनीं गढूळ जाहलेला असतो तिला अविद्या असें ह्मणतात. पहिली शुद्धसत्त्वप्रधान आहे. पहिली जी माया सांगितली तिजमध्यें प्रतिबिंबित जो चैतन्य आत्मा त्याणें त्या मायेस आपले स्वाधीन ठेविलें आहे. तोच सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् ईश्वर होय. ॥ १६ ॥ आणि अविद्येमध्यें प्रतिबिंबित जो चिदात्मा तोच जीव. तो परतंत्र आहे. ती अविद्या नानाप्रकारची असल्यामुळें तिजमध्यें प्रतिबिंबित जो जीव तोही देव, मनुष्य, पशु, पक्षी या भेदेंकरून नानाप्रकारचा जाहला आहे. या जीवास स्थूल, सूक्ष्म आणि कारण हीं तीन शरीरें आहेत. वर सांगितलेली जी अविद्या तीच याचें कारणशरीर आहे; आणि त्या कारणशरीरास तादात्म्याध्यासेंकरून " मी " ह्मणणारा जो जीव

---

प्यभानं भानस्य प्रतिबंधेन युज्यते ॥ १२ ॥ प्रतिबंधोऽस्तिभातीतिव्यवहारार्हवस्तुनि ॥ तन्निरस्य विरुद्धस्य तस्योत्पादनमुच्यते ॥ १३ ॥ तस्य हेतुः समानाभिहारः पुत्रध्वनिश्रुतौ ॥ इहानादिरविद्यैव व्यामोहैकनिबंधनम् ॥ १४ ॥ चिदानंदमयब्रह्मप्रतिबिंबसमन्विता ॥ तमोरजःसत्वगुणा प्रकृतिर्द्विविधा च सा ॥१५॥ सत्त्वशुद्ध्यविशुद्धिभ्यां मायाविद्ये च ते मते ॥ मायाबिंबोवशीकृत्य तां स्यात्सर्वज्ञ ईश्वरः ॥ १६ ॥ अविद्यावशगस्त्वन्यस्तद्वैचित्र्यादनेकधा ॥ सा कारणशरीरं स्यात् प्राज्ञस्तत्राभिमानवा-

त्यास प्राज्ञ असें ह्मणतात. ॥ १७ ॥ आतां सूक्ष्म शरीर कोणतें, व त्याचा अभिमानी कोण, हें आह्मी सांगतों. परंतु हें शरीर कसें बनलें हें सांगण्यास त्यास कारणीभूत जी आकाशादि सृष्टि ती आधीं सांगितली पाहिजे. ह्मणून ती येथें सांगतों. वर जो कारणशरीराभिमानी प्राज्ञ सांगितला, त्यास सुखदुःखाचा भोग व्हावा ह्मणून पूर्वोक्त तमःप्रधानप्रकृतीपासून ईश्वराच्या आज्ञेनें ह्मणजे इच्छेनें आकाश, वायु, तेज, आप आणि पृथ्वी अशीं पंचभूतें क्रमेंकरून एकापासून एक अशीं उत्पन्न झालीं. ॥ १८ ॥ मूळप्रकृति त्रिगुणात्मक आहे. तेव्हां तिजपासून उत्पन्न जाहलेलीं जीं पंचभूतें तींही त्रिगुणात्मकच असलीं पाहिजेत; ह्मणजे, प्रत्येकांत कांहीं अंश सत्त्वाचा, कांहीं रजाचा आणि कांहीं तमाचा असे तिन्ही अंश असले पाहिजेत. त्या प्रत्येक भूताच्या सत्त्वांशांनीं क्रमेंकरून श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण, अशीं पांच ज्ञानेंद्रियें बनलीं, ह्मणजे आकाशाच्या सत्त्वांशानें श्रोत्र, आपाच्या सत्त्वांशानें रसना, वायूच्या सत्त्वांशानें त्वचा, अग्नीच्या सत्त्वांशानें नेत्र आणि पृथ्वीच्या सत्त्वांशानें घ्राणेंद्रिय झालें, असें समजावें. ॥ १९ ॥ प्रत्येक भूताच्या सत्त्वांशानें एक एक इंद्रिय बनलें. त्याप्रमाणें सर्वांचे सत्त्वांश एकत्र मिळून त्या मिश्रणापासून अंतःकरण बनलें. या अंतःकरणाचीं रूपें वृत्तिरूपानें दोन आहेत. याची वृत्ति जेव्हां संशयात्मक असते, तेव्हां त्यास मन असें ह्मणतात. जेव्हां ती निश्चयात्मक असते तेव्हां त्यास बुद्धि असें ह्मणतात. ॥ २० ॥ पंचभूतांच्या सत्त्वांशांनीं जशीं ज्ञानेंद्रियें बनलीं. तशींच आकाशापासून पृथ्वीपर्यंत प्रत्येक भूतांच्या रजोंशापासून क्रमानें वाणी, हस्त, पाद, गुद आणि उपस्थ हीं कर्मेंद्रियें बनलीं.॥२१॥ आणि सर्वांच्या सत्त्वांशाच्या मिश्रणानें जसें अंतःकरण बनलें तसाच सर्वांच्या रजोगुणांशाच्या मिश्रणानें प्राण बनला. या प्राणाचेही पुनः स्थानभेदेंकरून पांच प्रकार झाले; ते हे;— प्राण, अपान, व्यान, उदान, आणि समान. ॥ २२ ॥ याप्रमाणें पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पंच प्राण, मन आणि बुद्धि हीं सत्रा मिळून एक सूक्ष्म शरीर झालें आहे. यालाच वेदांती लिंगशरीर असें ह्मणतात. ॥ २३ ॥ पूर्वीं सांगितलेला जो प्राज्ञ तो जेव्हां या लिंगशरीरास मी मी असें ह्मणतो, तेव्हां त्यासच तैजस असें नांव प्राप्त होतें. यास तैजस ह्मणण्याचें

---

न् ॥ १७ ॥ तमः प्रधानप्रकृतेस्तद्भोगायेश्वराज्ञया ॥ वियत्पवनतेजोंबुभुवो भूतानि जज्ञिरे ॥ १८ ॥ सत्त्वांशैः पंचभिस्तेषां क्रमाद्धींद्रियपंचकम् ॥ श्रोत्रत्वगक्षिरसनघ्राणाख्यमुपजायते ॥ १९ ॥ तैरंतःकरणं सर्वैर्वृत्तिभेदेन तद्द्विधा ॥ मनोविमर्शरूपं स्याद्बुद्धिः स्यान्निश्चयात्मिका ॥ २० ॥ रजोंऽशैः पंचभिस्तेषां क्रमात्कर्मेंद्रियाणि तु ॥ वाक्पाणिपादपायूपस्थाभिधानानि जज्ञिरे ॥२१॥ तैः सर्वैः सहितैः प्राणो वृत्तिभेदात्स पंचधा ॥ प्राणोऽपानः समानश्चोदानव्यानौ च ते पुनः ॥२२॥ बुद्धिकर्मेंद्रियप्राणपंचकैर्मनसा धिया ॥ शरीरं सप्तदशभिः सूक्ष्मं तल्लिंगमुच्यते ॥२३॥ प्राज्ञस्तत्राभि-

कारण हेंच कीं, अंतःकरण स्वतः तेजोमय आहे. तें अंतःकरण या शरीरामध्यें मुख्य असल्यामुळें त्याच्या अभिमानी जीवास तैजस हें नांव दिलें. पूर्वोक्त जो मायाप्रतिबिंबित ईश्वर तो जेव्हां अशा शरीराचा अभिमानी होतो, तेव्हां त्यास हिरण्यगर्भ असें ह्मणतात. तैजस आणि हिरण्यगर्भ या दोहोंमधील भेद इतकाच कीं, तैजस हा व्यष्टिरूप आहे, आणि हिरण्यगर्भ समष्टिरूप आहे. ॥ २४ ॥ सर्व लिंगशरीराचा अभिमान ईश्वरास असल्यामुळें तो समष्टिरूप आहे. आणि जिवास केवळ एकाच व्यक्तीचा अभिमान असल्यामुळें तो व्यष्टि (व्यक्ति) होय. ॥ २५ ॥ याप्रमाणें लिंगशरीर व त्याचे अभिमानी तैजस आणि हिरण्यगर्भ क्रमेंकरून सांगितले. आतां स्थूलशरीराचा विचार करूं. सूक्ष्म पंचभूतांपासून जसें सूक्ष्म शरीर झालें, तसें स्थूळ पंचभूतांपासून स्थूळ शरीर झालें. सूक्ष्मापासून स्थूळ होण्याचा जो प्रकार त्यास वेदांतांत पंचीकरण अशी संज्ञा आहे. जीवांना सुखदुःखाचा भोग व्हावा, ह्मणून भोग्य ह्मणजे विषय व भोगायतन ह्मणजे शरीरें हीं परमेश्वरानें पंचीकरणाचे योगानें उत्पन्न केलीं. ॥ २६ ॥ पंचीकरण ह्मणजे सूक्ष्म किंवा शुद्ध पंचभूतांपैकीं प्रत्येक भूतांत, इतर चार भूतांचे कांहीं नियमित अंश घालून तयार झालेलें मिश्रण. यांचा प्रकार असा.—पहिल्यानें प्रत्येक भूताचे बरोबर दोन दोन विभाग केले. त्या दोन दोन भागांपैकीं एक एक तसाच ठेवून, बाकी प्रत्येक अर्ध्या भागाचे पुनः चार चार समभाग पाडले; तेव्हां अर्थातच हा एक भाग एक अष्टमांश झाला. मग प्रत्येक भूताच्या अर्ध्या भागांत दुसऱ्या प्रत्येक अर्धुकाचा चौथा भाग ह्मणजे पूर्वोक्त एक अष्टमांश मिसळून पांचा पांचांचें असें प्रत्येक भूत तयार केलें. यालाच पंचीकरण असें ह्मणतात. हें खालीं लिहिलेल्या कोष्टकावरून स्पष्ट ध्यानांत येईल. ॥ २७ ॥

(सूक्ष्मभूतें.) ( **पंचीकरणाचें कोष्टक.** ) (स्थूलभूतें.)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १/२ आकाश | १/८ वायु | १/८ तेज | १/८ जल | १/८ पृथ्वी | आकाश |
| १/२ वायु | १/८ आकाश | १/८ तेज | १/८ जल | १/८ पृथ्वी | वायु |
| १/२ तेज | १/८ आकाश | १/८ वायु | १/८ जल | १/८ पृथ्वी | तेज |
| १/२ जल | १/८ आकाश | १/८ वायु | १/८ तेज | १/८ पृथ्वी | जल |
| १/२ पृथ्वी | १/८ आकाश | १/८ वायु | १/८ तेज | १/८ जल | पृथ्वी |

---

मानेन तैजसत्वंप्रपद्यते ॥ हिरण्यगर्भतामीशस्तयोर्व्यष्टिसमष्टिता ॥ २४ ॥ समष्टिरीशः सर्वेषां स्वात्मतादात्म्यवेदनात् ॥ तदभावात्ततोऽन्ये तु कथ्यंते व्यष्टिसंज्ञया ॥ २५ ॥ तद्भोगाय पुनर्भोग्यभोगायतनजन्मने ॥ पंचीकरोति भगवान् प्रत्येकं वियदादिकम् ॥ २६ ॥ द्विधा विधाय चैकैकं चतुर्धा प्रथमं पुनः ॥ स्वस्वेतरद्वितीयांशैर्योजनात् पंचपंच ते ॥ २७ ॥

अशा पंचीकृत भूतांपासून ब्रह्मांडें व त्यांतील चतुर्दश भुवनें व त्या त्या भुवनांतील प्राण्यांनीं खाण्याचीं अन्नें व त्या त्या लोकांस योग्य अशीं शरीरें ईश्वराचे आज्ञेनें निर्माण झालीं. या सर्व स्थूल सृष्टीचा जो एक अभिमानी त्यास वैश्वानर असें ह्मणतात. पूर्वोक्त जो हिरण्यगर्भ तोच येथें वैश्वानर होतो. ॥ २८ ॥ आणि प्रत्येक सूक्ष्म देहाचे निरनिराळे अभिमानी तैजस तेच येथें विश्व होतात. या विश्वकोटींत देव, मनुष्य, पशु व पक्षी या सर्वांचा समावेश होतो. हे सर्व देवादिक जीव बहिर्मुख आहेत. त्यामुळें त्यांना स्वस्वरूपाचें ज्ञान नाहीं. ॥ २९ ॥ ह्मणूनच सुखदुःख भोगण्याकरितां मनुष्यादि शरीरें धारण करून ते जीव त्या त्या शरीरास योग्य अशीं कर्में करितात. आणि देवादि शरीरें धारण करून त्या त्या कर्मांचीं फळें भोगतात. भोगानंतर पुनः कर्म करावेंसें वाटतें, पुनः तें भोगावें लागतें. याप्रमाणें कर्मानंतर भोग व भोगानंतर कर्म असें एक सतत रहाटगाडगें चाललें आहे. नदीच्या भोंवऱ्यांत पडलेल्या कीटकाप्रमाणें, या जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडल्यामुळें जीवास शांति मिळत नाहीं. ॥ ३० ॥ मग ज्याप्रमाणें नदींतील कीटक सुदैवेंकरून एखाद्या दयाळु पुरुषाचे हातून त्या प्रवाहांतून सुटका पावून तीरीं असणाऱ्या वृक्षाचे छायेंत येऊन विश्रांति पावतात. ॥ ३१ ॥ त्याप्रमाणें जीवही ब्रह्मवेत्त्या सत्पुरुषाची गांठ पडून त्याच्या उपदेशानें पंचकोशांचा विवेक करून उत्तम मोक्षसुख पावतात. ॥ ३२ ॥ ते पंचकोश अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय, या नांवानें प्रसिद्ध आहेत. या पांच वेष्टनांत आत्मा गुंडाळलेला असल्यामुळें आपल्या स्वरूपाला विसरून जन्ममरणरूप संसार पावतो. कोशांत सांपडलेला कीटक जसा आंतल्या आंत धडपडतो, त्याप्रमाणें आत्म्याचीही अवस्था झाल्यामुळें वरील अन्नादि आच्छादनांस कोश असें ह्मणतात. ॥ ३३ ॥ आतां त्या कोशांचीं स्वरूपें क्रमेंकरून सांगतों. पंचीकृत भूतांपासून झालेला जो स्थूलदेह त्यासच अन्नमय कोश ह्मणतात. लिंगशरीरीं असलेले जे रजोगुणात्मक पांच प्राण व पांच कर्मेंद्रियें इतकीं मिळून प्राणमय कोश होतो. ॥ ३४ ॥

---

तैरंडस्तत्र भुवनं भोग्यभोगाश्रयोद्भवः ॥ हिरण्यगर्भः स्थूलेऽस्मिन् देहे वैश्वानरो भवेत् ॥२८॥ तैजसा विश्वतां याता देवतिर्यङ्नरादयः ॥ ते पराग्दर्शिनः प्रत्यक्तत्त्वबोधविवर्जिताः ॥ २९ ॥ कुर्वते कर्म भोगाय कर्म कर्तुं च भुंजते ॥ नद्यां कीटा इवावर्तादावर्तांतरमाशु ते ॥ व्रजंतो जन्मनो जन्म लभंते नैव निर्वृतिम् ॥ ३० ॥ सत्कर्मपरिपाकात्ते करुणानिधिनोद्धृताः ॥ प्राप्य तीरतरुच्छायां विश्राम्यंति यथासुखं ॥ ३१ ॥ उपदेशमवाप्यैवमाचार्यात्तत्वदर्शिनः ॥ पंचकोशविवेकेन लभंते निर्वृतिम् पराम् ॥ ३२ ॥ अन्नं प्राणो मनोबुद्धिरानंदश्चेति पंच ते ॥ कोशास्तैरावृतः स्वात्मा विस्मृत्या संसृतिं व्रजेत् ॥ ३३ ॥ स्यात्पंचीकृतभूतोत्थो देहः स्थूलोऽन्नसंज्ञकः ॥ लिंगे तु राजसैः

पंचभूतांच्या सत्त्वांशानें बनलेलें संशयात्मक मन व पांच ज्ञानेंद्रियें मिळून मनोमय कोश समजावा, व त्याच ज्ञानेंद्रियांसहित निश्चयात्मिका जी बुद्धि ती विज्ञानमय कोश. याप्रमाणें प्राणादिक तीनही कोश एका लिंगशरीरांतच मावले गेले. ॥ ३५ ॥ कारण-शरीरांत जो मलिन सत्त्वांश आहे, तोच आनंदमय कोश. याच्या वृत्ति तीन आहेत. प्रिय, मोद आणि प्रमोद. प्रियवृत्ति ह्मणजे—इष्टदर्शनापासून होणारी. मोदवृत्ति ह्मणजे—इष्टवस्तूच्या लाभापासून होणारी; आणि इष्टविषयाच्या भोगापासून उत्पन्न होणारी ती प्रमोदवृत्ति होय. आत्मा त्या त्या कोशाच्या तादात्म्यानें त्या त्या कोशाशीं तन्मय होऊन गेला आहे. ॥ ३६ ॥ याप्रमाणें स्थूल शरीरांत एक, सूक्ष्म शरीरांत तीन आणि कारण शरीरांत एक असे पांच कोश झाले. या पांच कोशांपासून अन्वयव्यतिरेकाचे योगानें आत्म्याचें विवेचन ( पृथक्करण ) करून, तो सच्चिदानंदरूप आहे, असा मनुष्याच्या बुद्धीस निश्चय झाला असतां, तो ब्रह्मच होतो. ॥ ३७ ॥ अन्वयव्यतिरेकाचे योगानें असें जें आह्मीं ह्मटलें त्याचा अर्थ येथें सांगणें अवश्य आहे. अन्वय ह्मणजे एखाद्या गोष्टीचें किंवा स्थितीचें दुसऱ्याबरोबर असणें आणि व्यतिरेक ह्मणजे तिचें नसणें. ‘ अमुक गोष्ट असली तर अमुक असलीच पाहिजे ’ असा जो नियम त्यास अन्वय असें ह्मणतात. आणि ‘ एक नसेल तर दुसरीही असणार नाहीं ’ या नियमास व्यतिरेक असें ह्मणतात. हे दोन नियम लावून पाहिलें असतां दोन गोष्टींचें साहचर्य किंवा कार्यकारणभाव चांगला समजतो. आतां हे नियम आत्मविवेचनास लावून दाखवितों. स्वप्नावस्थेंत स्थूल देह जो अन्नमय कोश याचें मुळींच भान नसून स्वप्न पाहणारा जो साक्षी आत्मा त्याचें भान असतें. ह्मणून येथें स्थूलदेहाचा व्यतिरेक असून आत्म्याचा अन्वय आहे. ह्मणून आत्मा नित्य आणि स्थूल देह अनित्य असें अन्वयव्यतिरेकानें सिद्ध झालें. ॥ ३८ ॥ तसेंच, सुषुप्तीमध्यें लिंगदेहाचें मुळींच भान नाहीं ह्मणून येथें लिंगदेहाचा व्यतिरेक आहे आणि अभावसाक्षित्वेंकरून आत्म्याचें येथेंही स्मरण आहे, ह्मणून त्याचा येथें अन्वय आहे; ह्मणून त्याच नियमावरून आत्मा नित्य आणि लिंगदेह अनित्य असें ठरलें. ॥ ३९ ॥ वर आह्मीं पंचकोशविवेचन करण्याचा उपक्रम करून, अन्नमय कोशाच्या विवेचनानंतर दुसरा जो प्राणमय कोश तो येथें

---

प्राणैः प्राणः कर्मेंद्रियैः सह ॥ ३४ ॥ सात्त्विकैर्धीद्रियैः साकं विमर्शात्मा मनोमयः ॥ तैरेव साकं विज्ञानमयो धीर्निश्चयात्मिका ॥ ३५ ॥ कारणे सत्त्वमानंदमयो मोदादिवृत्तिभिः ॥ तत्तत्कोशैस्तु तादात्म्यादात्मा तत्तन्मयो भवेत् ॥ ३६ ॥ अन्वयव्यतिरेकाभ्यां पंचकोशविवेकतः ॥ स्वात्मानं तत उद्धृत्य परं ब्रह्म प्रपद्यते ॥ ३७ ॥ अभाने स्थूलदेहस्य स्वप्ने यद्भानमात्मनः ॥ सोऽन्वयो व्यतिरेकस्तद्भानेऽन्यानवभासनम् ॥ ३८ ॥ लिंगाभाने सुषुप्तौ स्यादात्मनो भानमन्वयः ॥ व्यतिरेकस्तु तद्भाने लिंगस्याभानमुच्यते ॥ ३९ ॥ तद्विवेकाद्विविक्ताः स्युः

सांगणें योग्य असून मध्येंच लिंगदेह कोठून आणिला, अशी कोणी शंका घेईल, तर तिचें समाधान असें आहे कीं, प्राणमय, मनोमय, आणि विज्ञानमय या तीनही कोशांचा समावेश एका लिंगदेहांतच होतो असें आह्मीं पूर्वींच सांगून ठेविलें आहे, तेव्हां त्या लिंगशरीराचें विवेचन केलें असतां अर्थांतच गुण आणि अवस्थाभेदेंकरून, प्राणादिक तीन कोशांचें विवेचन झाल्यासारिखेंच आहे. ॥ ४० ॥ याप्रमाणें स्थूल व सूक्ष्म या दोन शरीरांच्या विवेचनानें अन्नमयापासून विज्ञानमयापर्यंत चार कोशांचें विवेचन झालें. आतां आनंदमय कोशरूप जें कारणशरीर त्याचे विवेचनाचा विचार करूं. समाधींत सुषुप्तीचें अभान असून आत्म्याचें भान आहे. ह्मणून येथें कारणशरीराचा व्यतिरेक आणि आत्म्याचा अन्वय आहे. याकरितां आत्मा नित्य आणि कारणशरीर ( आनंदमय कोश ) अनित्य असें सिद्ध झालें. ॥ ४१ ॥ ज्याप्रमाणें मुंजा नांवाच्या गवताच्या काडींतून कोमल तंतू युक्तीनें काढावा, त्याप्रमाणें अन्वयव्यतिरेकाच्या योगानें वैराग्यादि साधनसंपन्न पुरुषानें तीनही शरीरांपासून आत्म्याचें पृथक्करण केलें असतां तो ब्रह्मच होतो असें कठश्रुतींत सांगितलें आहे. ॥ ४२ ॥ याप्रमाणें तत्त्वज्ञान ह्मणजे काय? आणि त्यापासून फल कोणतें मिळतें, हें सांगितलें. तसेंच, तत्पदवाच्य परमात्मा आणि त्वंपदवाच्य जीवात्मा या दोघांचें लक्षण एकच असल्यामुळें ते अभिन्न आहेत असेंही सिद्ध झालें. हें दोघांचें ऐक्य, भागत्यागलक्षणावृत्ति लावून, तत्त्वमस्यादि महावाक्याचा अर्थ केला असतां स्पष्टपणें ध्यानांत येईल. ॥ ४३ ॥ " तत्त्वमसि " या वाक्याचा अर्थ करण्याकरितां पूर्वीं तत्पदाचा व त्वंपदाचा वाच्यार्थ केला पाहिजे ह्मणून तो येथें सांगतो. जें ब्रह्म तमोगुणप्रधान मायेचा स्वीकार करून जगाचें विवर्तोपादान कारण झालें, व जें ब्रह्म शुद्धसत्त्वप्रधान मायेचा स्वीकार करून जगाचें निमित्तकारण बनलें तें ब्रह्म येथें तत्पदानें सांगितलें ॥ ४४ ॥ आणि तेंच ब्रह्म जेव्हां मलिनसत्त्वप्रधान ह्मणजे रजस्तममिश्रित व कामकर्मादिकेंकरून दूषित, अशा अविद्येचा स्वीकार करितें तेव्हां तें त्वंपदानें दर्शविलें जातें. ॥ ४५ ॥ तमःप्रधान, विशुद्धसत्त्वप्रधान आणि मलिनसत्त्वप्रधान अशी परस्परविरुद्ध जी तीन प्रकारची माया ती गळून बाकी राहिलेलें अखंड सच्चिदानंद ब्रह्मच " तत्त्वमसि " वाक्याचा वि-

---

कोशाः प्राणमनोधियः ॥ तेहि तत्र गुणावस्थाभेदमात्रात्पृथक्कृताः ॥ ४० ॥ सुषुप्त्यभाने भानं तु समाधावात्मनोऽन्वयः ॥ व्यतिरेकस्त्वात्मभाने सुषुप्त्यनवभासनम् ॥ ४१ ॥ यथा मुंजादिषीकैवमात्मा युक्त्या समुद्धृतः ॥ शरीरत्रितयाद्धीरैः परं ब्रह्मैव जायते ॥ ४२ ॥ परापरात्मनोरेवं युक्त्या संभावितैकता ॥ तत्त्वमस्यादिवाक्यैः सा भागत्यागेन लक्ष्यते ॥ ४३ ॥ जगतो यदुपादानं मायामादाय तामसीम् ॥ निमित्तं शुद्धसत्त्वां तामुच्यते ब्रह्म तद्गिरा ॥ ४४ ॥ यदा मलिनसत्त्वां तां कामकर्मादिदूषिताम् ॥ आदत्ते तत्परं ब्रह्म त्वंपदेन तदोच्यते ॥ ४५ ॥ त्रितयीमपि तां

षय अथवा लक्ष्य होय. ॥४६॥ ज्याप्रमाणें "सोऽयं देवदत्तः" (तोच हा देवदत्त) या वाक्यांत तो आणि हा अशीं भिन्न देशकालदर्शकें टाकून त्या दोन्ही दर्शकांस आश्रयभूत जो एक देवदत्त तो मात्र घ्यावयाचा. ॥ ४७ ॥ त्याप्रमाणें परमात्म्याची उपाधि माया व जीवाची अविद्या असे दोन विरुद्धांश वर्ज्य करून बाकीचें केवळ अखंड सच्चिदानंद ब्रह्म मात्र महावाक्याचें लक्ष्य होतें. ॥४८॥ याजवर प्रतिपक्षाची एक चमत्कारिक कोटी आहे ती अशी. महावाक्यास लक्ष्य जें ब्रह्म तें काय सविकल्प कीं निर्विकल्प? तें सविकल्प जर ह्मणाल तर मिथ्या होईल. कारण, ज्याचा विकल्प करितां येतो ती वस्तु सत्य नव्हे असें तुह्मीच ह्मणतां. बरें तें ब्रह्म निर्विकल्प ह्मणावें तर तें वाक्यास लक्ष्य कसें झालें? कारण, ज्याची कल्पना करितां येत नाहीं ती वस्तु वाक्यानें कशी सांगतां येईल? ॥ ४९ ॥ याप्रमाणें दोहोंकडून अडविणारा जो वादी त्यास आह्मी उलट असें पुसतों कीं, तुह्मीं जो विकल्प केला तो सविकल्पाविषयीं कीं निर्विकल्पाविषयीं? जर निर्विकल्पाविषयीं केला असेल तर तुमच्याच बोलण्यामध्यें विरोध येतो. कारण, निर्विकल्पाचा विकल्प केला असें ह्मणणें ह्मणजे आंधळा पहातो, मुका बोलतो असें ह्मटल्यासारखें होईल. बरें, सविकल्पाचा विकल्प ह्मणाल तर आत्माश्रय, अन्योन्याश्रय, चक्रिकापत्ति आणि अनवस्था असे चार दोष येतात. ते असे कीं, "सविकल्पाचा विकल्प" या वाक्यांत पहिला विकल्प आणि दुसरा विकल्प हे दोन नसून एकच जर असतील, तर आश्रित आणि आश्रय एकच होऊन स्वस्कंधारोहणन्यायानें आत्माश्रय दोष येतो. आतां ते दोनही विकल्प भिन्न असें ह्मटलें तर पहिल्या विकल्पानें दुसऱ्या विकल्पाची सिद्धि होते कीं दुसऱ्यानें पहिल्याची होते. हें सांगतां येत नाहीं. ह्मणून येथें अन्योन्याश्रय दोष येतो. बरें, तो दोष उडविण्याकरितां त्या दोन विकल्पांखेरीज तिसऱ्या एका विकल्पापासून त्याची सिद्धि होते असें जर ह्मणशील तर चक्रिकापत्ति दोष येतो. बरें, तोही उडविण्याकरितां तिसऱ्यास चवथा कारण, चवथ्यास पांचवा, पांचव्याच सहावा असें सांगत बसणें हाच अनवस्था दोष. ॥ ५० ॥ जेथें गुण, क्रिया, जाती, द्रव्य आणि संबंध या पांच गोष्टी आहेत तेथें वरील दोष लागावयाचेच. उदाहरण—गुण निर्गुणीं रहातो कीं सगुणीं रहा-

---

मुक्त्वा परस्परविरोधिनीम् ॥ अखंडं सच्चिदानंदं महावाक्येन लक्ष्यते ॥४६॥ सोऽयमित्यादिवाक्येषु विरोधात्तदिदंतयोः ॥ त्यागेन भागयोरेक आश्रयो लक्ष्यते यथा ॥ ४७ ॥ मायाविद्ये विहायैवमुपाधी परजीवयोः ॥ अखंडं सच्चिदानंदं परं ब्रह्मैव लक्ष्यते ॥ ४८ ॥ सविकल्पस्य लक्ष्यत्वे लक्ष्यस्य स्यादवस्तुता ॥ निर्विकल्पस्य लक्ष्यत्वं न दृष्टं न च संभवि ॥ ४९ ॥ विकल्पो निर्विकल्पस्य सविकल्पस्य वा भवेत् ॥ आद्ये व्याहतिरन्यत्रानवस्थात्माश्रयादयः ॥ ५० ॥ इदं गुणक्रियाजातिद्रव्यसंबंधवस्तुषु ॥ समं तेन स्वरूपस्य सर्वमेतादितीष्यताम् ॥ ५१ ॥

तो ? यांत पहिल्या पक्षीं व्याहतिदोष ह्मणजे विरोध येतो. दुसऱ्या पक्षीं आत्माश्रयादि दोष येतात. त्याचप्रमाणें क्रिया, जाती इत्यादिकांस लावून पहावें. ॥ ५१ ॥ जेथें विकल्पाचाही स्पर्श नाहीं व त्याच्या अभावाचाही स्पर्श नाहीं अशी जीं आत्मवस्तु तिचे ठायीं कल्पितत्व, लक्ष्यत्वसंबंध, द्रव्य इत्यादि कल्पित आहेत. असेनात बापडे ! ! ॥ ५२ ॥ असो. याप्रमाणें वाक्याचा अर्थ करून त्याचें जें अनुसंधान राखणें यालाच श्रवण असें ह्मणतात. व तोच अर्थ साधक व बाधक प्रमाणांनीं मनांत घोळवून त्याचीं उपपत्ति युक्तीनें बसविणें, त्याला मनन असें ह्मणतात. ॥ ५३ ॥ श्रवण आणि मनन या दोहोंच्या योगें निःसंशयपणें जो सिद्धांत ठसला त्याचेठायीं एकसारखें जें चित्ताचें स्थापन, त्याला निदिध्यासन असें म्हणतात. ॥ ५४ ॥ या निदिध्यासाची जी परिपाकदशा तीच समाधि होय. तो समाधि असा. वर जो निदिध्यास सांगितला त्यामध्यें ध्याता, ध्यान आणि ध्येय ही त्रिपुटी भासते. तेथील ध्याता व ध्यान योगाभ्यासानें क्रमानें परित्यागून चित्त जेव्हां केवळ ध्येयरूपच होऊन निर्वातस्थळीं ठेवलेल्या दीपाप्रमाणें निश्चळ रहातें त्यास समाधि असें म्हणतात. ॥ ५५ ॥ या समाधिकाळीं मनाच्या वृत्ति आत्मगोचर असतात, म्हणून लक्षांत येत नाहींत. परंतु त्या अगदीं नाहींत असें समजूं नये. कारण. समाधींतून उठलेला मनुष्य " मी इतका वेळ समाहित होतों " असा आपला अनुभव सांगतों. यावरून समाधिकाळीं वृत्ति असतात असें अनुमान होतें. ॥ ५६ ॥ या आत्मगोचर वृत्ति एकामागून एक अशा आपोआप उठतात. त्यास विशेष प्रयत्नाची गरज नाहीं. कारण पूर्वीचा निदिध्यास वारंवार दृढ होत असल्यामुळें व वृत्तीस आत्मसुखाची एकदां लालूच लागल्यानें ती पुनः पुनः आत्म्यालाच व्यापावयास जाते. ॥ ५७ ॥ " यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता, " इत्यादि श्लोकांनीं भगवंतांनीं अर्जुनास जो निर्विकल्पसमाधी सांगितला त्याचाही अभिप्राय हाच आहे. ॥ ५८ ॥ आतां या समाधीचें प्रथम अवांतर फल सांगून नंतर मुख्य फळ सांगतों. या अनादि संसाराचे ठायीं अनेक जन्मां-

---

विकल्पतदभावाभ्यामसंस्पृष्टात्मवस्तुनि ॥ विकल्पितत्वलक्ष्यत्वसंबंधाद्यास्तु कल्पिताः ॥५२ ॥ इत्थं वाक्यैस्तदर्थानुसंधानं श्रवणं भवेत् ॥ युक्त्या संभावितत्वानुसंधानं मननं तु तत् ॥ ५३ ॥ ताभ्यां निर्विचिकित्सेऽर्थे चेतसः स्थापितस्य यत् ॥ एकतानत्वमेतद्धि निदिध्यासनमुच्यते ॥ ५४ ॥ ध्यातृध्याने परित्यज्य क्रमाध्द्येयैकगोचरम् ॥ निवातदीपवच्चित्तं समाधिरभिधीयते ॥५५॥ वृत्तयस्तु तदानीमज्ञाता अप्यात्मगोचराः ॥ स्मरणादनुमीयंते व्युत्थितस्य समुत्थितात् ॥ ५६ ॥ वृत्तीनामनुवृत्तिस्तु प्रयत्नात्प्रथमादपि ॥ अदृष्टासकृदभ्याससंस्कारसचिवाद्भवेत् ॥ ५७ ॥ यथा दीपो निवातस्थ इत्यादिभिरनेकधा ॥ भगवानिममेवार्थमर्जुनाय न्यरूपयत् ॥ ५८ ॥ अनादाविह संसारे संचिताः कर्मकोटयः ॥

पासून केलेलें अनंत संचित कर्म या समाधीच्या योगानें सर्व नाशाप्रत पावतें, आणि साक्षात्कारास साधनभूत असा शुद्ध धर्म अधिकाधिक वाढतो. ॥ ५९ ॥ या निर्विकल्प समाधीस मोठमोठ्यांनीं धर्ममेघ असें नांव ठेविलें आहे. कारण, या मेघांतून धर्मामृताच्या धारा सहस्रशः वाहतात. ॥ ६० ॥ हें अवांतर फल झालें. आतां मुख्य फळ ऐका. या समाधीचे योगानें "हा मी" हें माझें इत्यादिक ज्या अनेक वासना त्या सर्व जळून जाऊन व ज्ञानाला आड येणारीं पुण्यपापाख्य कर्में त्यांचें उन्मूलन होऊन, ॥ ६१ ॥ पूर्वीं परोक्षत्वेंकरून समजलेलें जें तत्त्वमस्यादि वाक्य तेंच प्रतिबंधरहित तळहातींच्या आंवळ्याप्रमाणें स्पष्टपणें अपरोक्षज्ञान करून देतें. ॥ ६२ ॥ आतां परोक्ष व अपरोक्ष ज्ञानाचें फळ सांगून हें प्रकरण आटपतों. गुरुमुखापासून प्राप्त झालेलें जें महावाक्यजन्य परोक्षज्ञान तें उत्तम रीतीनें झालें असतां बुद्धिपूर्वक केलेलें पाप जळून जातें. हें फळ केवळ श्रद्धाजन्य परोक्षज्ञानाचें नव्हे; तर श्रवणमननापासून झालेलें जें दृढ परोक्षज्ञान त्याचें हें फळ आहे हें पक्कें ध्यानांत ठेवावें. ॥ ६३ ॥ तसेंच, सद्गुरूच्या मुखापासून व त्याच्या कृपेनें प्राप्त झालेलें महावाक्यजन्य संशयविपर्ययरहित असें अपरोक्षज्ञान झालें असतां, सूर्योदयानें जसा काळोख अगदीं नाहींसा होतो, त्याप्रमाणें, संसाराला कारणीभूत जें अज्ञान तें समूळ नष्ट होतें.॥६४॥

॥ आर्या ॥ यापरि तत्त्वविवेका करुनि विधीनें मनासि शांत करी ॥
॥ संसृतिबंधन तुटुनी मोक्षाची तुज मिळेल पदवी खरी ॥ ६५ ॥

तत्त्वविवेक समाप्त.

---

अनेन विलयं यांति शुद्धो धर्मो विवर्धते ॥ ५९ ॥ धर्ममेघमिमं प्राहुः समाधिं योगवित्तमाः ॥ वर्षत्येष यतो धर्मामृतधाराः सहस्रशः ॥ ६० ॥ अमुना वासनाजाले निःशेषं प्रविलापिते ॥ समूलोन्मूलिते पुण्यपापाख्ये कर्मसंचये ॥ ६१ ॥ वाक्यमप्रतिबंद्धं सत्प्राक्परोक्षावभासितं ॥ करामलकवद्बोधमपरोक्षं प्रसुयते ॥ ६२ ॥ परोक्षं ब्रह्मविज्ञानं शाब्दं देशिकपूर्वकम् ॥ बुद्धिपूर्वकृतं पापं कृत्स्नं दहति वन्हिवत् ॥ ६३ ॥ अपरोक्षात्मविज्ञानं शाब्दं देशिकपूर्वकम् ॥ संसारकारणाज्ञानतमसश्चंडभास्करः ॥ ६४ ॥ इत्थं तत्त्वविवेकं विधाय विधिवन्मनः समाधाय ॥ विगलितसंसृतिबंधः प्राप्नोति परं पदं नरो न चिरात् ॥ ६५ ॥

॥ इति तत्त्वविवेकः ॥

# सार्थपंचदश्याम्

## पंचभूतविवेकाख्यम्

### द्वितीयं प्रकरणम् ।

---

जग उत्पन्न होण्याच्या पूर्वी जगास कारणीभूत जें सद्रूप आद्वितीय ब्रह्म श्रुतींत सांगितलें आहे, तें स्वतः वाणीस व मनास अगोचर असल्यामुळें त्याचा साक्षात् बोध होणें अशक्य आहे; याकरितां त्यास उपाधिभूत जीं पंचभूतें त्यांचें विवेचन केलें असतां अधिष्ठानाचा बोध चांगला होईल ह्मणून आह्मी पंचभूतांचें येथें विवेचन करून दाखवितों. ॥ १ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पंचभूतांचे गुण आहेत. यांचा क्रम असा कीं, आकाशाचा गुण केवळ शब्दमात्र; वायूचे शब्द आणि स्पर्श; अग्नीचे शब्द, स्पर्श आणि रूप; आपाचे शब्द, स्पर्श, रूप आणि रस; आणि पृथ्वीचे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध याप्रमाणें समजावे. ॥ २ ॥ आकाशाचा जो गुण शब्द ह्मणून सांगितला तो प्रतिध्वनिरूप समजावा. वायूमधील शब्द सों सों सों असा जो होतो तो समजावा. त्याचा स्पर्श अनुष्ण आणि अशीत असतो. वन्हीचे ठायीं भुक् भुक् असा होणारा ध्वनि, ॥ ३ ॥ ऊष्णस्पर्श आणि प्रभा रूप. जलाचे ठायीं बुल बुल ध्वनि, शीतस्पर्श, शुक्लरूप, आणि माधुर्य रस. ॥ ४ ॥ भूमीचे ठायीं कडकडा शब्द; कठिण स्पर्श, निळें हिरवें इत्यादि रूप, मधुर आम्लादिक रस आणि ॥ ५ ॥ चांगला आणि वाईट असे दोन गंध, याप्रमाणें आकाशापासून पृथ्वीपर्यंत त्या त्या भूतांचे गुण समजावे. आतां या पंचभूतांचीं कार्यें सांगतों. श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा आणि घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें होत ॥ ६ ॥ या इंद्रियांचीं स्थानें कर्णादिक छिद्रें होत; शब्दस्पर्शादिक जे वर सां-

---

अथ पंचभूतविवेकः ॥ सदद्वैतं श्रुतं यत्तत्पंचभूतविवेकतः ॥ बोद्धुं शक्यं ततो भूतपंचकं प्रविविच्यते ॥ १ ॥ शब्दस्पर्शौ रूपरसौ गंधो भूतगुणा इमे ॥ एकद्वित्रिचतुःपंच गुणा व्योमादिषु क्रमात् ॥ २ ॥ प्रतिध्वनिर्वियच्छब्दो वायौ बीसीतिशब्दनम् ॥ अनुष्णाशीतसंस्पर्शो वन्हौ भुगुभुगुध्वनिः ॥ ३ ॥ उष्णः स्पर्शः प्रभारूपं जले बुलुबुलुध्वनिः ॥ शीतः स्पर्शः शुक्लरूपं रसो माधुर्यमीरितं ॥४॥ भूमौ कडकडाशब्दः काठिन्यं स्पर्श इष्यते ॥ नीलादिकं चित्ररूपं मधुराम्लादिको रसः ॥ ५ ॥ सुरभीतरगंधौ द्वौ गुणाः सम्यग्विवेचिताः ॥ श्रोत्रं त्वक्चक्षुषी जिव्हा घ्राणं चेंद्रियपंचकम् ॥ ६ ॥ कर्णादिगोलकस्थं तच्छ-

गितलेले पंचभूतांचे गुण ते या श्रोत्रादिक इंद्रियांचे क्रमेंकरून विषय होत. हीं इंद्रियें अतिशय सूक्ष्म असल्यामुळें त्यांच्या अस्तित्वाचें अनुमान कार्यावरून करावयाचें. हीं बहुतकरून बहिर्मुख आहेत. ॥ ७ ॥ केव्हां केव्हां या इंद्रियांस शरीराच्या आंतील विषयही गोचर होतात. कान झांकले असतां प्राणवायु आणि जठराग्नींतील होणारा शब्द ऐकूं येतो. जलपान व अन्नभक्षण करितांना शरीराच्या आंतील स्पर्श अनुभवास येतात. ॥ ८ ॥ डोळे झांकले असतां आंतील अंधकार दृष्टीस पडतो. आणि ढेंकर दिला असतां रस आणि गंध या दोन्ही विषयांचा अनुभव येतो. ॥ ९ ॥ हें ज्ञानेंद्रियांचें विवेचन झालें. आतां कर्मेंद्रियें सांगतों. बोलणें, देणें-घेणें, चालणें, विसर्जन करणें आणि आनंद या पांच कर्मेंद्रियांच्या क्रिया आहेत. कृषि, वाणिज्य, सेवा इत्यादि कर्मांचा अंतर्भाव या पांच क्रियांतच होतो. ॥ १० ॥ या क्रिया वाचा, पादें, पाणी, पायु, आणि उपस्थ या पांच इंद्रियांपासून क्रमेंकरून उत्पन्न होतात. मुख, कर, चरण, गुद, शिश्न, हीं वागादि कर्मेंद्रियांचीं क्रमेंकरून स्थानें होत. ॥ ११ ॥ मन हें या दहा इंद्रियांचा राजा आहे. हें हृदयकमलांत वास करितें. यासच अंतःकरण असें ह्मणतात. कारण इंद्रियांच्या साहाय्यावांचून बाह्यविषयांवर याला स्वतंत्रतेनें जातां येत नाहीं. ॥ १२ ॥ इंद्रियें विषयांवर गेलीं असतां हें मन गुणदोषांचा विचार करितें. सत्व, रज आणि तम असे मनाचे तीन गुण आहेत. त्यांच्या योगानें हें वारंवार विकार पावतें. ॥ १३ ॥ वैराग्य, ( विषय नकोसे होणें ) क्षमा, औदार्य इत्यादि प्रकार सत्त्वगुणाचे आहेत. काम क्रोध, लोभ, यत्न इत्यादि प्रकार रजोगुणाचे आहेत. ॥ १४ ॥ आळस, भ्रांति, तंद्रा इत्यादि विकार तमोगुणाचे आहेत. सात्त्विक मनोविकारापासून पुण्यनिष्पत्ति होते, राजसापासून पाप-

---

ब्दादिग्राहकं क्रमात् ॥ सौक्ष्म्यात्कार्यानुमेयं तत्प्रायो धावेद्बहिर्मुखम् ॥ ७ ॥ कदाचित् पिहिते कर्णे श्रूयते शब्द आंतरः ॥ प्राणवायौ जाठराग्नौ जलपानेऽन्नभक्षणे ॥ ८ ॥ व्यज्यंते ह्यांतराः स्पर्शा मीलने चांतरं तमः ॥ उद्गारे रसगंधौ चेत्यक्षाणामांतरग्रहः ॥ ९ ॥ पंचोक्त्यादानगमनविसर्गानंदकाः क्रियाः ॥ कृषिवाणिज्यसेवाद्याः पंचस्वंतर्भवंति हि ॥ १० ॥ वाक्पाणिपादपायूपस्थैरक्षैस्तत्क्रियाजनिः ॥ मुखादिगोलकेष्वास्ते तत्कर्मेंद्रियपंचकम् ॥ ११ ॥ मनो दशेंद्रियाध्यक्षं हृत्पद्मगोलके स्थितं ॥ तच्चांतःकरणं बाह्येष्वस्वातंत्र्याद्विनेंद्रियैः ॥ १२ ॥ अक्षेष्वर्थार्पितेष्वेतद्गुणदोषविचारकम् ॥ सत्त्वं रजस्तमश्चास्य गुणा विक्रियते हि तैः ॥ १३ ॥ वैराग्यं क्षांतिरौदार्यमित्याद्याः सत्त्वसंभवाः ॥ कामक्रोधौ लोभयत्नावित्याद्याः रजसोत्थिताः ॥ १४ ॥ आलस्यभ्रांतितंद्राद्या विकारास्तमसोत्थिताः ॥ सात्त्विकैः पुण्य-

निष्पत्ति होते. ॥ १५ ॥ तामसापासून कांहींच न होतां व्यर्थ आयुष्याचा क्षय मात्र होतो. येथें मी मी ह्मणणारा कर्ता असें समजावें. ॥ १६ ॥ प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या शब्दस्पर्शादिक गुणांनीं युक्त असे घटादि पदार्थ पंचभूतांचे बनलेले आहेत, हें उघड आहे. परंतु इंद्रियें देखील पंचभूतांचींच बनलीं आहेत असें कशावरून समजावें? अशी शंका कोणीं घेऊं नये. " अन्नमयं हि सोम्यमनः, " " आपोमयः प्राणः " इत्यादि श्रुतिप्रमाणांवरून व अनुमानावरून त्यांचें भौतिकत्व सिद्ध होतें. ॥ १७ ॥ अकरा इंद्रियांसहित शास्त्र व युक्तीवरून जेवढें ह्मणून जग नजरेस येतें त्याचा बोध " सदेव सोम्येदमग्र आसीत् " या श्रुतींतील ' इदं ' पदानें केला जातो. ॥ १८ ॥ वरील श्रुतीचा अभिप्राय असा कीं, हें सर्व जग सृष्टीपूर्वी कांहीं नसून एकच अद्वितीय सद्रूप होतें; तेव्हां नामरूपें मुळींच नव्हतीं. असें अरुणाचा पुत्र उद्दालक याचें वचन आहे. " एकम्, एव, अद्वितीयं, " या तीन पदांनीं ब्रह्माचे ठायीं येऊं पहाणाऱ्या भेदत्रयाचें निरसन केलें. ते भेद स्वगत, सजातीय आणि विजातीय असे तीन प्रकारचे आहेत. यास उदाहरणार्थ एक वृक्ष घेऊन त्यांत हे तीन भेद कसे होतात तें आह्मी दाखवितों. ॥ १९ ॥ वृक्षाचीं पानें व पुष्पें यांपासून होणारा जो भेद तो स्वगत भेद होय; दोन निरनिराळ्या वृक्षांमधील जो भेद तो सजातीय; आणि दगड, माती आणि वृक्ष यांमधील जो भेद तो विजातीय समजावा. ॥ २० ॥ हे तीन भेद सद्वस्तूचे ठायीं मुळींच संभवत नाहींत असें दाखविण्याकरितां ऐक्य, अवधारणा, आणि द्वैतप्रतिनिषेध. हे तीन अर्थ दाखविणाऱ्या तीन पदांनीं श्रुतीनें वरील भेदत्रयाचें निवारण केलें. ॥ २१ ॥ तें असें कीं, सद्वस्तूला अवयवाची शंका मुळींच नसल्यामुळें स्वगत भेद संभवत नाहीं. नामरूपें त्याचे अंश आहेत असें कोणी ह्मणेल तर सृष्टीपूर्वी त्यांचा उद्भवच नव्हता. ॥ २२ ॥ नामरूपें उद्भवणें यालाच सृष्टि ह्मणतात, ह्मणून सृष्टीच्या पूर्वीं त्या नामरूपांचा उद्भव

---

निष्पत्तिः पापोत्पत्तिश्च राजसैः ॥ १५ ॥ तामसैर्नोभयं किंतु वृथायुःक्षपणं भवेत् ॥ अत्राहंप्रत्ययीकर्तेत्येवं लोकव्यवस्थितिः ॥ ॥ १६॥ स्पष्टशब्दादियुक्तेषु भौतिकत्वमतिस्फुटम् ॥ अक्षादावपि तच्छास्त्रयुक्तिभ्यामवधार्यताम् ॥ १७ ॥ एकादशेंद्रियैर्युक्त्या शास्त्रेणाप्यवगम्यते ॥ यावत्किंचिद्भवेदेतदिदं शब्दोदितं जगत् ॥ १८ ॥ इदं सर्वं पुरा सृष्टेरेकमेवाद्वितीयकम् ॥ सदेवासीन्नामरूपे नास्तामित्यारुणेर्वचः ॥ १९ ॥ वृक्षस्य स्वगतो भेदः पत्रपुष्पफलादिभिः ॥ वृक्षांतरात्सजातीयो विजातीयः शिलादितः ॥ २० ॥ तथा सद्वस्तुनो भेदत्रयं प्राप्तं निवार्यते ॥ ऐक्यावधारणद्वैतप्रतिषेधैस्त्रिभिः क्रमात् ॥ २१ ॥ सतो नावयवाः शंक्यास्तदंशस्यानिरूपणात् ॥ नामरूपे न तस्यांशौ तयोरद्याप्यनुद्भवात् ॥ २२ ॥ नामरूपोद्भवस्यैव सृष्टित्वात्सृष्टितः पुरा ॥ न

मुळींच नव्हता, हें उघड आहे. यास्तव, नामरूप हे सद्वस्तूचे अंश हें संभवत नाहीं. तस्मात् सद्वस्तु निरंश असल्यामुळें स्वगतभेदशून्य आहे हें सिद्ध झालें. ॥ २३ ॥ स्वगतभेदाप्रमाणेंच सजातीयभेदही सद्वस्तूचेठायीं ठरूं शकत नाहीं. कारण सजातीय भेदाला दुसरी एक सद्वस्तु पाहिजे. पण ती तर कोठें दिसत नाहीं. येथें कोणी अशी शंका घेतील कीं, घटसत्ता, पटसत्ता असे सद्वस्तूचे भेद अनेक दृष्टीस पडतात. परंतु हे भेद घटाकाश, मठाकाश इत्यादि आकाशभेदाप्रमाणें केवळ औपाधिक आहेत; वस्तुतः नव्हेत. याकरितां नामरूपसंबंधीं उपाधिभेदावांचून सद्वस्तूस वास्तविक सजातीयभेद नाहीं असें सिद्ध झालें. ॥ २४ ॥ आतां तिसरा विजातीयभेद. तो सद्वस्तूस नाहीं असें सांगण्याची मुळींच जरूर नाहीं. कारण सत्ताला विजातीय काय तें असत्. तें आहे असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. याकरितां यास दुसरे प्रतियोगी नसल्यामुळें विजातीय भेदाचा मुळींच संभव नाहीं. ॥ २५ ॥ याप्रमाणें एकम्, एव आणि अद्वितीय या तीन पदांचा अर्थ झाला. परंतु कित्येक लोक भांबावून या श्रुतीचा अर्थ उलट करितात. ते ह्मणतात कीं, सृष्टीपूर्वी कांहींच नव्हतें. ॥ २६ ॥ ज्याप्रमाणें समुद्रांत बुडालेल्या मनुष्याचे डोळे भांबावून जातात, त्याप्रमाणें या मूढ लोकांची बुद्धि अखंड एकरसाचें श्रवण करून तिला आधार कांहींच न सांपडल्यामुळें भांबावून जाते. ॥ २७ ॥ हा अद्वैतविषयच तसा आहे. सगुण ब्रह्माचें ध्यान करणारे योगी निर्विकल्प समाधींत भांबावून जातात असें गौडापादाचार्यांनींही सांगितलें आहे. ॥ २८ ॥ त्यांच्या वार्तिकांत असें सांगितलें आहे कीं, हा अस्पर्श योगाख्य समाधि सगुण योग्यांना मोठा कठिण जातो. ज्याप्रमाणें निर्जन अरण्यांत मुलें भितात, त्याप्रमाणें निर्विकल्प समाधींत वस्तुतः भय नसूनही योगी घाबरतात. ॥ २९ ॥ हे शुष्कतर्कपटु जे माध्यमिक ते अचिंत्य ब्रह्मस्वरूपीं भांबावून जातात असें आचार्यांनींही ह्मटलें आहे. ॥ ३० ॥ याविषयीं आचार्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, हे तमो-

---

तयोरुद्भवस्तस्मान्निरंशं सद्यथा वियत् ॥ २३ ॥ सदंतरं सजातीयं न वैलक्षण्यवर्जनात् ॥ नामरूपोपाधिभेदं विना नैव सतो भिदा ॥ २४ ॥ विजातीयमसत्तत्तु न खल्वस्तीति गम्यते ॥ नास्यातः प्रतियोगित्वं विजातीयाद्भिदा कुतः ॥ २५ ॥ एकमेवाद्वितीयं सत्सिद्धमत्र तु केचन ॥ विव्हला असदेवेदं पुरासीदित्यवर्णयन् ॥ २६ ॥ मग्नस्याब्धौ यथाऽक्षाणि विव्हलानि तथास्य धीः ॥ अखंडैकरसं श्रुत्वा निःप्रचारा बिभेत्यतः ॥ २७ ॥ गौडाचार्या निर्विकल्पे समाधावन्ययोगिनाम् ॥ साकारब्रह्मनिष्ठानामत्यंतं भयमूचिरे ॥ २८ ॥ अस्पर्शयोगो नामैष दुर्दर्शः सर्वयोगिभिः ॥ योगिनो बिभ्यति ह्यस्मादभये भयदर्शिनः ॥ २९ ॥ भगवत्पूज्यपादाश्च शुष्कतर्कपटूनमून् ॥ आहुर्माध्यमिकान् भ्रांतानचिंत्येऽस्मिन्सदात्मनि ॥ ३० ॥ अनादृत्य श्रुतिं मौर्ख्यादिमे बौद्धास्तम-

गुणी बौद्ध मूर्खपणानें श्रुतीचा अनादर करून केवळ अनुमानाच्या दृष्टीनें शून्यत्व प्रतिपादन करितात. ॥ ३१ ॥ या शून्यवाद्यास आह्मी असें पुसतों कीं, सृष्टीपूर्वीं शून्य होतें असें जें तूं ह्मणतोस तें काय शून्य सद्रूप आहे, कीं तें सत्तेनें युक्त आहे? या दोन्ही गोष्टी शून्यास संभवत नाहींत. ॥ ३२ ॥ सूर्य तमानें युक्तही नाहीं व तमाचा केलेलाही नाहीं. प्रकाशतमाप्रमाणें सत्ता आणि शून्य हीं एकमेकांचीं विरोधी आहेत. तेव्हां शून्य होतें असें कसें ह्मणतां येईल? ॥ ३३ ॥ आतां तूं असें कदाचित् ह्मणशील कीं, सद्रूप ब्रह्माचे ठायीं आकाशादि पंच भूतांला जशीं मायेनें नामरूपें कल्पिलेलीं आहेत. तशीं शून्यालाही कल्पिलीं आहेत. तर तें आह्मांला इष्टच आहे ॥ ३४ ॥ सतालाही नामरूपें कल्पिलीं अशी जर शंका घेशील तर ती मात्र अगदीं बरोबर नाहीं. कारण सताला नामरूपें कल्पिलीं असें तूं ह्मणतोस त्याजवर आह्मी असें विचारितों कीं, तीं नामरूपें कशावर कल्पिलीं, काय सतावर कीं असतावर कीं जगावर? पहिला पक्ष मुळींच संवभत नाहीं. कारण कल्पना जी करावयाची ती एका पदार्थावर दुसऱ्या पदार्थाची केली पाहिजे. ह्मणून सतावर सताचीच कल्पना ह्मणणें योग्य नव्हे. असतावर मुळींच संभवत नाहीं. तिसरा पक्षही तसाच खंडित होतो. कारण सतापासून उत्पन्न झालेलें जग सन्नामरूप कल्पनेस अधिष्ठान कसें होईल? ॥ ३५ ॥ असतच होतें असें ह्मणण्यास जसा व्याहतिदोष येतो, तसा सत् होतें अशा वाक्यांतही एक दोष आमचे प्रतिपक्षी कदाचित् आणतील. तो हा कीं, सत् होतें या दोन शब्दांच्या अर्थामध्यें भेद असेल तर अद्वैतहानी होते. आणि अभेद असेल तर पुनरुक्तीचा दोष येतो. ॥ ३६ ॥ या पूर्वपक्षावर आमचें असें उत्तर आहे कीं, वरील अर्थामध्यें अभेदच घेतला पाहिजे. असा अर्थ केला असतां जो पुनरुक्तीचा दोष तुह्मी आणूं पहातां तो येऊं शकत नाहीं. कारण अशा प्रकारचे प्रयोग लोकरूढींत असून ते दोषास पात्र होत नाहींत. जसें तो कर्तव्य करितो. तो बोलणें बोलतो. धार्याचें धारण असें ह्मणण्याचा परिपाठ आहे. व अशीं वाक्यें ऐकण्याचा ज्यांच्या

---

स्विनः ॥ आपेदिरे निरात्मत्वमनुमानैकचक्षुषः ॥ ३१ ॥ शून्यमासीदिति ब्रूषे सद्योगं वा सदात्मताम् ॥ शून्यस्य न तु तद्युक्तमुभयं व्याहतत्वतः ॥ ३२ ॥ न युक्तस्तमसा सूर्यो नापि चासौ तमोमयः ॥ सच्छून्ययोर्विरोधित्वाच्छून्यमासीत्कथं वद ॥ ३३ ॥ वियदादेर्नामरूपे मायया सुविकल्पिते ॥ शून्यस्य नामरूपे च तथा चेज्जीव्यतां चिरं ॥ ३४ ॥ सतोऽपि नामरूपे द्वे कल्पिते चेत्तदा वद ॥ कुत्रेति निरधिष्ठानो न भ्रमः क्वचिदीक्ष्यते ॥३५॥ सदासीदितिशब्दार्थभेदे वैगुण्यमापतेत् ॥ अभेदे पुनरुक्तिः स्यान्मैवं लोके तथेक्षणात् ॥ ३६ ॥ कर्तव्यं कुरुते वाक्यं ब्रूते धार्यस्य धारणम् ॥ इत्यादिवासनाविष्टं प्रत्यासीत्सदितीरणम् ॥ ३७ ॥

कानांस संस्कार आहे त्यांप्रतच श्रुतीनें हें वाक्य सांगितलें. ॥ ३७ ॥ या वाक्यावर आणखी एक शंका अशी आहे कीं, अद्वितीय सद्रूप ब्रह्माला कालपरिच्छेद मुळींच नसून आसीत् या भूतकालिक क्रियापदाचा प्रयोग कसा केला ? तर याजवर आमचें असें ह्मणणें आहे कीं, ब्रह्माला जरी कालपरिच्छेद नाहीं तरी भूतादि कालाचा संस्कार ज्याच्या मनास झाला आहे अशा शिष्याप्रत श्रुतीनें असें सांगितलें. याजकरितां येथें द्वैताविषयीं अति शंका घेण्याचें कारण नाहीं. ॥ ३८ ॥ शंका घेणें किंवा तिचा परिहार करणें झाल्यास द्वैतभाषेचाच उपयोग केला पाहिजे. अद्वैतभाषेनें शंकाही घेतां येत नाहीं, व तिचा परिहारही करितां येत नाहीं. ॥ ३९ ॥ अद्वैतदशेमध्यें ब्रह्मतत्त्वाचें वर्णन श्रुतीमध्यें असें केलें आहे कीं, तें निश्चळ व गंभीर असून तेथें तेज नाहीं, तेथें तम नाहीं, जें वाणीनें सांगतां येत नाहीं असें कांहीं-एक अनिर्वचनीय अव्यक्त बाकी रहातें तें. ॥ ४० ॥ आतां अशी एक शंका आहे कीं, भूम्यादिक चार भूतें परमाणूंचीं बनलीं असल्यामुळें तीं नाशवंत व खोटीं असें कदाचित् मानतां येईल. पण आकाशाचें मिथ्यात्व बुद्धींत कसें ठसावें ? ॥ ४१ ॥ याजवर आमचें असें उत्तर आहे कीं, सर्व जग एकीकडे सारून निवळ आकाश जसें तुझ्या बुद्धींत शिरलें तसेंच आकाशही एकीकडे सारून केवळ सद्रूप पहा ह्मणजे झालें. ह्मणजे तें बुद्धींत आपोआप ठसेल. ॥ ४२ ॥ जगद्रहित आकाश प्रत्यक्ष दिसतें, असें जर ह्मणावें, तर प्रकाश व तम यांखेरीज आकाश कोठें दिसतें ? शिवाय आकाश दिसतें म्हणण्यानें आम्हावर शंका घेणाराच्या मतास विरोध येतो. कारण त्यांच्या मतें आकाश प्रत्यक्ष नाहीं. ॥ ४३ ॥ परंतु आमची सद्वस्तु तशी नाहीं. ती आमच्या अनुभवास स्पष्टपणें येते. तूष्णीं स्थितीमध्यें तिचा अनुभव स्पष्ट येतो. येथें शून्याची शंका येईल तर तेथें शून्यबुद्धीही नाहीं. ॥ ४४ ॥ सद्बुद्धि तरी कोठें असते, अशी कोणी शंका घेईल तर आहे असें आह्मी तरी कोठें ह्मणतों ? तूष्णीं स्थितींत सद्बुद्धीही नाहीं. पण मनाच्या अभावाचा साक्षी स्वयंप्रकाश असल्यामुळें सद्रूप पहाणें हें म-

---

कालाभावे पुरेत्युक्तिः कालवासनया युतम् ॥ शिष्यं प्रत्येव तेनात्र द्वितीयं न हि शंक्यते ॥ ३८ ॥ चोद्यं वा परिहारो वा क्रियतां द्वैतभाषया ॥ अद्वैतभाषया चोद्यं नास्ति नापि तदुत्तरम् ॥ ३९ ॥ तदास्तिमितगंभीरं न तेजो न तमस्ततम् ॥ अनाख्यमनभिव्यक्तं सत्किंचिदवशिष्यते ॥ ४० ॥ ननु भूम्यादिकं मा भूत्परमाण्वंतनाशतः ॥ कथं ते वियतोऽसत्त्वं बुद्धिमारोहतीति चेत् ॥ ४१ ॥ अत्यंतं निर्जगद्व्योम यथा ते बुद्धिमाश्रितम् ॥ तथैव सन्निराकाशं कुतो नाश्रयते मतिम् ॥ ४२ ॥ निर्जगद्व्योम दृष्टं चेत्प्रकाशतमसी विना ॥ क्व दृष्टं किं च ते पक्षे न प्रत्यक्षं वियत् खलु ॥ ४३ ॥ सद्वस्तु शुद्धं त्वस्माभिर्निश्चितैरनुभूयते ॥ तूष्णीं स्थितौ न शून्यत्वं शून्यबुद्धेश्च वर्जनात् ॥ ४४ ॥ सद्बुद्धिरपि

नुष्यास अगदीं सोपें आहे. ॥ ४५ ॥ मनाच्या सर्व कल्पना नाहींशा झाल्या असतां जसा साक्षी निराकुल रहातो, तसेंच मायेचा विस्तार होण्यापूर्वी सद्रूप शांत असतें. ॥ ४६ ॥ आतां मायेचें लक्षण कसें काय आहे याचा विचार करूं. या सद्वस्तूची शक्ति माया ही स्वतः निस्तत्त्व असून केवळ अग्निशक्तीप्रमाणें आहे, ह्मणजे कार्यावरून समजण्याजोगी आहे, आणि शक्ति ह्मटली ह्मणजे कार्यापूर्वी कधींही समजावयाची नाहीं. ॥ ४७ ॥ ज्याप्रमाणें वन्ही आणि वन्हीची शक्ति हीं दोनही एकच होऊं शकत नाहींत. त्याप्रमाणें सद्वस्तु आणि तिची शक्ति हीं दोन्ही एकच होऊं शकणार नाहींत. आतां ही शक्ति सतापासून निराळी जर ह्मणावी तर तिचें रूप कोणतें ? ॥ ४८ ॥ तिचें रूप शून्य जर ह्मणावें तर शून्य हें मायाकार्य आहे. असें पूर्वींच सांगितलें आहे. तेव्हां शून्यही नव्हे व ती सद्वस्तूपासून भिन्नही ह्मणतां येत नाहीं व अभिन्नही ह्मणतां येत नाहीं. तस्मात् ती अनिर्वचनीय आहे असेंच ह्मटलें पाहिजे. ॥ ४९ ॥ याविषयीं श्रुतिप्रमाण असें आहे कीं, सृष्टीपूर्वी सत्‌ही नव्हतें आणि असत्‌ही नव्हतें; केवळ तममात्र होतें. तम होतें या वाक्यांत तमास स्वतः अस्तित्व आहे असें समजूं नये. केवळ सताचा योगमात्र आहे. ॥ ५० ॥ याकरितां शून्याप्रमाणें मायेलाही द्वितीयत्व गणतां येत नाहीं. साधारण व्यवहारांतही वस्तुशक्तीची गणना वस्तूहून पृथक् केली जात नाहीं. एकाद्या चैत्र नांवाच्या मनुष्याच्या चाकरीबद्दल पगार नमूद करणें झाल्यास तो त्याच्या नांवावर मात्र घालतात. त्याच्या शक्तीची गणना पृथक् केली जात नाहीं ॥ ५१ ॥ आतां याजवर अशी एक शंका आहे कीं, शक्तीच्या प्रमाणावर वेतनाचें प्रमाण असतें. ह्मणजे शक्ति जसजशी कमी जास्त असते तसतसें वेतनही कमीजास्त मिळतें. पण ही शंका बरोबर नाहीं. वेतनाचें प्रमाण शक्तीच्या प्रमाणावर नसून तिच्या कार्याच्या प्रमाणावर आहे. योद्धा केवळ शूर असून उपयोगी नाहीं किंवा शेतकरी केवळ शरीरानें बळकट असून फळ नाहीं. ते आपापली ना-

---

चेन्नास्ति मास्त्वस्य स्वप्रभत्वतः ॥ निर्मनस्कत्वसाक्षित्वात्सन्मात्रं सुगमं नृणाम् ॥ ४५ ॥ मनो जृंभणराहित्ये यथा साक्षी निराकुलः ॥ मायाजृंभणतः पूर्वं सत्तथैव निराकुलम् ॥ ४६ ॥ निस्तत्त्वाकार्यगम्याऽस्य शक्तिर्मायाग्निशक्तिवत् ॥ न हि शक्तिः क्वचित्कैश्चिद्बुध्यते कार्यतः पुरा ॥ ४७ ॥ न सद्वस्तु सतः शक्तिर्न हि वन्हेः स्वशक्तिता ॥ सद्विलक्षणतायां तु शक्तेः किं तत्त्वमुच्यताम् ॥ ४८ ॥ शून्यत्वमिति चेच्छून्यं मायाकार्यमितीरितम् ॥ न शून्यं नापि सद्यादृक्तादृक्तत्वमिहेष्यताम् ॥ ४९ ॥ नासदासीन्नो सदासीत्तदानीं किं त्वभूत्तमः ॥ सद्योगात्तमसः सत्त्वं न स्वतस्तन्निषेधनात् ॥ ५० ॥ अत एव द्वितीयत्वं शून्यवन्न हि गण्यते ॥ न लोके चैत्रतच्छक्त्योर्जीवितं लिख्यते पृथक् ॥ ५१ ॥ शक्त्याधिक्ये जीवितं चेद्वर्धते तत्र वृद्धिकृत् ॥ न

करी बजावतील तरच त्यांस वेतन मिळेल ॥ ५२ ॥ तस्मात् शक्तिमात्राची गणना शक्तीपासून पृथक् करितां येत नाहीं, इतकें सिद्ध झालें. शक्तिकार्याची गणना पृथक् होऊं शकेल. पण तें मुळींच मिथ्या आहे. याकरितां ब्रह्माचेठायीं द्वैताचा संभव मुळींच नाहीं हें सिद्ध झालें, ॥ ५३ ॥ ब्रह्माची शक्ति ब्रह्मास सर्वत्र न व्यापतां ती केवळ एकदेशी मात्र आहे. ज्याप्रमाणें घट होण्याची शक्ति चिकण मातींत मात्र असते. ॥ ५४ ॥ माया ही ब्रह्मावर एकदेशीं व्याप्त आहे. एतद्विषयीं पुढील श्रुति प्रमाण आहे. " या परमेश्वराचा एक पाद सर्व भूतांला व्यापून स्वतः त्रिपाद होत्सातां स्वयंप्रकाश होऊन रहातो. " ॥ ५५ ॥ याविषयीं गीतेंतही प्रमाण आहे. भगवंतांनीं अर्जुनास असें सांगितलें आहे कीं मी या सर्व जगास माझ्या एका अंशानें व्यापून राहिलों आहें. ॥ ५६ ॥ सर्व विश्व व्यापून परमेश्वर दशांगुळें उरला. अशीही एक श्रुति आहे; ' विकारवर्तिच ' असें एक व्यासाचें सूत्र आहे. त्याचाही अभिप्राय हाच आहे. ॥ ५७ ॥ निरंश ब्रह्माला अंश कसा ? अशी शंका येईल तर तिचें समाधान असें कीं, निरंशावर अंशाचा आरोप ठेवून माया ब्रह्माला सर्वत्र व्यापते किंवा अंशतः व्यापते असें विचारणारास उद्देशून त्याचें समाधान करण्याकरितां श्रुतीचें असें वचन आहे. ॥ ५८ ॥ सद्वस्तूचा आश्रय करून असणारी शक्ति सद्वस्तूचेठायीं नानाप्रकारच्या विकारांची कल्पना करिते. ज्याप्रमाणें भिंतीवर काढिलेल्या चित्रांत नानाप्रकारचे वर्ण भासतात. ॥ ५९ ॥ सद्वस्तूवरील पहिला विकार आकाश होय. त्याचें मुख्य स्वरूप अवकाश. ' आकाश आहे ' या वाक्यावरून आहेपणा आकाशाचे ठायीं व्यापून आहे असें होतें. ॥ ६० ॥ आहे-

---

शक्तिः किंतु तत्कार्यं युद्धकृष्यादिकं तथा ॥ ५२ ॥ सर्वथा शक्तिमात्रस्य न पृथग्गणना क्वचित् ॥ शक्तिकार्यं तु नैवास्ति द्वितीयं शंक्यते कथम् ॥ ५३ ॥ न कृत्स्नब्रह्मवृत्तिः सा शक्तिः किंत्वेकदेशभाक् ॥ घटशक्तिर्यथा भूमौ स्निग्धमृद्येव वर्तते ॥५४॥ पादोस्य सर्वा भूतानि त्रिपादस्ति स्वयंप्रभः ॥ इत्येकदेशवृत्तित्वं मायाया वदति श्रुतिः ॥ ५५ ॥ विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ इति कृष्णोऽर्जुनायाह जगतस्त्वेकदेशताम्॥५६॥ स भूमिं विश्वतो वृत्त्वा ह्यत्यतिष्ठद्दशांगुलम् ॥ विकारावर्ति चात्रास्ति श्रुतिसूत्रकृतोर्वचः ॥ ५७ ॥ निरंशेऽप्यंशमारोप्य कृत्स्नेंऽशे वेति पृच्छतः ॥ तद्भाषयोत्तरं ब्रूते श्रुतिः श्रोतृहितैषिणी ॥ ५८ ॥ सत्तत्त्वमाश्रिता शक्तिः कल्पयेत्सति विक्रियाः ॥ वर्णा भित्तिगता भित्तौ चित्रं नानाविधं यथा ॥ ५९ ॥ आद्यो विकार आकाशः सोऽवकाशस्वरूपवान् ॥ आकाशोऽस्तीति सत्तत्त्वमाकाशेऽप्यनुगच्छति ॥ ६० ॥ एकस्वभावं सत्तत्त्वमाकाशो द्विस्वभावकः ॥

पणांत अवकाश नाहीं. केवळ अस्तित्वाचा एकच स्वभाव आहे. परंतु आकाशाचे ठायीं एक आहेपणा व दुसरा अवकाश असे दोन स्वभाव आहेत. ॥ ६१ ॥ अथवा आकाशाचा प्रतिध्वनि हा आहे, तो सद्वस्तूचे ठायीं दिसत नाहीं. परंतु आकाशाचेठायीं आहेपणा ... प्रतिध्वनि असे दोन आहेत. ह्मणून सत् एक स्वभाव आणि आकाश द्विस्वभाव आहे असें अर्थातच सिद्ध झालें. ॥ ६२ ॥ याजवर अशी शंका आहे कीं, आकाश हें सद्वस्तूचें कार्य असून आकाशाची सत्ता असें ह्मणण्याचा जो परिपाठ आहे, त्याजवरून सत्ता हा आकाशाचा धर्म आहे, असें होतें तर हें विपरीत कसें ? तर याजवर आमचें असें समाधान आहे कीं, जी शक्ति आकाशाची कल्पना करिते, तीच शक्ति सत्ता आणि आकाश या दोहोंचा अभेद कल्पून धर्माचा धर्मी आणि धर्मीचा धर्म करिते. ॥ ६३ ॥ वास्तविक पहातां सत्तेचें आकाश असा व्यववहार असावा तो नसून आकाशाची सत्ता असा व्यवहार साधारण लोकांत व विद्वान लोकांत आढळतो हाही मायेचाच खेळ आहे. ॥ ६४ ॥ पदार्थ जशाचा तसा भासला असतां तें सत्यज्ञान होय. आणि जशाचा तसा न भासतां अन्यथा भासतो त्यासच भ्रम असें ह्मणतात. ॥ ६५ ॥ याप्रमाणें श्रुत्यर्थविचार करण्यापूर्वी जें सद्रूप ब्रह्म भ्रांतीनें गगनादिकांच्या रूपानें भासतें, तेंच श्रुत्यर्थविचार झाल्यानंतर त्याचा गगनादि भाव जाऊन पूर्ववत् ब्रह्मच भासूं लागतें. याजकरितां आधीं आकाशाचें विवेचन करावें. ॥ ६६ ॥ आकाश आणि सत् हे दोन शब्द जसे एकमेकांपासून भिन्न आहेत, तसेंच आकाशबुद्धि आणि सद्बुद्धि या दोनही एकमेकांपासून भिन्न आहेत. कारण पूर्वीं वाय्वादिक भूतांचेठायीं जशी सत्ता व्यापून आहे तसें आकाश नाहीं. ह्मणून आकाशापासून सत्ता भिन्न आहे हें सिद्ध झालें. ॥ ६७ ॥ आतां सद्वस्तूची व्याप्ति अधिक असल्यामुळें त्याला धर्मत्व येतें. बुद्धीनें आकाशापासून सत्ता निराळी केली असतां आकाशाचें स्वरूप काय रहातें हें सांगतां येणें अशक्य आहे. ॥ ६८ ॥

---

नावकाशः सति व्योम्नि स चैषोऽपि द्वयं स्थितम् ॥ ६१ ॥ यद्वा प्रतिध्वनिर्व्योम्नो गुणो नासौ प्रतीक्ष्यते ॥ व्योम्नि द्वौ सत्ध्वनी तेन सदेकं द्विगुणं वियत् ॥ ६२ ॥ या शक्तिः कल्पयेद्व्योम सा सद्व्योम्नोरभिन्नताम् ॥ आपाद्य धर्मधर्मित्वं व्यत्ययेनावकल्पयेत् ॥ ६३ ॥ सतो व्योमत्वमापन्नं व्योम्नः सत्तां तु लौकिकाः ॥ तार्किकाश्चावगच्छंति मायाया उचितं हि तत्॥६४॥ यद्यथा वर्तते तस्य तथात्वं भाति मानतः ॥ अन्यथा त्वं भ्रमेणेति न्यायोऽयं सार्वलौकिकः ॥ ६५ ॥ एवं श्रुतिविचारात्प्राग्यथा यद्वस्तु भासते ॥ विचारेण विपर्येति ततस्तच्चिंत्यतां वियत्॥६६॥ भिन्ने वियत्सती शब्दभेदाद्बुद्धेश्च भेदतः ॥ वाय्वादिष्वनुवृत्तं सन्नतु व्योमेति भेदधीः ॥ ६७ ॥ सद्वस्त्वधिकवृत्तित्वाद्धर्मि व्योम्नस्तु धर्मता ॥ धिया सतः पृथक्कारे ब्रूहि व्योम किमात्म-

कोणी ह्मणेल कीं, तें अवकाशात्मक आहे. होय पण तें सतापासून भिन्न असल्यावर असतच अ-सलें पाहिजे. तसें न ह्मटल्यास व्याहतिदोष येतो. ॥६९॥ वास्तविक नसणारें जग भासतें कसें अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. असें भासणें हें मायेचें भूषणच आहे. स्वप्नांत हत्ती, घोडे भासतांत ह्मणून ते खरे काय ? जें नसून भासतें त्यासच मिथ्या ह्मणतात. ॥ ७० ॥ जाति, व्यक्ति, देही, देह, गुण, आणि द्रव्य हीं जशीं एकमेकांपासून पृथक् आहेत, तशींच सत्ता आणि आकाश हीं एकमेकांपासून भिन्न आहेत. यांत नवल तें काय ? ॥ ७१ ॥ हें मात्र खरें आहे कीं, हा भेद जरी समजला तरी तो चांगला चित्तांत ठसत नाहीं. यास कारणें दोन आहेत. एक चित्ताचें अनैकाग्र्य, दुसरें संशय. यांपैकीं कोणचें कारण आहे याचा विचार क-रावा. ॥ ७२ ॥ अनैकाग्र्य असेल तर ध्यानानें एकाग्रता करावी. आणि संशय असेल तर प्रमाण व युक्ति लढवून चांगलें निवेदन करावें. ह्मणजे वर सांगितलेला भेद चित्तांत चांगला ठसेल. ॥ ७३ ॥ ध्यान, प्रमाण आणि युक्ति यांच्या योगानें आकाश आणि सत्ता या दोहों-तील भेद एकदां मनांत चांगला ठसल्यावर पुनः आकाश सत्य व सद्वस्तु पोकळ असें कधींही वाटणार नाहीं. ॥ ७४ ॥ तत्त्ववेत्त्याला आकाश हें अगदीं निस्तत्त्व आणि सद्वस्तु ओतप्रोत दाट भरलेली अशी भासते. ॥ ७५ ॥ हें ज्ञान एकदां दृढ झालें असतां आकाशाला खरें ह्म-णणारास व ज्याला सद्रूपाची व्यापकता समजली नाहीं अशा मनुष्यास पाहून तत्त्ववेत्त्याला मोठें आश्चर्य वाटेल. ॥ ७६ ॥ याप्रमाणें आकाशाचें मिथ्यात्व आणि सद्वस्तूचें सत्यत्व चांगलें

---

कम् ॥ ६८ ॥ अवकाशात्मकं तच्चेदसत्तदिति चिंत्यताम् ॥ भिन्नं सतोऽसच्च नेति वक्षि चेद्व्याहतिस्तव ॥ ६९ ॥ भातीतिचेद्भातु नाम भूषणं मायिकस्य तत् ॥ यदसद्भासमानं तन्मिथ्या स्वप्न-गजादिवत् ॥ ७० ॥ जातिव्यक्ती देहिदेहौ गुणद्रव्ये यथा पृ-थक् ॥ वियत्सतोस्तथैवास्तु पार्थक्यं कोत्र विस्मयः ॥ ७१ ॥ बुद्धोऽपि भेदो नो चित्ते निरूढिं याति चेत्तदा ॥ अनैकाग्र्या-त्संशयाद्वा रूढ्यभावोऽस्य ते वद ॥ ७२ ॥ अप्रमत्तो भव ध्या-नादाद्येऽन्यस्मिन्विवेचनम् ॥ कुरु प्रमाणयुक्तिभ्यां ततो रूढतमो भवेत् ॥ ७३ ॥ ध्यानान्मानाद्युक्तितोऽपि रूढे भेदे वियत्सतोः ॥ न कदाचिद्वियत्सत्यं सद्वस्तु च्छिद्रवन्न च ॥ ७४ ॥ ज्ञस्य भाति सदाव्योम निस्तत्त्वोल्लेखपूर्वकम् ॥ सद्वस्त्वपि विभात्यस्य नि-श्छिद्रत्वपुरःसरम् ॥ ७५ ॥ वासनायां प्रवृद्धायां वियत्सत्यत्ववा-दिनम् ॥ सन्मात्राबोधयुक्तं च दृष्ट्वा विस्मयते बुधः ॥ ७६ ॥ एव-माकाशमिथ्यात्वे सत्सत्यत्वे च वासिते ॥ न्यायेनानेन वाय्वादेः

ठरल्यावर याच न्यायानें वाय्वादिक भूतांपासून सद्वस्तूची निवड करावी ॥ ७७ ॥ सद्वस्तूच्या एकदेशीं माया, मायेच्या एकदेशीं आकाश व आकाशाच्या एकदेशीं वायु कल्पिलेला आहे. ॥ ७८ ॥ शोष, स्पर्श, गति आणि वेग हे वायूचे धर्म आहेत. सत्ता माया आणि आकाश या तिहींचे जे तीन स्वभाव तेही वायुगतच आहेत. ॥ ७९ ॥ 'वायु आहे' अशा व्यवहारास जो हेतुभूत तो वायूंतील सत्ताधर्म समजावा, आणि सत्तेपासून वायु पृथक् केला असतां जें त्याचें निःसत्त्व रूप रहातें तो मायाधर्म, आणि वायूंतील जो ध्वनि तो आकाशधर्म समजावा. ॥ ८० ॥ पूर्वीं असें सांगितलें आहे कीं, सताची जशी सर्वत्र अनुवृत्ति आहे, तशी आकाशाची नाहीं. पण आतां आकाशाची व्याप्ति वायूमध्यें दाखवितां; तेव्हां पूर्वोत्तर विरोध येतो, अशी कोणी शंका घेईल, ॥ ८१ ॥ तर त्याचें समाधान हेंच कीं, पूर्वीं आह्मीं जी व्याप्ति निवारिली, ती अवकाशलक्षणस्वरूपाची आणि आतां जी आह्मी सांगत आहों, ती केवळ शब्दरूपधर्माची ह्मणून पूर्वोत्तर विरोध येत नाहीं. ॥ ८२ ॥ याजवरही असा एक पूर्वपक्ष आहे कीं, वायूंतून सत्ता निराळी काढली असतां बाकी राहिलेलें वायूचें रूप निस्तत्त्व जसें आहे तसेंच अव्यक्त मायेपासून तें भिन्न असल्यामुळें त्यास मायाही ह्मणतां येत नाहीं. ॥ ८३ ॥ तर याजवर आमचें असें समाधान आहे कीं, माया ही अव्यक्तच असली पाहिजे असें कांहीं नाहीं. निस्तत्त्वरूप हेंच मायेचें रूप, तें असलें ह्मणजे झालें. माया व्यक्त असो, किंवा अव्यक्त असो, त्या दोहींलाही हें निस्तत्त्वरूप साधारणच आहे. ॥ ८४ ॥ परंतु प्रस्तुत या विचाराची जरूर नाहीं. तूर्त सत् कोणचें आणि असत् कोणचें याचा विवेक करणें आमचें काम आहे. असताचे जे अवांतर भेद आहेत त्यांचें कांहीं येथें प्रयोजन नाहीं. ॥८५॥

---

सद्वस्तु प्रविविच्यताम् ॥ ७७ ॥ सद्वस्तुन्येकदेशस्था माया, तत्रैकदेशगम् ॥ वियत्तत्राप्येकदेशगतो वायुः प्रकल्पितः ॥ ७८ ॥ शोषस्पर्शौ गतिर्वेगो वायुधर्मा इमे मताः ॥ त्रयः स्वभावाः सन्मायाव्योम्नां ये तेऽपि वायुगाः ॥ ७९ ॥ वायुरस्तीति सद्भावः सतो वायौ पृथक्कृते ॥ निस्तत्त्वरूपता मायास्वभावो व्योमगो ध्वनिः ॥ ८० ॥ सतोऽनुवृत्तिः सर्वत्र व्योम्नो नेति पुरेरितम् ॥ व्योमानुवृत्तिरधुना कथं न व्याहतं वचः ॥ ८१ ॥ छिद्रानुवृत्तिर्नेतीति पूर्वोक्तिरधुना त्वियम् ॥ शब्दानुवृत्तिरेवोक्ता वचसो व्याहतिः कुतः ॥ ८२ ॥ ननु सद्वस्तुपार्थक्यादसत्त्वं चेत्तदा कथम् ॥ अव्यक्तमायावैषम्यादमायामयतापि नो ॥ ८३ ॥ निस्तत्त्वरूपतैवात्र मायात्वस्य प्रयोजिका ॥ सा शक्तिकार्ययोस्तुल्या व्यक्ताव्यक्तत्वभेदिनोः ॥ ८४ ॥ सदसत्त्वविवेकस्य प्रस्तुतत्वात्स चिंत्यताम् ॥ असतोऽवांतरो भेद आस्तां तच्चिंतयात्र किम्

याकरितां वायूचेठायीं जो सत्तारूप अंश आहे, तो वजा जातां बाकी उरलेला जो वायूचा अंश तो आकाशाप्रमाणें मिथ्या आहे. हें वायूचें मिथ्यात्व चित्तामध्यें ठसवून बुद्धीनें वायूचा त्याग करावा. ॥ ८६ ॥ याचप्रमाणें वायूपेक्षां न्यूनदेशीं असणारा जो वन्हि त्याचें चिंतन करावें, ह्मणजे सत्तारूप अंश वजा केला असतां अवशिष्ट वन्हि मिथ्या आहे असा दृढ निश्चय करावा. हा न्यूनाधिक विचार ब्रह्मांडावरणाचेठायीं दृष्टीस पडतो. ॥ ८७ ॥ वायूच्या दहाव्या हिश्शानें वायूच्याठायीं अग्नि असतो हें पंचभूतांचें एकाहून एक दशांशेंकरून न्यूनत्व पुराणांत सांगितलें आहे ॥ ८८ ॥ वन्हीचें स्वरूप उष्ण प्रकाशात्मक आहे. वन्हि आहे यांत सत्तारूप धर्म आला तो एकीकडे सारून, वन्हि निराळा केला असतां तो निस्तत्त्व शब्दवान् आणि स्पर्शवान् आहे असें दिसेल. ॥ ८९ ॥ याप्रमाणें सत्ता, माया, आकाश व वायु या सर्व अंशांहींकरून युक्त जो अग्नि त्याचें स्वतःचा गुण रूप होय; त्याची निवड बुद्धीनें करावी. ॥ ९० ॥ सत्तेपासून अग्नीची निवड करून त्याचें मिथ्यात्व चित्तांत ठसलें असतां उदक हें अग्नीहून दशांशानें कमी आहे असें कल्पावें. ॥ ९१ ॥ पाणी आहे या व्यवहारास कारणीभूत जी सत्ता ती वेगळी करून पाहिलें असतां बाकी राहिलेलें उदक हें अगदीं निस्तत्त्व आहे. यांत शब्द, स्पर्श, रूप हे तीन गुण बाकीच्या भूतांचे असून रस हा पाण्याचा स्वकीय गुण आहे. ॥ ९२ ॥ सत्तेपासून पाणी पृथक् करून त्याचेंही मिथ्यात्व चित्तांत ठसलें असतां त्याहून दशांशानें कमी असणारी जी पृथ्वी तिचें चिंतन करावें. ॥९३॥ पृथ्वी आहे या व्यवहारास कारणीभूत जी सत्ता ती निराळी करून बाकी राहिलेली पृथ्वी निस्तत्व आहे. शब्द, स्पर्श, रूप आणि रस हे चार गुण तिजमध्यें इतर भूतांचे असून गंध

---

॥८५॥ सद्वस्तु ब्रह्म शिष्टांशो वायुर्मिथ्या यथा वियत् ॥ वासयित्वा चिरं वायोर्मिथ्यात्वं मारुतं त्यजेत् ॥ ८६ ॥ चिंतयेद्वन्हिमप्येवं मरुतो न्यूनवर्तिनम् ॥ ब्रह्मांडावरणेष्वेषा न्यूनाधिकविचारणा ॥ ८७ ॥ वायोर्दशांशतो न्यूनो वन्हिर्वायौ प्रकल्पितः ॥ पुराणोक्तं तारतम्यं दशांशैर्भूतपंचके ॥८८॥ वन्हिरुष्णः प्रकाशात्मा पूर्वानुगतिरत्र च ॥ अस्ति वन्हिः स निस्तत्त्वः शब्दवान् स्पर्शवानपि ॥ ८९ ॥ सन्मायाव्योमवाय्वंशैर्युक्तस्याग्नेर्निजो गुणः ॥ रूपं तत्र सतः सर्वमन्यद्बुद्ध्या विविच्यताम् ॥ ९० ॥ सतो विवेचिते वन्हौ मिथ्यात्वे सति वासिते ॥ आपो दशांशतो न्यूनाः कल्पिता इति चिंतयेत् ॥ ९१ ॥ संत्यापोऽमूः शून्यतत्त्वाः सशब्दस्पर्शसंयुताः ॥ रूपवत्योऽन्यधर्मानुवृत्त्या स्वीयो रसो गुणः ॥ ९२ ॥ सतो विवेचितास्वप्सु तन्मिथ्यात्वे च वासिते ॥ भूमिर्दशांशतो न्यूना कल्पिताप्स्विति चिंतयेत् ॥ ९३ ॥ अस्ति भूस्तत्त्वशून्यास्यां शब्द-

हा तिचा स्वकीय गुण आहे. ॥ ९४ ॥ तिजपासून सत्ता निराळी करून तिचें मिथ्यात्व चांगलें ठसल्यानंतर तिजहून दशांशानें कमी असें तिच्या मध्यभागीं असणारें ब्रह्मांड, ॥ ९५ ॥ व त्या ब्रह्मांडांत चतुर्दश भुवनें आहेत. त्या भुवनांमध्यें प्राण्यांचे देह आहेत. ॥ ९६ ॥ या सर्वांहून सद्वस्तु वेगळी केली असतां बाकीचे अंडादिक मिथ्या ठरतात. तीं डोळ्यांस जरी भासलीं तरी तीं मिथ्याच समजावीं. ॥ ९७ ॥ पंचभूतें व त्यांपासून झालेलीं ब्रह्मांडें व या दोहोंस कारणीभूत जी मायाशक्ति यांचें मिथ्यात्व विवेक व ध्यान यांच्या योगानें एकदां चित्तांत चांगलें ठसलें असतां सद्वस्तूच अद्वैत आहे असा निश्चय चित्तांतून कधींही ढळणार नाहीं. ॥ ९८ ॥ सद्रूपापासून वेगळी केलेली भूम्यादिक द्वैतसृष्टि मिथ्या ठरली असतां तत्त्ववेत्त्याचा व्यवहार अगदीं बंद पडेल अशी शंका कोणीं घेऊं नये. पदार्थ मिथ्या ठरल्यानें व्यवहार बंद पडतो असें समजणें ही मोठी चूक आहे. ज्या ज्या कामाकरितां जी जी क्रिया पाहिजे, ती ती क्रिया यथास्थित चालण्यास जगन्मिथ्यात्वामुळें मुळींच नड येत नाहीं. ॥९९॥ सांख्य, काणाद, बौद्ध आदिकरून जे वादी होऊन गेले, त्यांनीं निरनिराळ्या रीतीनें जसजसें भेदाचें प्रतिपादन केलें आहे, त्या सर्वांचें खंडन करण्याचें आमचें काम नाहीं. त्यांचें मत तूर्त आहे तसेंच असूं दे. ॥ १०० ॥ आह्मी येथें केवळ व्यावहारिक भेदाचा मात्र निरास करितों. इतर वाद्यांनीं जर आमच्या सद्रूप अद्वैत ब्रह्माची निःशंकपणें अवज्ञा केली तर आह्मालाही त्यांच्या द्वैताचा अनादर करण्यास कोणाची भीति आहे? ॥१०१॥ त्यांच्या अद्वैताच्या अनादराप्रमाणें आह्मीं केलेला द्वैताचा अनादर निष्फळ नाहीं. हा द्वैताचा अनादर एकदां चित्तांत चांगला ठसला असतां अद्वैतबुद्धि स्थिर होते, व ती स्थिर झाली असतां मनुष्य जीवन्मुक्त

---

स्पर्शौ सरूपकौ ॥ रसश्च परतो गंधो नैजः सत्ता विविच्यताम् ॥ ९४ ॥ पृथक्कृतायां सत्तायां भूमिर्मिथ्याऽवशिष्यते ॥ भूमेर्दशांशतो न्यूनं ब्रह्मांडं भूमिमध्यगम् ॥ ९५ ॥ ब्रह्मांडमध्ये तिष्ठंति भुवनानि चतुर्दश ॥ भुवनेषु वसंत्येषु प्राणिदेहा यथायथम् ॥ ९६ ॥ ब्रह्मांडलोकदेहेषु सद्वस्तुनि पृथक्कृते ॥ असंतोऽडादयो भांतु तज्ज्ञानेऽपीह का क्षतिः ॥ ९७ ॥ भूतभौतिकमायानामसत्त्वेऽत्यंतवासिते ॥ सद्वस्त्वद्वैतमित्येषा धीर्विपर्येति न क्वचित् ॥ ९८ ॥ सदद्वैतात्पृथग्भूते द्वैतेभूम्यादिरूपिणि ॥ तत्तदर्थक्रिया लोके तथा दृष्टा तथैव सा ॥ ९९ ॥ सांख्यकाणादबौद्धाद्यैर्जगद्भेदो यथा यथा ॥ उत्प्रेक्ष्यतेऽनेकयुक्त्या भवत्वेष तथा तथा ॥ १०० ॥ अवज्ञातं सदद्वैतं निःशंकैरन्यवादिभिः ॥ एवं का क्षतिरस्माकं तद्द्वैतमवजानताम् ॥ १०१ ॥ द्वैतावज्ञा सुस्थिता चेदद्वैते धीः स्थिरा भवेत् ॥ स्थैर्ये तस्याः पुमानेष

होतो ॥ १०२ ॥ याविषयीं गीतावाक्य प्रमाण आहे. भगवंतांनीं अर्जुनास असें म्हटलें आहे कीं, हे अर्जुना, या अद्वैतबुद्धीला ब्राम्ही स्थिति असें ह्मणतात. ही प्राप्त झाली असतां प्राणी मोह पावत नाहीं; व या स्थितींत असल्यावर अंतकाळीं ब्रह्मप्राप्ति होते. ॥ १०३ ॥ येथें अंतकाळ या शब्दाचा अर्थ असा कीं, सद्रूप अद्वैत ब्रह्म आणि असद्रूप द्वैत ह्या दोन्हींचें भ्रमेंकरून जें ऐक्यज्ञान त्याचा जो अंतकाल तो समजावा. तो अंतकाल म्हटला ह्मणजे द्वैत व अद्वैत या दोहोंमधील भेदबुद्धि होय. ॥ १०४ ॥ अथवा अंतकाल या शब्दाचा जो लोकप्रसिद्ध अर्थ तो घेतला तरी चालेल. प्राणोत्क्रमणकालींही एकदां गेलेली भ्रांति पुनः परत येत नाहीं. ॥ १०५ ॥ हा मनुष्य रोगी असो, निरोगी असो, बसला असो, भुईवर लोळत पडला असो, प्राणत्यागकालीं मूर्छित पडो, कसाही असो; तेथें भ्रांतीची शंकाच नाहीं. ॥ १०६ ॥ ज्याप्रमाणें प्रति दिवशीं केलेले वेदपठन स्वप्न व निद्रा यांमध्यें जरी विसरलें तरी दुसरे दिवशीं आठवतें, त्याप्रमाणें एकदां झालेलें ज्ञान नष्ट होत नाहीं. ॥ १०७ ॥ शिवाय प्रमाणापासून उत्पन्न झालेलें ज्ञान दुसऱ्या प्रबल प्रमाणावांचून नाश पावत नाहीं. वेदांतापेक्षां तर दुसरें प्रमाणच नाहीं. ॥ १०८ ॥ तस्मात् वेदांत प्रमाणांनीं सिद्ध केलेलें जें अद्वैत तें कधींही बाधित होत नाहीं. ह्मणून भूतविवेकापासून अंतकालीं मोक्षप्राप्ति होते. ॥ १०९ ॥

भूतविवेक समाप्त.

---

जीवन्मुक्त इतीर्यते ॥ १०२ ॥ एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ॥ स्थित्वाऽस्यामंतकालेऽपिब्रह्म निर्वाणमृच्छति ॥१०३॥ सदद्वैतेऽनृतद्वैते यदन्योन्यैक्यवीक्षणम् ॥ तस्यांतकालस्तद्भेदबुद्धिरेव न चेतरः ॥ १०४ ॥ यद्वांऽतकालः प्राणस्य वियोगोऽस्तु प्रसिद्धितः ॥ तस्मिन् कालेऽपि न भ्रांतेर्गतायाः पुनरागमः ॥ १०५ ॥ नीरोग उपविष्टो वा रुग्णो वा विलुठन् भुवि ॥ मूर्च्छितो वा त्यजत्वेष प्राणान् भ्रांतिर्न सर्वथा ॥ १०६ ॥ दिने दिने स्वप्नसुप्त्योरधीते विस्मृतेऽप्ययम् ॥ परेद्युर्नानधीतः स्यात् तद्वद्विद्या न नश्यति ॥ १०७ ॥ प्रमाणोत्पादिता विद्या प्रमाणं प्रबलं विना ॥ न नश्यति न वेदांतात्प्रबलं मानमीक्ष्यते ॥१०८॥ तस्माद्वेदांतसंसिद्धं सदद्वैतं न बाध्यते ॥ अंतकालेऽप्यतो भूतविवेकान्निर्वृतिः स्थिता ॥ १०९ ॥ इति पंचदश्यां महाभूतविवेकः समाप्तः ॥ ॥ ॥

॥ इति महाभूतविवेकः ॥

# सार्थपंचदश्याम्

## पंचकोशविवेकः ॥

### तृतीयं प्रकरणम्

गु०—" यो वेद निहितं गुहायां " या श्रुतीनें जें गुहेमध्यें असणारें ब्रह्म सांगितलें, तें पंचकोशांच्या विवेकानें समजण्याजोगें आहे. याकरितां आम्ही पंचकोशांचें विवेचन करून दाखवितों. ॥ १ ॥ शि०—श्रुतींनीं जी गुहा सांगितली, ती कोणती ? गु०—या अन्नमय स्थूल देहाच्या आंत प्राण आहेत. प्राणांच्या आंतल्या बाजूस मन आहे. मनाच्याही आंतल्या बाजूस कर्ता ह्मणजे विज्ञानमय कोश आहे. त्याच्याही आंत भोक्ता ह्मणजे आनंदमय कोश आहे. अशी जी अन्नमयापासून आनंदमयापर्यंत परंपरा सांगितली त्या परंपरेस गुहा असें ह्मणतात. ॥२॥ शि०—या प्रत्येक कोशाचें स्वरूप काय आहे, तें कृपा करून सांगा. गु०—जो देह आईबापांनीं भक्षिलेलें जें अन्न त्यापासून तयार झालेल्या वीर्यापासून उत्पन्न झाला, तो अन्नमय कोश होय. हा कोश आत्मा ह्मणतां येत नाहीं. कारण, उत्पत्तीपूर्वी व मरणानंतर त्याचा अभाव आहे. जो पदार्थ कार्य आहे, तो पदार्थ नाशवंत आहे. देह हें कार्य असल्यामुळें त्याला अर्थातच नाश आहे. ॥ ३ ॥ शि०—आपण सांगितलेला हेतु खरा आहे, त्या हेतूपासून जी गोष्ट आपण सिद्ध केली, ती मात्र संभवत नाहीं. ह्मणून तो हेतु अप्रयोजक आहे, असें मला वाटतें. कारण आपण देहाला जसें कार्यत्व लागू केलें; तसें माझ्या मतें आत्म्यालाही कार्यत्वच येतें. तेव्हां देहालाच आत्मा ह्मणण्यास कोणची हरकत आहे. ? गु०—आत्म्यास कार्यत्व लागू केलें असतां दोन दोष प्राप्त होतात. एक अकृताभ्यागम ह्मणजे काहीं न कारितां परिणाम घडणें, आणि कृतप्रणाश ह्मणजे केलेल्या कर्मांचा कांहींच परिणाम न होतां नाश होणें, ह्या दोन्ही गोष्टी असंभवनीय आहेत. कारण या देहास जर तूं आत्मा ह्मणतोस तर, हा देहात्मा पूर्वजन्मीं नव्हता, असें ह्मणावें लागेल. आणि तसें समजल्यास या जन्माची प्राप्ति कशी होईल, ह्मणून येथें अकृताभ्यागम दोष आला. तसेंच पुढील जन्मीं हा देहरूप आत्मा नाहीं ह्मटल्यास, आतां केलेल्या पुण्यपापाचा फलभोग घेण्यास पुढें कोणी

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ पंचकोशविवेकः ॥ गुहाहितं ब्रह्म यत् तत् पंचकोशविवेकतः ॥ बोद्धुं शक्यं ततः कोशपंचकं प्रविविच्यते ॥१॥ देहादभ्यंतरः प्राणः प्राणादभ्यंतरं मनः ॥ ततः कर्ता ततो भोक्ता गुहा सेयं परंपरा ॥२॥ पितृभुक्तान्नजाद्वीर्याज्जातोऽन्नेनैव वर्धते ॥ देहः सोऽन्नमयो नात्मा प्राक् चोर्ध्वं तदभावतः ॥ ३ ॥ पूर्वजन्मन्यसत्त्वेतज्जन्म संपादयेत्कथम् ॥ भाविजन्मन्यसत्कर्म

नसल्यामुळें कर्मक्षय होऊन कृतप्रणाश दोष येऊं पहातो. याकरितां आत्मा कशाचें तरी कार्य आहे, ह्मणून अन्नमय कोश आत्मा नव्हे हें सिद्ध झालें. ॥ ४ ॥ शि०—बरें, हा अन्नमय कोश नसेल तर नसो; परंतु प्राणमय कोशास आत्मा ह्मणण्यास कोणती हरकत आहे? गु०—अन्नमयाप्रमाणें प्राणमयालाही आत्मा ह्मणतां येत नाहीं. याचें तुला स्वरूप दाखवून नंतर अनात्मत्व सिद्ध करून दाखवितों. जो वायु देहाचेठायीं आपादमस्तक व्याप्त असून व्यानरूपानें शरीरास सामर्थ्य देतो, व जो नेत्रादिक इंद्रियांचा प्रेरक आहे, त्या वायूस प्राणमय कोश असें ह्मणतात. या कोशालाही आत्मा ह्मणतां येत नाहीं. कारण, याला चैतन्य ह्मणजे ज्ञान मुळींच नाहीं. ह्मणून हा जड आहे. याजकरितां काष्ठपाषाणादि पदार्थांस आत्मा ह्मणणें जसें योग्य नाहीं, तसें या प्राणमय कोशालाही आत्मा ह्मणतां येत नाहीं. ॥ ५ ॥ शि०—बरें, मनोमय कोशाला तरी आत्मा ह्मणतां येईल किंवा नाहीं? मला तर असें वाटतें कीं, मन हें प्राणाप्रमाणें जड नाहीं, ह्मणून हेंच आत्मा आहे. गु०-त्याचेंही स्वरूप तुला सांगतों, ह्मणजे पूर्वोक्त दोन कोशांप्रमाणें हा कोशही आत्मा नव्हे, हें तुझ्या ध्यानांत येईल. जो या या देहाला मी मी ह्मणतो व गृहादिकांला माझें माझें असें ह्मणतो, त्या कोशास मनोमय कोश असें ह्मणतात. हाही आत्मा होऊं शकत नाहीं. कारण, हा कामक्रोधादिक वृत्तींचा बनला असल्यामुळें चंचल व अनियमित आहे, ह्मणून यास आत्मा ह्मणतां येत नाहीं. ॥ ६ ॥ शि०—बरें, विज्ञानमय कोश तरी आत्मा होऊं शकेल कीं नाहीं? गु०—त्याचेंही तुला लक्षण सांगतों. जी बुद्धि चिदाभासानें युक्त होऊन सुषुप्तींत लय पावते, आणि जागृतींत शरीरास नखशिखांत व्यापून रहाते, तिला विज्ञानमयकोश ह्मणतात. हिला विलयादिक अवस्था असल्यामुळें आत्मा ह्मणतां येत नाहीं. ॥ ७ ॥ शि०—मन आणि बुद्धि या दोनही अंतःकरणाच्याच अवस्था आहेत, तेव्हां मनोमय आणि विज्ञानमय अशा दोन कोशांची कल्पना न करितां दोन्ही मिळून एकच कोश असें कां मानलें नाहीं? गु०— याचें कारण हेंच कीं, दोन्ही जरी अंतःकरणाचींच रूपें आहेत, तरी कर्ता आणि कारण अशीं दोन रूपें दोहींचीं भिन्न भिन्न असल्यामुळें एकाला विज्ञानमय आणि दुसऱ्याला मनोमय असें ह्मटलें. एकच अंतःकरण आंत असतांना कर्ता असतो; आणि तोच बाहेर आल्यावर मन होतें, ह्मणून दोन कोशांची कल्पना जी केली, ती योग्यच आहे. ॥ ८ ॥ शि०—हे चारही कोश आत्मा नव्हे

---

न भुंजीतेह संचितम् ॥ ४ ॥ पूर्णो देहे बलं यच्छन्नक्षाणां यः प्रवर्तकः ॥ वायुः प्राणमयो नासावात्मा चैतन्यवर्जनात् ॥ ५ ॥ अहंतां ममतां देहे गेहादौ च करोति यः ॥ कामाद्यवस्थयाभ्रांतो नासावात्मा मनोमयः ॥ ६ ॥ लीना सुप्तौ वपुर्बोधे व्याप्नुयादानखाग्रगा ॥ चिच्छायोपेतधीर्नात्मा विज्ञानमयशब्दभाक् ॥ ७ ॥ कर्तृत्वकरणत्वाभ्यां विक्रियेतांतरिंद्रियम् ॥ विज्ञानमनसी अंतर्बहिश्चैते परस्परम् ॥ ८ ॥ कांचिदंतर्मुखा वृत्तिरानंदप्रतिबिंबभाक् ॥ पुण्यभोगे भोगशांतौ निद्रारूपेण लीयते ॥ ९ ॥

अशी माझ्या मनाची खात्री बरीच झाली. परंतु पांचवा जो आनंदमय कोश, ज्यास भोक्ता असें ह्मणतात, तो मात्र आत्मा नव्हे असें कधीं ह्मणतां येणार नाहीं. गु०—त्याला देखील आत्मा ह्मणतां येत नाहीं. त्याचें तुला येथें लक्षण सांगतों, ह्मणजे त्याचेंही अनात्मत्व तुझ्या लक्षांत येईल. पुण्यकर्माचें फल अनुभवित असतां कोणी एक अंतःकरणाची वृत्ति अंतर्मुख होऊन तिजमध्यें आत्मस्वरूपाच्या आनंदाचें प्रतिबिंब पडतें, व तीच वृत्ति पुण्यभोग संपला-ह्मणजे निद्रारूपानें लय पावते. ॥ ९ ॥ गु०—या वृत्तीसच आनंदमयकोश असें ह्मणतात. ही वृत्ति अमुक काळपर्यंत राहणारी आहे, ह्मणून ही अनित्य आहे, तिला आत्मा कसें ह्मणतां येईल ? पण या वृत्तींत ज्याचें प्रतिबिंब पडलें अशी जी एक बिंबभूत वस्तु, तिला आत्मा ह्मणतां येईल. कारण, ती सर्वदा सारखी राहणारी आहे. ॥ १० ॥ शि०—अन्नमयापासून आनंदमयापर्यंत सर्व पांचही कोश आत्मा नव्हे असें आपण सिद्ध करून दाखविलें खरें, परंतु या पांच कोशांखेरीज सहावा कोणीच दिसत नाहीं, तेव्हां आपण जो आत्मा ह्मणतां, तो कोठें आहे ? ॥ ११ ॥ गु०—अरे, आनंदमयापासून अन्नमयापर्यंत पांचही कोश ज्याच्या अनुभवास आले, तोच आमचा आत्मा, तो नाहीं असें ह्मणतां येईल काय ? ॥ १२ ॥ शि०—तुह्मी जो आत्मा सांगतां तो जर खरोखर असता, तर आमच्या अनुभवास आला असता; ज्या अर्थीं अनुभवास येत नाहीं, त्या अर्थीं तो नाहींच असें ह्मटलें पाहिजे. गु०—आह्मीं जो पंच कोशांचा साक्षी सांगितला, तो स्वतः अनुरूपच असल्यामुळें तो अनुभवास विषय होऊं शकत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, तेथें ज्ञाता व ज्ञान दोन्हींही नसल्यामुळें तो ज्ञानास विषय होत नाहीं, तथापि त्याचें अस्तित्व कोठें जाईल ? पूर्वोक्त पंचकोश ज्याच्या अनुभवास आले, तो साक्षी असलाच पाहिजे. याला एक दृष्टांत देतों, ह्मणजे अनुभवरूप आत्म्याला अनुभवविषयत्व संभवत नाहीं हें तुला स्पष्टपणें समजून येईल. ॥ १३ ॥ गु०—साखर व लिंबू यांसारखें जे स्वभावतः अनुक्रमें गोड व आंबट पदार्थ आहेत ते दुसऱ्या पिठासारख्या किंवा पाण्यासारख्या पदार्थांत मिश्र केले असतां त्या पिठास किंवा पाण्यास गोडी किंवा आंबटपणा येतो. परंतु त्या साखरेस व लिंबास गोड किंवा आंबट करण्यास पिष्टादि पदार्थ समर्थ नाहींत. ॥ १४ ॥ कारण, ते स्वभावतः गोड व

---

कदाचित्कत्वतोऽनात्मा स्यादानंदमयोऽप्ययम् ॥ बिंबभूतो य आनंद आत्माऽसौ सर्वदास्थितेः ॥ १० ॥ ननु देहमुपक्रम्य निद्रानंदांतवस्तुषु ॥ मा भूदात्मत्वमन्यस्तु न कश्चिदनुभूयते ॥ ११ ॥ बाढं निद्रादयः सर्वेऽनुभूयंते न चेतरः ॥ तथाप्येतेऽनुभूयंते येन तं को निवारयेत् ॥ १२ ॥ स्वयमेवानुभूतित्वाद्विद्यते नानुभाव्यता ॥ ज्ञातृज्ञानांतराभावादज्ञेयो न त्वसत्तया ॥ १३ ॥ माधुर्यादिस्वभावानामन्यत्र स्वगुणार्पिणाम् ॥ स्वस्मिंस्तदर्पणापेक्षा नो न चास्त्यन्यदर्पकम् ॥ १४ ॥ अर्पकांतरराहित्येऽप्यस्त्येषां तत्स्वभावता ॥ मा भूत्तथानुभाव्यत्वं बोधात्मा तु न

आंबट असल्यामुळें दुसऱ्या पदार्थांच्या मिश्रणाची त्यांस गरजच नाहीं. त्याप्रमाणें आत्मा हा अनुभवास विषय जरी न झाला, तरी स्वतःसिद्ध तो बोधरूप असल्यामुळें त्याचें अस्तित्व कधींही नाहींसें करितां येणार नाहीं. यास श्रुतीचें प्रमाणही आहे. ॥ १५ ॥ हा पुरुष स्वयंज्योति आहे. सर्व विषयांच्या पूर्वी हा भासतो. असा जो भासमान आत्मा त्याला अनुसरूनच 'सर्व जगत् भासतें ह्मणून त्याच्या प्रकाशानेंच सर्व पदार्थ भासतात इत्यादि श्रुतिवाक्यें आत्म्याचें स्वप्रकाशत्व सुचवितात. ॥ १६ ॥ आणखी दुसरींही अशींच प्रमाणें आहेत. जेणेंकरून हें सर्व जग जाणतें. त्या आत्म्याला जाणण्यास कोण समर्थ आहे ? अरे, हा जो सर्व जगाचा साक्षी याला कोण जाणूं शकेल ? मनानें याला जाणतां येईल अशी कोणी शंका घेईल, तर याजवर आमचें हेंच सांगणें कीं, आत्मा खेरीज करून बाकीच्या सर्व पदार्थांस जाणण्यास मात्र मन समर्थ आहे. परंतु मनाचाही साक्षी जो आत्मा त्याला जाणण्यास तें कधीं समर्थ होणार नाहीं. ॥ १७ ॥ तसेंच, आणखीही दोन प्रमाणें तुला सांगतों.—" जें जाणण्यास योग्य आहे, तें सर्व तो जाणतो. " " त्याला जाणणारा दुसरा कोणीच नाहीं. तें ब्रह्म ज्ञात पदार्थ आणि अज्ञात पदार्थ यांहून अगदीं भिन्न असून केवळ बोधस्वरूप आहे. " ॥ १८ ॥ शि०—ज्ञात आणि अज्ञात पदार्थांखेरीज बोध ह्मणून जो तुह्मी ह्मणतां तो तरी अनुभवास कोठें येतो ? गु०—घटादिकाच्या बोधाविषयीं अनुभव प्रत्यक्ष होत असून जो मनुष्य तसा अनुभव नाहीं ह्मणतो, त्याला मनुष्य तरी कसें ह्मणावें ? तो केवळ मनुष्याच्या आकृतीचा पाषाणाच आहे, असें ह्मटलें पाहिजे. अशा दगडाला शास्त्रानें बोध तरी कसा करावा ?॥१९॥ अरे, मला जिव्हा आहे कीं नाहीं असें जर कोणी पुसेल, तर तें पुसणें केवळ लाजिरवाणें आहे. कारण, जिव्हेवांचून तसें पुसतां कसें येईल ? त्याप्रमाणें बोधाचा मला अनुभव नाहीं असें ह्मणणें देखील मूढपणाचें नव्हे काय ? शि०—बरें आपण ह्मणतां तसेंच कां होईना. परंतु प्रस्तुत जें आमचें ब्रह्मज्ञानाचें बोलणें चाललें आहे, त्याची सिद्धता कशी झाली ? ॥ २० ॥ गु०—अरे, या जगामध्यें ज्या ज्या पदार्थांचें ज्ञान होतें, त्या त्या पदार्थांची उपेक्षा करून बाकी राहिलेलें जें केवळ ज्ञान तेंच ब्रह्म व असें जें पक्कें समजणें त्यालाच ब्रह्म-

---

हीयते ॥ १५ ॥ स्वयंज्योतिर्भवत्येष पुरोऽस्माद्भासतेऽखिलात् ॥ तमेव भांतमन्वेति तद्भासा भास्यते जगत् ॥ १६ ॥ येनेदं जानते सर्वं तत्केनान्येन जानताम् ॥ विज्ञातारं केन विंद्याच्छक्तं वेद्ये तु साधनम् ॥ १७ ॥ स वेत्ति वेद्यं तत्सर्वं नान्यस्तस्यास्ति वेदिता ॥ विदिताविदिताभ्यां तत्पृथग्बोधस्वरूपकम् ॥ १८ ॥ बोधेप्यनुभवो यस्य न कथंचन जायते ॥ तं कथं बोधयेच्छास्त्रं लोष्ठं नरसमाकृतिम् ॥ १९ ॥ जिव्हा मेऽस्ति न वेत्युक्तिर्लज्जायै केवलं यथा ॥ न बुद्ध्यते मया बोधो बोद्धव्य इति तादृशी ॥ २० ॥ यस्मिन्यस्मिन्नस्तिलोके बोधस्तत्तदुपेक्षणे ॥

ज्ञान ह्मणतात. ॥ २१ ॥ शि०—जर घटादिविषयांची उपेक्षा करून ब्रह्मनिश्चय करितां येतो, तर पंचकोशविवेक जो तुह्मीं सांगितला त्याचा उपयोग काय ? गु०—त्याचा उपयोग फार आहे; नाहीं कसा. ब्रह्माच्या प्रत्यग्रूपाच्या ज्ञानावांचून संसारनिवृत्ति होत नाहीं; व तसें ज्ञान पंचकोशांच्या विवेकावांचून होत नाहीं. याकरितां तो विवेक अवश्य आहे. अन्नमयादि पंचकोशांचा बुद्धीनें त्याग करून बाकी राहिलेला जो त्याचा साक्षी, तोच स्वस्वरूप ब्रह्म आहे, तो जरी दिसत नाहीं तरी त्याचें अस्तित्व नाहींसें करितां येत नाहीं. ह्मणून त्याला कोणच्याही रीतीनें शून्यत्व संभवत नाहीं. ॥ २२ ॥ कारण स्वयं ह्मणून कोणी तरी एक असलाच पाहिजे. त्याच्या अस्तित्वाविषयींच जर विवाद असेल तर तेथें प्रतिवादी कोणीं व्हावें. ॥ २३ ॥ शि०— आपलें नास्तित्व प्रतिपादन करणाराच येथें प्रतिवादी समजावा. गु०—आपण नाहीं, असें भ्रांतिष्टावांचून कोणीही कबूल करणार नाहीं, ह्मणूनच श्रुतीनेंही असत्त्ववाद्यांचा निषेध केला. ॥ २४ ॥ शि०— ती श्रुति कोणती ? गु०—त्या श्रुतीचा अर्थ असा कीं, “ ब्रह्म नाहीं ह्मणणारा आपणच नाहीं असें ह्मणतो, असें होतें. कारण, आपलें स्वरूप ब्रह्मच आहे. ” याकरितां साक्षीला जरी वेद्यत्व नसलें, तरी त्याचें अस्तित्व ह्मणून कबूल केलें पाहिजे. ॥ २५ ॥ शि०— मग तर आत्मा कसा आहे तो कृपा करून सांगा. गु०—आत्मा अमुकच प्रकारचा आहे असें सांगतांच येत नाहीं. “ जो असाही नव्हे, व तसाही नव्हे तोच तुझा आत्मा. ” कारण जो पदार्थ ज्ञानाला विषय आहे, तोच पदार्थ असा किंवा तसा आहे असें सांगतां येईल; परंतु आत्मा हा ज्ञानाला विषय मुळींच नाहीं; तेव्हां तो असा कीं तसा हें कसें सांगावें. ॥ २६ ॥ शि०—आपल्या बोलण्याचा अभिप्राय नीट समजला नाहीं. तो स्पष्ट करून सांगा. गु०—घटादिक जे इंद्रियांना प्रत्यक्ष दिसणारे पदार्थ त्यांस आह्मी अशा प्रकारचे असें ह्मणतों, व जे इंद्रियांआड असणारे पदार्थ त्यांस आह्मी तशा प्रकारचे असें ह्मणतों. आतां आत्मा हा इंद्रियांस विषयच नाहीं ह्मणून तो असा ( ईदृश ) असें ह्मणतां येत नाहीं, व तो स्वप्रकाश, स्वसंवेद्य असल्यामुळें तो तसा ( तादृश )

---

यद्बोधमात्रं तद्ब्रह्मेत्येवंधीर्ब्रह्मनिश्चयः ॥ २१ ॥ पंचकोशपरित्यागे साक्षिबोधावशेषतः ॥ स्वस्वरूपं स एव स्याच्छून्यत्वं तस्य दुर्घटम् ॥ २२ ॥ अस्ति तावत्स्वयं नाम विवादाविषयत्वतः ॥ स्वस्मिन्नपि विवादश्चेत्प्रतिवाद्यत्र को भवेत् ॥ २३ ॥ स्वासत्त्वं तु न कस्मैचिद्रोचते विभ्रमं विना ॥ अत एव श्रुतिर्बाधं ब्रूते चासत्त्ववादिनः ॥ २४ ॥ असद्ब्रह्मेति चेद्वेद स्वयमेव भवेदसत् ॥ अतोऽस्य मा भूद्वेद्यत्वं स्वसत्त्वं त्वभ्युपेयताम् ॥ २५ ॥ कीदृक् तर्हीति चेत्पृच्छेदीदृक्ता नास्ति तत्र हि ॥ यदनीदृगताद‍ृक् च तत्स्वरूपं विनिश्चिनु ॥ २६ ॥ अक्षाणां विषयस्त्वीदृक् परोक्षस्तादृगुच्यते ॥ विषयी नाक्षविषयः स्वत्वान्नास्य परोक्षता ॥ २७ ॥

असेंही ह्मणतां येत नाहीं. ॥ २७ ॥ या कारणास्तव आत्मा ज्ञानाला विषय नसून प्रत्यक्ष आहे. ह्मणूनच तो स्वप्रकाश आहे. व " सत्यं ज्ञानमनंतं " या श्रुतीनें जें ब्रह्माचें लक्षण सांगितलें, तें आत्म्यालाही लागूं पडतें. कारण आत्माही सत्यरूप, ज्ञानरूप आणि अनंत आहे, असें विचाराअंतीं सिद्ध होतें. ॥ २८ ॥ शि०—तें कसें ? गु०—ज्याला बाध नाहीं तेंच सत्य. आत्मा सर्व जगाच्या अभावाचा साक्षी आहे, त्याच्या अभावाला पहाणारा कोणीच नाहीं, व पहाणारावांचून तदभाव स्वीकारणें बरोबर नाहीं. ह्मणून आत्मवस्तूचा अभाव कधींही होत नाहीं असें ह्मटलें पाहिजे. सर्व जगाच्या अभावाचा अनुभव निद्रा, मूर्च्छा व समाधि या अवस्थांमध्यें सर्वांस आहेच. तसा साक्षीच्या अभावाचा अनुभव घेणारा कोणीही नाहीं, ह्मणून आत्मा हा सत्य आहे हें सिद्ध झालें. ॥ २९ ॥ यास दृष्टांत. घरांतील सर्व मूर्त पदार्थ काढून टाकले असतां जसें बाकी अमूर्त आकाश रहातें, त्याप्रमाणें आपणाव्यतिरिक्त जितके ह्मणून देहेंद्रियादिक मूर्तामूर्त पदार्थ आहेत, त्यांचें " नेतिनेति " या श्रुतीनें निराकरण करून बाकी जो बोधरूप साक्षी रहातो तोच बाधरहित सत्य आत्मा होय. ॥ ३० ॥ शि०—प्रतीतीस येणाऱ्या सर्व पदार्थांचा निषेध केला असतां बाकी कांहींच रहात नाहीं. मग बाकी जो रहातो तो आत्मा असें जें आपण ह्मटलें त्याचा अर्थ काय ? गु०—जें बाकी कांहीं रहात नाहीं ह्मणतोस, तेंच आमचें ब्रह्म. कांहीं नाहीं ह्मणणें व कांहीं आहे ह्मणणें ह्यांत भाषेचा मात्र भेद आहे. येऱ्हवीं वास्तविक पाहिलें असतां बाधरहित साक्षिचैतन्य आहेच आहे. ॥ ३१ ॥ श्रुतीमध्येंही असेंच सांगितलें आहे. " नेतिनेति " या श्रुतीचा अर्थ असा आहे कीं, जे जे पदार्थ बुद्ध्यादिकांस गोचर ह्मणून आहेत, ते ते जड असें समजून त्यांचें निराकरण करून बाकी राहिलेलें साक्षिचैतन्य जें निराकरण करण्यास शक्य तेंच ब्रह्म होय. ॥ ३२ ॥ शि०—" नेतिनेति " या श्रुतीनें बाधित होणारा पदार्थ कोणता व बाधित न होणारा पदार्थ कोणता ? गु०—जितके ह्मणून हें हें अशा दर्शक नामास गोचर होणारे पदार्थ आहेत, त्यांचा निषेध करणें शक्य आहे. आणि जी वस्तु, ही अमुकच अशा रीतीनें दाखवितां येत नाहीं; तिचा निषेध करणें अशक्य आहे, अशी वस्तु सर्वांचा साक्षी जो बाधवर्जित आत्मा तो एकच आहे. ॥ ३३ ॥ याप्रमाणें ब्रह्माच्या लक्षणांत जें सत्यत्व सांगितलें तें आत्म्यास कसें लागूं पडतें तें येथें सिद्ध करून दाखविलें. आ-

---

अवेद्योऽप्यपरोक्षोऽतः स्वप्रकाशो भवत्ययम् ॥ सत्यं ज्ञानमनंतं चेत्यस्तीह ब्रह्मलक्षणम् ॥ २८ ॥ सत्यत्वं बाधराहित्यं जगद्बाधैकसाक्षिणः ॥ बाधः किंसाक्षिको ब्रूहि न त्वसाक्षिक इष्यते ॥ २९ ॥ अपनीतेषु मूर्तेषु ह्यमूर्तं शिष्यते वियत् ॥ शक्येषु बाधितेष्वंते शिष्यते यत्तदेव तत् ॥ ३० ॥ सर्वबाधे न किंचिच्चेद्यन्न किंचित्तदेव तत् ॥ भाषा एवात्र भिद्यंते निर्बाधं तावदस्ति हि ॥ ३१ ॥ अत एव श्रुतिर्बाध्यं बाधित्वा शेषयत्यदः ॥ स एष नेति नेत्यात्मेत्यतद्व्यावृत्तिरूपतः ॥ ३२ ॥ इदं रूपं तु यद्यावत्तत्त्यक्तुं शक्य-

त्याची ज्ञानरूपता तर " स्वयमेवानुभूतित्वात् " इत्यादि श्लोकांतील वाक्यांनीं पूर्वींच सिद्ध केली आहे. शि०— सत्य आणि ज्ञान हीं दोन लक्षणें आत्म्याचेठायीं सिद्ध करून दाखविलीं खरीं, परंतु अनंत हें लक्षण आत्म्यास लागू पडेल कीं नाहीं, याचाच मला मुळीं संशय आहे. ॥ ३४ ॥ गु० — तें कसें लागू पडत नाहीं ? अरे, ब्रह्म सर्वव्यापि असें श्रुतींत सांगितलें आहे, यावरून अर्थातच त्याला देशपरिच्छेद नाहीं; ब्रह्म नित्य असें सांगितलें आहे ह्मणून त्यास कालपरिच्छेद नाहीं; आणि ब्रह्म सर्व जगाचा आत्मा असें सांगितलें आहे ह्मणून त्यास वस्तुपरिच्छेदही नाहीं. याप्रमाणें देशतः, कालतः व वस्तुतः ब्रह्मास अंत नाहीं असें झालें ॥ ३५ ॥ शि०—देश, काल आणि वस्तु हीं तिन्ही प्रत्यक्ष असून त्यांचा परिच्छेद ब्रह्मास नाहीं असें कसें ह्मणतां ? गु०—असेनात बापडीं. तीं असलीं तरी मायाकल्पित मिथ्या असल्यामुळें त्यांपासून ब्रह्माच्या अनंतपणास मुळींच हानि नाहीं. ह्मणून ब्रह्म अनंत आहे असें जें ह्मटलें तें अगदीं योग्य आहे. ॥ ३६ ॥ शि०—अहो, ब्रह्माला जड जगताचा परिच्छेद नाहीं असें ह्मटलें तरी चेतनरूप जे जिव आणि ईश्वर त्यांचा तरी परिच्छेद असलाच पाहिजे. मग ब्रह्म अनंत आहे, हें ह्मणणें कसें संभवेल. गु०—जें सत्यादि लक्षणांनीं युक्त असें ब्रह्म सांगितलें तेवढें मात्र सत्य आहे. त्याजवर ईश्वरत्व आणि जीवत्व हीं दोन्ही उपाधिकल्पित आहेत; ह्मणून जड जगताप्रमाणें त्यांपासूनही ब्रह्मास परिच्छेद होत नाहीं. ॥ ३७ ॥ शि०—त्या दोन्ही उपाधींचीं स्वरूपें कृपा करून सांगावीं. गु०— पृथिव्यादि सर्व वस्तूंचें नियमन करणारी अशी कोणी एक ईश्वराची अनिर्वचनीय शक्ति आहे. शि०—तर मग ती कां दिसत नाहीं. ? गु—आनंदमयापासून सर्व ब्रह्मांडापर्यंत ती गुप्तरूपानें आहे ह्मणून दिसत नाहीं. ॥ ३८ ॥ शि०—ती जर दिसत नाहीं तर ती आहे असें तरी कसें ह्मणावें ? गु०—ती जर नसेल तर पृथिव्यादि तत्त्वांचे जे काठिन्यादि धर्म त्यांची व्यवस्थाच लागणार नाहीं इतकेंच नव्हे, तर त्या धर्मांचें परस्पर सांकर्य होऊन

---

क्यतेऽखिलम् ॥ अशक्यो ह्यनिदंरूपः स आत्मा बाधवर्जितः ॥ ३३ ॥ सिद्धं ब्रह्मणि सत्यत्वं ज्ञानत्वं तु पुरेरितम् ॥ स्वयमेवानुभूतित्वादित्यादिवचनैः स्फुटम् ॥ ३४ ॥ न व्यापित्वाद्देशतोऽतो नित्यत्वान्नापि कालतः ॥ न वस्तुतोऽपि सार्वात्म्यादानंत्यं ब्रह्मणि त्रिधा ॥ ३५ ॥ देशकालान्यवस्तूनां कल्पितत्वाच्च मायया ॥ न देशादिकृतोऽतोऽस्ति ब्रह्मानंत्यं स्फुटं ततः ॥ ३६ ॥ सत्यं ज्ञानमनंतं यद्ब्रह्म तद्वस्तु तस्य तत् ॥ ईश्वरत्वं च जीवत्वमुपाधिद्वयकल्पितम् ॥ ३७ ॥ शक्तिरस्त्यैश्वरी काचित्सर्ववस्तुनियामिका ॥ आनंदमयमारभ्य गूढा सर्वेषु वस्तुषु ॥ ३८ ॥ वस्तुधर्मा नियम्येरन् शक्त्या नैव यदा तदा ॥ अन्योन्यधर्मसां-

जगाची स्थितीच राहणार नाहीं. ॥ ३९ ॥ शि०—परंतु ती जड आहे असें तुम्हीच ह्मणतां, मग ती जगाचें नियमन तरी कसें करील. गु०—ती जरी जड आहे तरी तिजमध्यें ब्रह्माचें प्रतिबिंब पडल्यामुळें ती चेतनासारखी दिसते, म्हणून तिजमध्यें नियमन करण्याचें सामर्थ्यही संभवतें. या शक्तीच्या उपाधीचा संयोग झाल्यामुळें ब्रह्मालाच ईश्वरपणा आला. ॥ ४० ॥ आणि पूर्वीं सांगितलेल्या कोशांच्या उपाधीमुळें ब्रह्मालाच जीवपणा आला. शि०—अहो पण एकाच ब्रह्माला जीवत्व आणि ईश्वरत्व हे विरुद्ध धर्म कसे आले ? गु०—जसा एकच मनुष्य पुत्राच्या विवक्षेनें पिता होतो, आणि नातवाच्या विवक्षेनें पितामह म्हणजे आजा होतो. त्याप्रमाणें एकच ब्रह्म कोशविवक्षेनें जीव होतें, आणि मायेच्या विवक्षेनें ईश्वर होतें. ॥ ४१ ॥ परंतु पुत्र आणि नातु यांची विवक्षा न घेतल्यास जसा बापही नाहीं व आजाही नाहीं, त्याप्रमाणें माया व कोश यांची विवक्षा न केली तर ईश्वरही नाहीं व जीवही नाहीं. ॥ ४२ ॥ या रीतीनें जो ब्रह्म जाणतो तो स्वतः ब्रह्मच होतो. आतां ज्या अर्थीं ब्रह्माला जन्म नाहीं, त्या अर्थीं त्यालाही पुनर्जन्म नाहीं हें सिद्ध झालें. ॥ ४३ ॥

इति पंचकोशविवेकः समाप्तः ।

---

कर्याद्विप्लवेत जगत्खलु ॥ ३९ ॥ चिच्छायावेशतः शक्तिश्चेतनेव विभाति सा ॥ तच्छक्त्युपाधिसंयोगाद्ब्रह्मैवेश्वरतां व्रजेत् ॥ ४० ॥ कोशोपाधिविवक्षायां याति ब्रह्मैव जीवताम् ॥ पिता पितामहश्चैकः पुत्रपौत्रौ यथा प्रति ॥ ४१ ॥ पुत्रादेरविवक्षायां न पिता न पितामहः ॥ तद्वन्नेशो नापि जीवः शक्तिकोशाविवक्षणे ॥ ४२ ॥ य एवं ब्रह्म वेदैष ब्रह्मैव भवति स्वयम् ॥ ब्रह्मणो नास्ति जन्मातः पुनरेष न जायते ॥ ४३ ॥

## इति पंचदश्यां पंचकोशविवेकाख्यं तृतीयं प्रकरणं संपूर्णम् ॥ ३ ॥

इति पंचकोशविवेकः ॥

# सार्थपंचदश्याम्

## द्वैतविवेकाख्यम्

### चतुर्थं प्रकरणम् ।

गु०—ही सर्व द्वैतसृष्टि द्विविध आहे. इचा कांहीं भाग अंतर्यामी परमेश्वरानें उत्पन्न केला आहे, व कांहीं भाग जीवानें केला आहे. त्या दोनही भागांचें विवेचन करून तुला दाखवितों. म्हणजे त्यांपैकीं जीवानें कोणत्या भागाचा त्याग करावा हें तुला स्पष्ट समजेल. ॥ १ ॥ शि०—ही सृष्टि ईश्वरानें उत्पन्न केली याला प्रमाण काय ? गु०—या गोष्टीस श्रुतीचीं प्रमाणें पुष्कळ आहेत. " माया ही प्रकृति आहे; आणि त्या प्रकृतीस धारण करणारा परमेश्वर होय. तो मायी परमेश्वरच या सृष्टीस उत्पन्न करितो." अशा अर्थाच्या श्रुती श्वेताश्वतरशाखेंत आहेत. ॥ २ ॥ ऐतरेय उपनिषदांतही यास प्रमाण आहे. " हें जगत् पूर्वी आत्माच होतें. त्याच्या ईक्षणानेंच हें जग उत्पन्न झालें. तो संकल्पेंकरून लोकांप्रत उत्पन्न करिता झाला इत्यादि " ॥ ३ ॥ तैत्तिरीय श्रुतींतही असें सांगितलें आहे, " आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, ओषधी, अन्न, देह हीं क्रमेंकरून एकापासून एक अशीं, मूळब्रह्मापासूनच उत्पन्न झालीं. ॥ ४ ॥ मी एकाचा अनेक होईन. अशा संकल्पेंकरून तप करून सर्व जग उत्पन्न करिता झाला. " ॥ ५ ॥ छांदोग्य श्रुतींतही असेंच ह्मटलें आहे " हें जग पूर्वी एक सद्वस्तूच होतें. एकाचे अनेक व्हावे अशी त्यासच इच्छा झाली. तेज, उदक, अन्न, अंडज, जरायुज आणि उद्भिज्ज अशी सृष्टि त्यांतूनच उत्पन्न झाली. " ॥ ६ ॥ आतां अथर्ववेदाचें प्रमाण ऐक. " ज्याप्रमाणें प्रज्वलित अग्नीपासून ठिणग्या ( किठा ) बा-

---

अथ द्वैतविवेकः ॥ ईश्वरेणापि जीवेन सृष्टं द्वैतं विविच्यते ॥ विवेके सति जीवेन हेयो बंधः स्फुटीभवेत् ॥ १ ॥ मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥ स मायी सृजतीत्याहुः श्वेताश्वतरशाखिनः ॥ २ ॥ आत्मा वा इदमग्रेऽभूत्स ईक्षत सृजा इति ॥ संकल्पेनासृजल्लोकान्स एतानिति बह्वृचाः ॥ ३ ॥ खं वाय्वग्निजलोर्व्योषध्यन्नदेहाः क्रमादमी ॥ संभूता ब्रह्मणस्तस्मादेतस्मादात्मनोऽखिलाः ॥ ४ ॥ बहु स्यामहमेवातः प्रजायेयेति कामतः ॥ तपस्तप्त्वासृजत्सर्वं जगदित्याह तित्तिरिः ॥५॥ इदमग्रे सदेवासीद्बहुत्वाय तदैक्षत ॥ तेजोऽबन्नांडजादीनि ससर्जेति च सामगाः ॥ ६ ॥ विस्फुलिंगा यथा वन्हेर्जायंतेऽक्षरत-

हेर पडतात, त्याप्रमाणें सचेतन व अचेतन पदार्थ अक्षर ब्रह्मापासून उत्पन्न होतात. " ॥७॥ बृहदारण्यकांतही असेंच आहे. " हें जग पूर्वी अव्याकृत ह्मणजे विकाररहित होतें. तेंच पुढें नामरूपांहींकरून सविकार झालें. तीं नामरूपें विराडादि देहांत स्पष्ट आहेत. ॥ ८ ॥ विराट्, मनु, नर, गो, खर इत्यादिकांपासून तों पिपीलिकांपर्यंत सर्व द्वंद्वें ईश्वरानेंच उत्पन्न केलीं. असें वाजसनेयी म्हणतात. ॥ ९ ॥ या श्रुतींत आणखी असें सांगितलें आहे कीं, जीवसंबंधी एक विलक्षण रूप उत्पन्न करून ईश्वर देहाचेठायीं प्रवेश करिता झाला. देहाचेठायीं जें प्राणधारण तेंच जीवत्व समजावें ॥ १० ॥ शि०—जीवाचें लक्षण चांगलें स्पष्ट करून सांगावें. गु०— लिंगदेहकल्पनेस आधारभूत जें अधिष्ठानचैतन्य तें, त्यावर कल्पिलेला लिंगदेह व त्या लिंग-देहाचेठायीं असणारा जो चिदाभास तो, या तिहींस मिळून जीव असें म्हणतात. ॥ ११ ॥ शि०—जर देहाचेठायीं जीवरूपानें ईश्वरच प्रविष्ट झाला आहे, तर त्या जीवास अज्ञत्वदुःखित्वादि विरुद्ध धर्म कोठून आले ? ॥ १२ ॥ गु०—महेश्वरसंबंधी जी माया आहे, तिचे ठायीं सृष्टि उत्पन्न करण्याची जशी एक शक्ति आहे, तशीच तिच्या अंगीं मोह घालण्याचीही पण आहे. ती शक्ति जीवास मोहपाशांत घालून त्यास सच्चिदानंद स्वरूपाचा विसर पाडते. त्या मायामोहानें परतंत्र होऊन मी देह अशा अभिमानानें तो शोक करतो. एथवर ईश्वरसृष्टद्वैताचें संक्षेपतः वर्णन झालें. ॥ १३ ॥ शि०—आतां जीवसृष्टीविषयीं कांहीं प्रमाण असेल तर कृपा करून सांगावें. गु०—सप्तान्न ब्राह्मणाचेठायीं जीवसृष्ट द्वैताचें वर्णन केलें आहे, तें असें कीं, पिता, ( जीव ) ज्ञान व कर्म ईहींकरून सात प्रकारचीं अन्नें उत्पन्न करिता झाला. ॥ १४ ॥ शि०—सात अन्नें उत्पन्न करण्याचें कारण काय ? गु०—त्यांचा विनियोग असा आहे. मनुष्याकरितां एक अन्न, पशूकरितां एक, देवाकरितां दोन आणि आ-

---

स्तथा ॥ विविधाश्चिज्जडा भावा इत्याथर्वणिका श्रुतिः ॥ ७ ॥ जगदव्याकृतं पूर्वमासीद्व्याक्रियताधुना ॥ दृश्याभ्यां नामरूपाभ्यां विराडादिषु ते स्फुटे ॥ ८ ॥ विराण्मनुर्नरा गावः खराश्वाजावयस्तथा ॥ पिपीलिकावधि द्वंद्वमिति वाजसनेयिनः ॥९॥ कृत्वा रूपांतरं जैवं देहे प्राविशदीश्वरः ॥ इति ताः श्रुतयः प्राहुर्जीवत्वं प्राणधारणात् ॥१०॥ चैतन्यं यदधिष्ठानं लिंगदेहश्च यः पुनः ॥ चिच्छाया लिंगदेहस्था तत्संघो जीव उच्यते ॥ ११ ॥ माहेश्वरी तु माया या तस्या निर्माणशक्तिवत् ॥ विद्यते मोहशक्तिश्च तं जीवं मोहयत्यसौ ॥ १२ ॥ मोहादनीशतां प्राप्य मग्नो वपुषि शोचति ॥ ईशसृष्टमिदं द्वैतं सर्वमुक्तं समासतः ॥ १३ ॥ सप्तान्नब्राह्मणे द्वैतं जीवसृष्टं प्रपंचितम् ॥ अन्नानि सप्त ज्ञानेन कर्मणा जनयत्पिता ॥ १४ ॥ मर्त्यान्नमेकं देवान्ने द्वे पश्वन्नं चतु-

न्याकरितां तीन ॥ १५ ॥ व्रीह्यादिक मनुष्याकारितां; दर्शपूर्णमास देवाकरितां; क्षीर पशूक-रितां आणि मन, वाणी व प्राण हीं आत्म्याकरितां अशीं सात अन्नें समजावीं. ॥ १६ ॥ शि०—मग हीं अन्नें ईशनिर्मितच झालीं. तीं जीवनिर्मित कशीं ? गु०—हीं अन्नें जरी स्वरूपतः ईश्वरानें निर्माण केलीं, तथापि ज्ञानकर्मांच्या योगानें त्यांस अन्नत्व जीवानेंच दिलें आहे म्हणून त्यांचें भोग्यत्व त्यानेंच निर्माण केलें आहे असें समजावें ॥ १७ ॥ ईश्वराची कृति आणि जीवाचा भोग या दोहोंनीं हें जग बनलें आहे. म्हणजे ईश्वरानें सृष्टि करावी आणि ती जीवांनीं भोगावी. यास दृष्टांत पित्यानें उत्पन्न केलेली कन्या जशी भर्त्यास भोग्य होते; तद्वत्. शि०—ईश्वर कोणत्या साधनानें सृष्टि करतो, ? व जीव कोणत्या साधनानें करतो ? ॥ १८ ॥ गु०—मायावृत्त्यात्मक जो संकल्प तो ईशसृष्टीचें साधन होय आणि मनोवृत्त्यात्मक जो संकल्प तो जीवसृष्टीचें म्हणजे भोगाचें साधन होय. शि०—ईश्वरानें उत्पन्न केलेल्या पदार्थांत जीवानें निर्माण केलेला भोग्यत्वाकार आहे म्हणतात तो कोठें आहे ? ॥ १९ ॥ गु०—ईश्वरानें निर्माण केलेल्या एकाच रत्नादि पदार्थांचे ठायीं भोक्त्याच्या मनाच्या नानाविध वृत्तींच्या योगें नानाप्रकारचे भोग घडतात. ॥ २० ॥ शि०—ते कसे ? गु०—कल्पना कर कीं, तीन पुरुष एका मार्गानें जात असतां त्यांच्या दृष्टीस एक रत्न पडलें. तें घ्यावयास त्यांपैकीं दोघे धांवले. त्यांत जो पुढें गेला त्यास तें मिळालें व तेणेंकरून त्यास परम आनंदही झाला. जो मागें राहिला, त्यास तें न मिळाल्यामुळें वाईट वाटून तो संतापला; आणि तिसरा जो विरक्त होता त्यास हर्ष व शोक हे दोन्ही झाले नाहींत. ॥ २१ ॥ शि०—मग यांत जीवसृष्टि कोणती व ईशसृष्टि कोणती ? गु०—यांत प्रियत्व, अप्रियत्व आणि उपेक्ष्यत्व असे जे तीन गुण रत्नाच्याठायीं आले, ते तिघां पुरुषांनीं क्रमेंकरून उत्पन्न केले, म्हणून ते जीवसृष्ट होत; आणि तिहींमध्यें साधारण

---

र्थकम् ॥ अन्यत्रितयमात्मार्थमन्नानां विनियोजनम् ॥ १५ ॥ व्रीह्यादिकं दर्शपूर्णमासौ क्षीरं तथा मनः ॥ वाक् प्राणश्चेति सप्तत्वमन्नानामवगम्यताम् ॥ १६ ॥ ईशेन यद्यप्येतानि निर्मितानि स्वरूपतः ॥ तथापि ज्ञानकर्मभ्यां जीवोऽकार्षीत्तदन्नताम् ॥ १७ ॥ ईशकार्यं जीवभोग्यं जगद् द्वाभ्यां समन्वितम् ॥ पितृजन्या भर्तृभोग्या यथा योषित्तथेष्यताम् ॥ १८ ॥ मायावृत्त्यात्मको हीशसंकल्पः साधनं जनौ ॥ मनोवृत्त्यात्मको जीवसंकल्पो भोगसाधनम् ॥ १९ ॥ ईशनिर्मितमण्यादौ वस्तुन्येकविधे स्थिते ॥ भोक्तृधीवृत्तिनानात्वात्तद्भोगो बहुधेष्यते ॥ २० ॥ हृष्यत्येको मणिं लब्ध्वा क्रुध्यत्यन्यो ह्यलाभतः ॥ पश्यत्येव विरक्तोऽत्र न हृष्यति न कुप्यति ॥ २१ ॥ प्रियोऽप्रिय उपेक्ष्यश्चेत्याकारा मणिगास्त्रयः ॥ सृष्टा जीवैरीशसृष्टं रूपं साधारणं

जें रत्नरूप तें ईश्वरनिर्मित होय. ॥ २२ ॥ शि०—हें माझ्या ध्यानांत नीट येईना; याक-रितां अधिक स्पष्ट करून सांगावें. गु०— तुला आणखी एक दृष्टांत सांगतों म्हणजे चांगलें समजेल. स्त्री स्वरूपतः एकच असून संबंधभेदानें, नवऱ्यास बायको, सासवेस सून, भावजयीस नणंद आणि पुत्रास माता झाली. येथें स्त्री ही ईशसृष्टि होय; आणि तिच्याठायीं बायको, सून, नणंद इत्यादि कल्पना जीवाच्या आहेत. ॥ २३ ॥ शि०—आपण दिलेल्या दृष्टांतांत बायको एकच असून तिजवर केलेल्या जीवांच्या कल्पना मात्र भिन्न आहेत, परंतु बायकोच्या आकारांत कांहीं भेद नाहीं, मग जीवानें अधिक काय निर्माण केलें ? ॥ २४ ॥ गु०—अधिक कसें केलें नाहीं ? येथें दोन स्त्रिया झाल्या, एक मांसमयी आणि एक मनोमयी. मांसमयी ही ईशकृत असून ती एकच आहे. पण मनोमयी स्त्रिया जीवानें निर्माण केल्या आहेत; व त्या भिन्न आहेत. ॥ २५ ॥ शि०—भ्रांति, स्वप्न, मनोराज्य व स्मृति इत्यादि अवस्थांमध्यें भासणारे पदार्थ मनोमय आहेत; असें म्हणतां येईल. कारण तेथें बाह्य विषय नाहींत; परंतु जागृतींत प्रत्यक्ष दिसणाऱ्या पदार्थांस मनोमय असें कसें ह्मणावें. ॥ २६ ॥ गु०—होय तूं म्हणतोस तें खरें. परंतु बाह्यविषय जरी असले तरी विषयाकार प्रत्यक्ष होण्याला विषय आणि मन या दोहोंचा संयोग झाला पाहिजे. हें सांगणें आमच्या पदरचें नव्हे. भाष्यकारांनीं व वार्तिककारांनींही असाच सिद्धांत केला आहे ॥ २७ ॥ भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, ज्याप्रमाणें मुशींत ओतलेलें तांबें तिच्यासारखेंच होतें त्याप्रमाणें रूपादिक विषयांस व्यापणारें चित्त खरोखर तत्तद्विषयाकार झाल्यासारखें दिसतें. ॥ २८ ॥ अथवा दुसरा दृष्टांत. ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश ज्या ज्या पदार्थावर पडेल, त्या त्या पदार्थासारखा त्याचा आकार बनतो त्याप्रमाणें बुद्धि ही सर्व पदार्थांची प्रकाशक असल्यामुळें ती ज्या पदार्थास व्यापिते त्या पदार्थाप्रमाणें तिचा आकार होतो. ॥ २९ ॥ आतां वार्तिकका-

---

तिषु ॥ २२ ॥ भार्या स्नुषा ननांदा च याता मातेत्यनेकधा ॥ प्रतियोगिधिया योषिद्भिद्यते न स्वरूपतः ॥ २३ ॥ ननु ज्ञानानि भिद्यंतामाकारस्तु न भिद्यते ॥ योषिद्वपुष्यतिशयो न दृष्टो जीवनिर्मितः ॥ २४ ॥ मैवं मांसमयी योषित्काचिदन्या मनोमयी ॥ मांसमय्या अभेदेऽपि भिद्यते हि मनोमयी ॥ २५ ॥ भ्रांतिस्वप्नमनोराज्यस्मृतिष्वस्तु मनोमयम् ॥ जाग्रन्मानेन मेयस्य न मनोमयतेति चेत् ॥ २६ ॥ बाढं माने तु मेयेन योगात्स्याद्विषयाकृतिः ॥ भाष्यवार्तिककाराभ्यामयमर्थ उदीरितः ॥ २७ ॥ मूषासिक्तं यथा ताम्रं तन्निभं जायते तथा ॥ रूपादीन्व्याप्नुवच्चित्तं तन्निभं दृश्यते ध्रुवम् ॥ २८ ॥ व्यंजको वा यथाऽऽलोको व्यंग्यस्याकारतामियात् ॥ सर्वार्थव्यंजकत्वाद्धीरर्थाकारा प्रदृश्यते ॥ २९ ॥ मातुर्मानाभिनिष्पत्तिर्निष्पन्नं मेयमेति

यांचें वचन ऐक. कोणताही पदार्थ गोचर होतांना प्रथमतः चिदाभासापासून मनोवृत्ति उत्पन्न होते. ती उत्पन्न झाल्यानंतर घटादि विषयांवर जाऊन आदळते. तदनंतर त्या विषयांस व्यापून त्यांसारखाच तिचा आकार बनतो. ॥ ३० ॥ शि०—मग पुढें काय ह्मणतां ? गु०—या वार्तिककारांच्या व भाष्यकारांच्या वचनांवरून सहज लक्षांत येईल कीं, घटज्ञान होतेवेळीं दोन घट असतात. एक मातीचा व दुसरा मनाचा. मातीचा घट मनास गोचर होतो, व मनाचा साक्षीस गोचर होतो. ॥ ३१ ॥ याप्रमाणें ईशनिर्मित व जीवनिर्मित अशी दोन प्रकारची द्वैतसृष्टि सिद्ध झाली. यास अन्वयव्यतिरेक लावून पाहिलें असतां मनोमय सृष्टीच जीवाच्या सुखदुःखांस कारण आहे असें समजेल. कारण जोंपर्यंत हा मानस प्रपंच आहे, तोंपर्यंत जीवास सुखदुःखें होतात, आणि त्याच्या अभावीं सुखही नाहीं व दुःखही नाहीं. ॥ ३२ ॥ यास उदाहरण. बाहेरील पदार्थ नसूनही मनुष्यास स्वप्नाचेठायीं सुखदुःखें होतात; आणि ते पदार्थ सभोंवार असूनही समाधि, निद्रा व मूर्च्छा इत्यादि अवस्थांमध्यें मनुष्यास सुखदुःखांची बाधा मुळींच होत नाहीं. ॥ ३३ ॥ मनोमय प्रपंचच सुखदुःखांस कारण आहे याविषयीं आणखी एक उत्कृष्ट उदाहरण देतों, ह्मणजे स्पष्ट समजेल. कल्पना कर कीं एका गृहस्थाचा पुत्र दूरदेशीं गेला आहे. तेथें तो सुखरूप व सुरक्षित असूनही एका ठगानें त्यास असें सांगितलें कीं, तुमचा पुत्र मेला; हें वचन ऐकून तो पुत्रशोकानें खरोखरच रडूं लागतो. ॥३४॥ बरें आतां याच्या उलट पहा. समज कीं, तो त्याचा पुत्र खरोखरच मेला. पण बापाच्या कानीं ती वार्ता जोंपर्यंत आली नाहीं; तोंपर्यंत त्याला त्याचें कांहींच वाटत नाहीं; तो खुशाल आनंदांत असतो. तस्मात् ही मानससृष्टीच जीवाच्या सुखदुःखांस कारण आहे, हें सिद्ध झालें. ॥ ३५ ॥ शि०—पण असें जर ह्मणावें, तर बाह्य जगताचा कांहींच उपयोग नाहींसा होऊन बौद्धांचा जो विज्ञानवाद तो स्वीकारल्यासारखा होईल ? गु०—विज्ञानवाद कसा होतो ? बौद्ध आपल्या विज्ञानवादांत बाह्य जग मुळींच कबूल करीत नाहींत. ते ह्मणतात कीं, यावत्किंचित् सर्व जग बुद्धीचेंच बनलें आहे. तसें आमचें ह्मणणें नाहीं. आमचें ह्मणणें असें आहे

---

तत् ॥ मेयाभिसंगतं तच्च मेयाभत्वं प्रपद्यते ॥ ३० ॥ सत्येवं विषयौ द्वौ स्तो घटौ मृन्मयधीमयौ ॥ मृन्मयो मानमेयः स्यात् साक्षिभास्यस्तु धीमयः ॥ ३१ ॥ अन्वयव्यतिरेकाभ्यां धीमयो जीवबंधकृत् ॥ सत्यस्मिन् सुखदुःखे स्तस्तस्मिन्नसति न द्वयम् ॥ ३२ ॥ असत्यपि च बाह्यार्थे स्वप्नादौ बध्यते नरः ॥ समाधिसुप्तिमूर्च्छासु सत्यप्यस्मिन्न बध्यते ॥ ३३ ॥ दूरदेशं गते पुत्रे जीवत्येवात्र तत्पिता ॥ विप्रलंभकवाक्येन मृतं मत्वा प्ररोदिति ॥ ३४ ॥ मृतेऽपि तस्मिन्वार्तायामश्रुतायां न रोदिति ॥ अतः जीवस्य बंधकृन्मानसं जगत् ॥ ३५ ॥ विज्ञानवादो बाह्यवैयर्थ्यादिहेति चेत् ॥ न हृद्याकारमाधातुं बाह्यस्यापे-

कीं, जरी जीवाच्या सुखदुःखांस कारण हा मानस प्रपंच आहे, तथापि तो होण्याला बाह्य जगाची आवश्यकता आहे. तें बाह्य जग मुळींच नाहीं असें आमचें मत नाहीं. मग विज्ञानवाद् कसा होईल ? ॥ ३६ ॥ शि०—बाह्य सृष्टि जर सुखदुःखांस कारण नाहीं, तर ती असून नसल्यासारखीच झाली. मग विज्ञानवादांत आणि तुमच्या म्हणण्यांत भेद तो काय ? गु०—भेद आहे तर. नाहीं कसा ? अरे बाह्य सृष्टि निरुपयोगी झाली म्हणून ती मुळींच नाहीं, असें ह्मणतां येणार नाहीं. अमुक वस्तु आहे, असें सिद्ध करण्यास तिच्या अस्तित्वाबद्दल चांगलें प्रमाण असलें ह्मणजे झालें; तिच्या प्रयोजनाची मुळींच अपेक्षा नाहीं. ॥३७॥ शि०—आपल्या ह्मणण्याप्रमाणें जीवाच्या बंधासही मानस सृष्टीच जर कारण आहे तर तिच्या निवारणार्थ चित्तनिरोधरूप योगाभ्यास केला ह्मणजे झालें. मग आणखी ब्रह्मज्ञान कशाला पाहिजे ? ॥ ३८ ॥ गु०—अरे बाबा. योगाभ्यासानें द्वैतशांति जरी झाली तरी ती तेवढ्या वेळेपुरती मात्र होते. परंतु एकदां हें मानसजग नाहींसें झाल्यानंतर पुनः उत्पन्न होऊं नये अशा प्रकारची जर शांति पाहिजे तर ती ब्रह्मज्ञानावांचून कधींही होणार नाहीं. असा वेदांताचा डंका वाजत आहे. ॥ ३९ ॥ शि०—बाह्य जग ( ईशसृष्टि ) अगदीं नाहींसें झाल्यावांचून ब्रह्मज्ञान कसें होईल ? गु०—ज्ञान होण्यास ईशसृष्टीच्या निवारणाची मुळींच गरज नाहीं. ती जरी आहे तशीच असली तरी ती मिथ्या आहे अशी पक्की खात्री झाली असतां, अद्वैत ब्रह्माचें ज्ञान होण्यास कोणतीच नड नाहीं. ॥ ४० ॥ शि०—ईशसृष्टि मिथ्या आहे, इतकेंच केवळ समजल्यानें ब्रह्मज्ञान कसें होईल ? ती अगदीं नाहींशीच केली पाहिजे असें मला वाटतें. गु०—अरे तिची निवृत्ति प्रलयकाळीं होत नाहीं काय ? मग तेव्हां कोठें ब्रह्मज्ञान होतें ? प्रलयकालीं गुरुशास्त्रादिक ज्ञानसाधनांचा अभाव असल्यामुळें उलटा ज्ञानास प्रतिबंधच होईल. तेव्हां विरोधि द्वैताभाव जरी झाला तरी अद्वैतज्ञान होणें अशक्य आहे. ॥ ४१ ॥ तस्मात् या ईश्वरनिर्मित सृष्टीपासून मुळींच हानि नाहीं. इतकेंच नव्हे, तर तिजपासून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें गुरुशास्त्रादिकांच्या संबंधानें उलटा फायदाच आहे. बरें तिचें निवारण करणें तरी शक्य आहे ह्मणावें तर तेंही असाध्यच; मग ती असेना

---

क्षितत्वतः ॥ ३६ ॥ वैयर्थ्यमस्तु वा बाह्यं न वारयितुमीश्महे ॥ प्रयोजनमपेक्षंते न मानानीति हि स्थितिः ॥ ३७ ॥ बंधश्चेन्मानसं द्वैतं तन्निरोधेन शाम्यति ॥ अभ्यसेद्योगमेवातो ब्रह्मज्ञानेन किं वद ॥ ३८ ॥ तात्कालिकद्वैतशांतावप्यागामिजानिक्षयः ॥ ब्रह्मज्ञानं विना न स्यादिति वेदांतडिंडिमः ॥ ३९ ॥ अनिवृत्तेऽपीशसृष्टे द्वैते तस्य मृषात्मताम् ॥ बुध्द्वा ब्रह्माद्वयं बोद्धुं शक्यं वस्त्वैक्यवादिनः ॥ ४० ॥ प्रलये तन्निवृत्तौ तु गुरुशास्त्राद्यभावतः ॥ विरोधि द्वैताभावेऽपि न शक्यं बोद्धुमद्वयम् ॥ ४१ ॥ अबाधकं साधकं च द्वैतमीश्वरनिर्मितम् ॥ अपनेतुमश-

बापडी, तिचा उगीच कां तिरस्कार करितोस ? ॥ ४२ ॥ हें जीवद्वैत दोन प्रकारचें आहे. एक शास्त्रीय व दुसरें अशास्त्रीय, यांपैकीं अशास्त्रीय द्वैतप्रपंचाचा मात्र मुमुक्षूनें त्याग करावा. परंतु तत्त्वज्ञान होईपर्यंत शास्त्रीय द्वैत सहसा टाकूं नये. ॥ ४३ ॥ शि०—शास्त्रीय द्वैत ह्मणजे काय ? गु०—श्रवण, मनन व निदिध्यासनरूप जो ब्रह्मविचार व त्याचीं साधनें, यांसच शास्त्रीयद्वैत ह्मणतात. हा मानस प्रपंच तत्त्वबोध झाल्यानंतर सोडून द्यावा. अशी श्रुतींची आज्ञा आहे. शि०—तर मग ( आसुप्तेरामृतेःकालं नयेद्वेदांतचिंतया ) ह्मणजे मुमुक्षूंनीं सर्व आयुष्य वेदांतचिंतनांत घालवावें, असें जें शास्त्रानें सांगितलें त्याचा अर्थ काय ? गु०—त्याचा अर्थ इतकाच कीं, कामादि षड्रिपूंना मनांत येण्यास अगदीं अवकाशच देऊं नये; ह्मणून तसें शास्त्रानें सांगितलें. एऱ्हवीं तत्त्वज्ञान झाल्यावर शास्त्रीय द्वैताची मुळींच गरज नाहीं. ॥ ४४ ॥ शि०—बरें याजविषयीं श्रुतींची आज्ञा आहे असें तुह्मीं ह्मटलें तर त्या श्रुती कोणत्या ? गु०— त्या श्रुतींचा अभिप्राय तुला सांगतों. बुद्धिमान् मुमुक्षूनें शास्त्रांचें अध्ययन व पुनः पुनः अभ्यास करून परब्रह्माचें ज्ञान झालें ह्मणजे उल्केप्रमाणें त्यांचा त्याग करावा; ही एक श्रुति. ॥ ४५ ॥ दुसरी श्रुति असें ह्मणते कीं, बुद्धिमान् मुमुक्षूनें शास्त्रांचा अभ्यास करून, धान्यार्थी जसा कोंडा टाकून देतो तद्वत् सर्व ग्रंथांचा त्याग करावा. ॥ ४६ ॥ तिसरी श्रुति ह्मणते कीं, त्या एका आत्म्याला मात्र जाणून धीर पुरुषानें बुद्धीचा निश्चय करावा. पुष्कळ शब्दांचें अध्ययन करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. उगीच वाणीला श्रम मात्र होतो. ॥ ४७ ॥ चौथी ह्मणते कीं, त्या आत्म्याला मात्र नीट जाणून घ्या. आत्मविचारावांचून इतर भाषणच सोडून द्या. वाणी आणि मन यांचें नियमन करावें. इत्यादि श्रुतींचीं स्फुट वचनें आहेत. ॥ ४८ ॥ शि०—एथवर शास्त्रीय द्वैत झालें. आतां अशास्त्रीय द्वैताविषयीं कांहीं सांगावें. गु०—अशास्त्रीय द्वैतामध्यें आणखी तीव्र आणि मंद असे अवांतर दोन भेद आहेत. कामक्रोधाधिक जे मनोविकार ते तीव्र आणि मनोराज्य हें मंद होय. ॥ ४९ ॥

---

कथं चेत्यास्तां तद्द्विष्यते कुतः ॥ ४२ ॥ जीवद्वैतं तु शास्त्रीयमशास्त्रीयमिति द्विधा ॥ उपाददीत शास्त्रीयमातत्त्वस्यावबोधनात् ॥ ४३ ॥ आत्मब्रह्मविचाराख्यं शास्त्रीयं मानसं जगत् ॥ बुद्धे तत्त्वे तच्च हेयमिति श्रुत्यनुशासनम् ॥ ४४ ॥ शास्त्राण्यधीत्य मेधावी अभ्यस्य च पुनः पुनः ॥ परमं ब्रह्म विज्ञाय उल्कावत्तान्यथोत्सृजेत् ॥ ४५ ॥ ग्रंथमभ्यस्य मेधावी ज्ञानविज्ञानतत्परः ॥ पलालमिव धान्यार्थी त्यजेद् ग्रंथमशेषतः ॥ ४६ ॥ तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः ॥ नानुध्यायाद्बहून् शब्दान् वाचो विग्लापनं हि तत् ॥ ४७ ॥ तमेवैकं विजानीथ ह्यन्या वाचो विमुंचथ ॥ यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञ इत्याद्याः श्रुतयः स्फुटाः ॥४८॥ अशास्त्रीयमपि द्वैतं तीव्रं मंदमिति द्विधा ॥ कामक्रोधादिकं

शि०—मग या अशास्त्रीय द्विविध द्वैताचा त्याग केव्हां करावा ? गु०—ज्ञानप्राप्ति होण्याकरितां, या दोन्ही द्वैतांचा त्याग तत्त्वज्ञानापूर्वींच केला पाहिजे. कारण शांति व समाधि हीं श्रुतींत ब्रह्मज्ञानाच्या साधनांमध्यें गणलीं आहेत. ॥ ५० ॥ शि०—तर मग तत्त्वज्ञानानंतर त्यांचा स्वीकार करावा असें होतें काय ? गु०—अरे पूर्वीं त्याग करावा असें ह्मटल्यावर नंतर त्याचा स्वीकार करावा कीं काय ? जीवन्मुक्ति संपादन करण्याकरितां तत्त्वज्ञानानंतरही त्याचा त्याग केलाच पाहिजे. कारण कामक्रोधादिक्लेशबंध ज्याला आहेत त्याला जीवन्मुक्ति कधींही प्राप्त होणार नाहीं. ॥ ५१ ॥ शि०—जर तत्त्वज्ञानानें मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतो असा सिद्धांत आहे, तर तितक्यानेंच कृतार्थता होते; मग आणखी जीवन्मुक्ति ती कशाला पाहिजे ? ती नसली तरी चालेल. गु०—ऐहिक भोग नाहींसे होतात या भयानें जर तुला जीवन्मुक्तीचा कंटाळा आला तर पुढील जन्मांतील सुखोपभोग अंतरतील. ह्मणून पुनर्जन्माचीही इच्छा कर. जीवन्मुक्ति जर नको तर तुला विदेहमुक्ति तरी कशाला पाहिजे. जन्म असेना बापडा. यज्ञादिकेंकरून स्वर्गप्राप्ति मिळवून धन्य हो ह्मणजे झालें. ॥ ५२ ॥ शि०—स्वर्गांतील सुख नित्य नाहीं, तर त्याला क्षय व वृद्धि आहे, ह्मणून स्वर्ग त्याज्य आहे, गु०—क्षयवृद्धिरूप दोषामुळें जर स्वर्ग त्याज्य आहे, तर मूर्तिमंत केवळ दोषच असे जे कामक्रोधादिक त्यांचा त्याग कां बरें करूं नये. ॥ ५३ ॥ शि०—एकदां तत्त्वज्ञान झाल्यानंतर ऐहिक भोगापुरते कामादिक जरी उत्पन्न झाले तरी काय नड आहे ? गु०—बाबारे, जर विषयलोभ न सोडशील तर विधिनिषेधशास्त्राचें उल्लंघन होऊन मनास वाटेल तसें आचरण करून अगदीं बहकशील. ॥ ५४ ॥ शि०—ज्ञान्यानें यथेष्टाचरण केलें ह्मणून काय झालें ? गु०—सुरेश्वराचार्य असें ह्मणतात कीं, अद्वैततत्त्वाचा बोध होऊन देखील जर मनुष्य यथेष्टाचरणांत पडला, तर तो अभक्ष्य देखील भक्षण करील. काय पाहिजे तें करील, मग तसें झाल्यावर त्याला आणि कुतऱ्याला भेद काय राहिला. शि०—मग काय झालें ? ॥ ५५ ॥

---

तीव्रं मनोराज्यं तथेतरत् ॥ ४९ ॥ उभयं तत्त्वबोधात् प्राङ् निवार्यं बोधसिद्धये ॥ शमः समाहितत्वं च साधनेषु श्रुतं यतः ॥ ५० ॥ बोधादूर्ध्वं च तद्धेयं जीवन्मुक्तिप्रसिद्धये ॥ कामादिक्लेशबंधेन युक्तस्य न हि मुक्तता ॥ ५१ ॥ जीवन्मुक्तिरियं मा भूज्जन्माभावे त्वहंकृती ॥ तर्हि जन्मापि तेऽस्त्वेव स्वर्गमात्रात्कृती भवान् ॥ ५२ ॥ क्षयातिशयदोषेण स्वर्गो हेयो यदा तदा ॥ स्वयं दोषतमात्मायं कामादिः किं न हीयते ॥ ५३ ॥ तत्त्वं बुध्दापि कामादीन्निःशेषं न जहासि चेत् ॥ यथेष्टाचरणं ते स्यात्कर्मशास्त्रातिलंघिनः ॥ ५४ ॥ बुद्धाद्वैतसतत्त्वस्य यथेष्टाचरणं यदि ॥ शुनां तत्त्वदृशां चैव को भेदोऽशुचिभक्षणे ॥ ५५ ॥

गुं०—अहाहा ! ! तुझ्या ह्या ज्ञानाचें वैभव काय सांगावेंरे ! ! तत्त्वज्ञान होण्यापूर्वीं कामक्रोधादि क्लेश मात्र भोगावे लागले, आणि आतां तर ज्ञान झाल्यावर सर्व लोकांकडून छी थू ह्मणून घ्यावें लागेल. वाहवारे वाहवा. ॥ ५६ ॥ शि०—मग आपलें ह्मणणें काय तें तरी समजूं द्या ! गु०—बाबारे आमचें ह्मणणें इतकेंच कीं, तूं आतां तत्त्ववेत्ता झालास त्याअर्थीं डुकरासारखा वागण्यास इच्छूं नको. कामक्रोधादिक बुद्धीचे दोष काढून टाक; आणि सर्व लोकांकडून देवासारखी पूजा घे. ॥ ५७ ॥ शि०—ते दोष काढून टाकण्यास उपाय कोणता ? गु०—विषयदोषदर्शनादि उपाय योजले असतां कामक्रोधादिकांचा त्याग होतो. हे उपाय मोक्षशास्त्रांत प्रसिद्ध आहेत, त्यांचा चांगला शोध करून सुखी हो. ॥ ५८ ॥ शि०—कामादिक विकारांपासून मोठमोठे अनर्थ होतात, ह्मणून त्यांचा त्याग केला पाहिजे हें योग्य आहे. परंतु मनोराज्य असल्यानें काय हानि आहे ? गु०—बाबारे कामादिक पुरवले पण मनोराज्य नको. तें तर सर्व दोषांचें मूळ होय. ह्मणून त्याचा त्याग अगदींच केला पाहिजे. त्यापासून मोठी हानि आहे, असें भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें आहे. ॥ ५९ ॥ शि०—भगवंतांनीं काय सांगितलें ? गु०—भगवद्वाक्य असें आहे कीं,—विषयाचें जें चिंतन त्यापासून संसर्ग घडतो. संसर्गापासून काम, कामापासून क्रोध, क्रोधापासून मोह आणि मोहापासून शेवटीं नाश होतो. एवढ्या अनर्थास कारण मनोराज्य होय. ॥ ६० ॥ शि०—बरें पण हें मनोराज्य जिंकावें कसें ? गु०—निर्विकल्प समाधीच्या योगानें हें जिंकतां येतें. हा निर्विकल्प समाधि साधण्यास आधीं सविकल्प समाधीचा अभ्यास केला पाहिजे, ह्मणजे हळुहळू तो साध्य होतो. ॥ ६१ ॥ शि०—परंतु हा समाधि साधण्यास तरी अष्टांगयोग केला पाहिजे. पण तो ज्याला साध्य होत नाहीं त्याणें काय करावें ? गु०—मनोराज्य जिंकण्यास आणखी एक उत्तम साधन आहे, ज्याला चांगलें तत्त्व समजलें आहे, व ज्याच्या मनांतील कामक्रोधादिक दोष जाऊन मन अगदीं स्वच्छ झालें आहे, अशा पुरुषानें, एकांतीं बसून गुरूपदिष्ट प्रणवाचा दीर्घ उच्चार केला असतां मनोराज्य नाहींसें होतें. ॥ ६२ ॥

---

बोधात्पुरा मनोदोषमात्रात्क्लिष्टोऽस्यथाधुना ॥ अशेषलोकनिंदा चेत्यहो ते बोधवैभवम् ॥ ५६ विड्वराहादितुल्यत्वं मा कांक्षीस्तत्त्वविद्भवान् ॥ सर्वधीदोषसंत्यागाल्लोकैः पूज्यस्व देववत् ॥५७॥ काम्यादिदोषदृष्ट्याद्याः कामादित्यागहेतवः ॥ प्रसिद्धा मोक्षशास्त्रेषु तानन्विष्य सुखी भव ॥ ५८ ॥ त्यज्यतामेष कामादिर्मनोराज्ये तु का क्षतिः ॥ अशेषदोषबीजत्वात्क्षतिर्भगवतेरिता ॥ ५९ ॥ ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ॥ संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६० ॥ शक्यं जेतुं मनोराज्यं निर्विकल्पसमाधितः ॥ सुसंपादः क्रमात्सोऽपि सविकल्पसमाधिना ॥ ६१ ॥ बुद्धतत्त्वेन धीदोषशून्येनैकांतवासिना ॥ दीर्घं

शि०—बरें,या रीतीनें मनोराज्य जिंकल्यानंतर पुढें काय होतें ? गु०—ज्याप्रमाणें मुका वाग्व्यवहाररहित होऊन उगाच बसतो, त्याप्रमाणें मनोराज्य जिंकलें ह्मणजे मन सर्वव्यापाररहित होऊन उगीच बसतें. या दशेचें वर्णन वसिष्ठानें रामचंद्रास पुष्कळ प्रकारेंकरून दाखविलें आहे. ॥ ६३ ॥ शि०—वसिष्ठ ऋषींनीं काय सांगितलें आहे ? गु०—वसिष्ठ ह्मणतात कीं, आत्म्यावांचून दुसरा दृश्य पदार्थच नाहीं, असा पक्का निश्चय करून सर्व दृश्याचें लयसाक्षित्व संपादन केलें असतां निरतिशय मोक्षसुखाची प्राप्ति होते. ॥ ६४ ॥ कितीही शास्त्रें धुंडाळिलीं, व कितीही वादविवाद केला, तरी शेवटीं सर्वांचा फलितार्थ ह्मणून इतकाच कीं, सकल वासनांचा त्याग करून मनाची तूष्णीं स्थिति संपादन केल्यावांचून उत्तम पदाची प्राप्ति होत नाहीं. ॥ ६५ ॥ शि०—अशी मनाची निर्विकल्प स्थिति होऊनही भोगदायक प्रारब्धकर्माच्या योगानें पुनः विक्षेप झाला असतां त्याचा परिहार कसा करावा ? गु०—त्याला दुसरा उपाय नाहीं. पुनः पुनः अभ्यास करून चित्त स्थिर करावें. ॥ ६६ ॥ ज्याच्या चित्ताला कधींही विक्षेप होत नाहीं तो ब्रह्मवेत्ता ह्मणणें देखील औपचारिकच. वास्तविक तो ब्रह्मच आहे, असें वेदांत पारंगत ऋषि ह्मणतात. ॥ ६७ ॥ याविषयीं वसिष्ठानींहीं असेंच सांगितलें आहे. तें असें ह्मणतात कीं, मला ब्रह्म समजलें, व न समजलें असें जें ब्रह्माचें ज्ञान आणि अज्ञान या दोहोंचाही त्याग करून जो केवळ अद्वैत चैतन्य मात्र होऊन जातो, तो वास्तविक ब्रह्मच होय; ब्रह्मवेत्ता नव्हे. ॥ ६८ ॥ जीवद्वैताच्या अत्यंत त्यागानें जीवन्मुक्तीची परा काष्ठा ( शेवटची स्थिति ) प्राप्त होते. या कारणास्तव आज आह्मीं ईशसृष्टीपासून जीवसृष्टि निराळी करून दाखविली. ॥ ६९ ॥

द्वैतविवेक समाप्त ।

---

प्रणवमुच्चार्य मनोराज्यं विजीयते ॥ ६२ ॥ जिते तस्मिन्वृत्तिशून्यं मनस्तिष्ठति मूकवत् ॥ एतत्पदं वसिष्ठेन रामाय बहुधेरितम् ॥ ६३ ॥ दृश्यं नास्तीति बोधेन मनसो दृश्यमार्जनम् ॥ संपन्नं चेत्तदुत्पन्ना परा निर्वाणनिर्वृतिः ॥ ६४ ॥ विचारितमलं शास्त्रं चिरमुद्ग्राहितं मिथः ॥ संत्यक्तवासनान्मौनादृते नास्त्युत्तमं पदम् ॥ ६५ ॥ विक्षिप्यते कदाचिद्धीः कर्मणा भोगदायिना ॥ पुनः समाहिता सा स्यात्तदैवाभ्यासपाटवात् ॥ ६६ ॥ विक्षेपो यस्य नास्त्यस्य ब्रह्मवित्त्वं न मन्यते ॥ ब्रह्मैवायमिति प्राहुर्मुनयः पारदर्शिनः ॥ ६७ ॥ दर्शनादर्शने हित्वा स्वयं केवलरूपतः ॥ यस्तिष्ठति स तु ब्रह्मन् ब्रह्म न ब्रह्मवित्स्वयम् ॥ ६८ ॥ जीवन्मुक्तेः परा काष्ठा जीवद्वैतविवर्जनात् ॥ लभ्यतेऽसावतोऽत्रेदमीशद्वैताद्विवेचितम् ॥ ६९ ॥

इति विद्यारण्यमुनिवर्यकृतौ द्वैतविवेकः समाप्तः

# सार्थपंचदश्याम्

## महावाक्यविवेकाख्यम्

### पञ्चमं प्रकरणम् ।

गु०—आतां तुला चार वेदांतील चार महावाक्यांचा अर्थ क्रमेंकरून सांगतों. त्यांत प्रथमतः ऋग्वेदापैकीं ऐतरेयारण्यकोपनिषदांतील " **प्रज्ञानं ब्रह्म** " या महावाक्यांतील "**प्रज्ञान**" शब्दाचा अर्थ सांगतों. ज्या चैतन्याच्या योगेंकरून हा जीव पहातो, ऐकतो, वास घेतो, बोलतो व हें गोड आणि हें कडू असें रसनाद्वारें जाणतो, त्यास " प्रज्ञान" असें ह्मटलें आहे. शि०—" प्रज्ञान " या शब्दाचा अर्थ समजला. आतां ब्रह्म ह्मणजे काय तें कृपा करून सांगा. ॥ १ ॥ गु०—ब्रह्मादिदेवांचेठायीं, मनुष्यांचेठायीं, गवाश्वादि पशूंचेठायीं आणि आकाशादि पंचभूतांचेठायीं जन्मस्थितिलयांस हेतुभूत सर्वत्र व्यापून असणारें जें चैतन्य, तेंच ब्रह्म–येणेंकरून " एष ब्रह्मा " " एष इंद्रः " इत्यादि अवांतर वाक्यांचाही अर्थ सांगितल्यासारखा झाला–असें जें सर्वत्र व्यापून असणारें जें प्रज्ञान तें जर ब्रह्म आहे, तर माझ्याठायीं व्यापून असणारें जें प्रज्ञान तेंही असलेंच पाहिजे. हेंच या वाक्याचें तात्पर्य. शि०—हें ऋग्वेदांतील महावाक्य झालें. आतां यजुर्वेदापैकीं बृहदारण्यकोपनिषदांतील " **अहं ब्रह्मास्मि** " या महावाक्याचा अर्थ कृपा करून सांगावा. ॥ २ ॥ गु०—बरें आहे. प्रथम " अहं " शब्दाचा अर्थ सांगतों. देशकालवस्तुपरिच्छेदरहित परिपूर्ण असा परमात्मा, तत्त्वज्ञानास अधिकारी अशा देहाचेठायीं बुद्धीचा साक्षी होऊन जो प्रकाशत आहे, त्यालाच येथें " अहम् " असें ह्मटलें. ॥ ३ ॥ आतां ब्रह्म शब्दाचा अर्थ ऐक. स्वभावतः जो देशकालवस्तुपरिच्छेदरहित सर्वत्र व्यापून असणारा परमात्मा तोच येथें ब्रह्म असें समजावें. " अस्मि " या क्रियापदानें, " अहम् " आणि " ब्रह्म " या दोन पदांचें सामानाधिकरण्य करून, जीवब्रह्माचें ऐक्य दर्शविलें. ह्मणून मीच ब्रह्म आहें, असें या महावाक्याचें तात्पर्य आहे. शि०—" **प्रज्ञानं ब्रह्म** " आणि " **अहं ब्रह्मास्मि** " या दोन महावाक्यांचा अर्थ सम-

---

अथ महावाक्यविवेकः ॥ येनेक्षते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च ॥ स्वाद्वस्वादु विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितम् ॥ १ ॥ चतुर्मुखेंद्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु ॥ चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्ममय्यपि ॥ २ ॥ परिपूर्णः परात्मास्मिन्देहे विद्याधिकारिणि ॥ बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ॥ ३ ॥ स्वतः पूर्णः परात्माऽत्र ब्रह्मशब्देन वर्णितः ॥ अस्मीत्यैक्यपरामर्शस्तेन ब्रह्म

अर्थ. आतां सामवेदापैकीं छांदोग्य श्रुतींतील “ **तत्त्वमसि** ” या वाक्याचा अर्थ कृपा करून सांगावा. ॥ ४ ॥ “ **सदेवसौम्येदमग्रआसीदेकमेवाद्वितीयम्** ” या श्रुतीनें सृष्टीच्या पूर्वी जी स्वगतादि भेदशून्य नामरूपरहित सद्वस्तु होती, ती आतांही तशीच आहे, असें दाखविण्यासाठीं येथें तत्पदाचा उपयोग केला ह्मणून तत्पदाचा अर्थ तीच सद्वस्तु असें समजावें. ॥ ५ ॥ आणि उपदेश श्रवण करणारा जो शिष्य त्याच्या देहेंद्रियांचा जो साक्षी ह्मणजे तिन्ही शरीरांस जो पहाणारा तोच येथें त्वंपदानें दाखविला. आणि “ असि ” ह्मणून जें क्रियापद या वाक्यांत आहे त्यानें “ तत् ” आणि “ त्वम् ” या दोन्ही पदांचें ऐक्य सांगितलें, त्याचा अनुभव मुमुक्षूंनीं घ्यावा. शि०—आतां चौथें जें महावाक्य “ **अयमात्मा ब्रह्म** ” त्याचा अर्थ सांगावा. ॥ ६ ॥ गु०—“ अयम् ” या शब्दाचा अर्थ असा कीं, आत्मा हा अवेद्य असून स्वयंप्रकाश व अपरोक्ष आहे. तो अदृश्य पदार्थासारखा परोक्षही नाहीं. व घटादि पदार्थासारखा दृश्यही नाहीं, असें दाखविण्यासाठीं येथें “ अयम् ” या पदाची योजना केली. शि०—अहो, पण आत्मा हा शब्द देहालाही केव्हां केव्हां लावतात. मग या महावाक्यांतील “ आत्मा ” या शब्दाचा विवक्षित अर्थ कोणता ? गु०—अहंकारापासून देहापर्यंत जितकीं ह्मणून जड तत्त्वें आहेत त्या सर्वांचा जो साक्षी तोच येथें आत्मा असें समजावें. शि०—ब्रह्म शब्दाचाही विवक्षित अर्थ समजला पाहिजे. कारण, ब्राह्मणादिकांनाही ब्रह्मच ह्मणतात. या करितां तो कृपा करून सांगावा. ॥ ७ ॥ गु०—तूं ह्मणतोस तें खरें आहे. या वाक्यांतील ब्रह्म शब्दाचा अर्थ असा आहे कीं, जितके ह्मणून दृश्य पदार्थ आहेत त्या सर्वांचें जें अधिष्ठान तत्त्व तेंच येथें ब्रह्म असें समजावें. हें ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे. तें व वर सांगितलेला आत्मा हीं दोन्ही एकच आहेत. असें या महावाक्याचें तात्पर्य ॥ ८ ॥

इति महावाक्यविवेकः समाप्तः ।

---

भग्नाम्यहम् ॥ ४ ॥ एकमेवाद्वितीयं सन्नामरूपविवर्जितम् ॥ सृष्टेः पुराऽधुनाप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ॥ ५ ॥ श्रोतुर्देहेंद्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितम् ॥ एकता ग्राह्यतेऽसीति तदैक्यमनुभूयताम् ॥ ६ ॥ स्वप्रकाशापरोक्षत्वमयमित्युक्तितो मतम् ॥ अहंकारादिदेहांतात्प्रत्यगात्मेति गीयते ॥ ७ ॥ दृश्यमानस्य सर्वस्य जगतस्तत्त्वमीर्यते ॥ ब्रह्मशब्देन तद् ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम् ॥ ८ ॥

## इति विद्यारण्यमुनिवर्यकृतौ महावाक्यविवेकः संपूर्णः

इति महावाक्यविवेकः ।

# सार्थपंचदश्याम्

## चित्रदीपाख्यम्

### षष्ठं प्रकरणम् ।

" या प्रकरणास " चित्रदीप " असें नांव ठेवण्याचें कारण हेंच कीं—येथें आत्म्याच्या चार अवस्था चित्रपटाच्या दृष्टांतानें चांगल्या स्पष्ट करून दाखविल्या आहेत. चित्रपट ह्मणजे धुवट कापडावर खळ लावून त्याजवर मनुष्य, पशु पक्षी, पर्वत, वृक्ष व नद्या वगैरे सृष्टीचें चित्र काढून तयार केलेला एक नकाशा होय.

---

ज्याप्रमाणें या चित्रपटामध्यें चार अवस्था दिसून येतात, त्याचप्रमाणें परमात्म्याचे ठायींही अवस्थाचतुष्टय समजावें. ॥ १ ॥ पटामध्यें जशा धौत, घट्टित, लांछित आणि रंजित ह्या चार अवस्था आहेत, तशाच आत्म्याचे ठायींही चित्, अंतर्यामी, सूत्रात्मा व विराट् अशा चार अवस्था आहेत. ॥ २ ॥ धौत ह्मणजे स्वतःसिद्ध मूळचा शुभ्रपट, घट्टित ह्मणजे खळ दिलेला, लांछित ह्मणजे काजळाच्या किंवा कोळशाच्या वगैरे रेघांनीं आंखलेला, आणि रंजित ह्मणजे यथायोग्य रंगविलेला, हा चित्रपटाचा प्रकार झाला. ॥ ३ ॥ आणि चित् ह्मणजे स्वतः चिद्रूपी, अंतर्यामी ह्मणजे मायावी, सूत्रात्मा ह्मणजे सूक्ष्मशरीरी, आणि विराट् ह्मणजे स्थूलशरीरी, असा परमात्म्याचा प्रकार समजावा. ॥ ४ ॥ चित्रपटावरील चित्राप्रमाणें या आत्म्याचे ठायींही ब्रह्मदेवापासून तों अति सूक्ष्म तृणापर्यंत सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि उत्तमाधम भावेंकरून दृष्टीस पडते. ॥ ५ ॥ चित्रांतील मनुष्यांना जसे वस्त्राभास निरनिराळे असून चि-

---

श्रीगणेशाय नमः ॥ यथा चित्रपटे दृष्टमवस्थानां चतुष्टयम् ॥ परमात्मनि विज्ञेयं तथाऽवस्थाचतुष्टयम् ॥ यथा धौतो घट्टितश्च लांछितो रंजितः पटः ॥ चिदंतर्यामी सूत्रात्मा विराट् चात्मा तथेर्यते ॥ २ ॥ स्वतः शुभ्रोऽत्र धौतः स्याद्घट्टितोऽन्नविलेपनात् ॥ मष्याकारैर्लांछितः स्याद्रंजितो वर्णपूरणात् ॥ ३ ॥ स्वतश्चिदंतर्यामी तु मायावी सूक्ष्मसृष्टितः ॥ सूत्रात्मा स्थूलसृष्टयैव विराडित्युच्यते परः ॥ ४ ॥ ब्रह्माद्याः स्तंबपर्यंताः प्राणिनोऽत्र जडा अपि ॥ उत्तमाधमभावेन वर्तंते पटचित्रवत् ॥ ५ ॥ चित्रार्पितमनुष्याणां वस्त्राभासाः पृथक् पृथक् ॥ चित्राधारेण वस्त्रेण स-

ग्रांस आधारभूत जें वस्त्र तेंच तें असें आह्मी कल्पितों, ॥ ६ ॥ त्या प्रमाणें चिदाभासही निरनिराळे असून आधारभूत चैतन्याशीं त्यांचें ऐक्य करून त्यांणीं केलेला संसार चैतन्यगतच अशी आह्मास भ्रांति होते. ॥ ७ ॥ कल्पित वस्त्रांचे रंग जसे आधारभूत वस्त्रासच लागलेले दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें अज्ञानी लोक भ्रमानें जिवाचा संसार आत्म्यास लावूं पहातात. ॥ ८ ॥ चित्रांतील पर्वतादि जड पदार्थांस जशीं वस्त्रें नाहींत, त्याप्रमाणें सृष्टींतील काष्ठपाषाणादिकांसही चिदाभास नाहीं. ॥ ९ ॥ वस्तुतः जीवास लागू असलेला संसार आत्म्यास लावूं पहाणें, हीच अविद्या. तिची निवृत्ति विद्येवांचून होत नाहीं. ॥ १० ॥ हा संसार केवळ जीवांनाच लागू असून आत्म्याला त्याचा मुळींच संबंध नाहीं, असें जें ज्ञान त्यासच विद्या असें ह्मणतात. ती विचारापासून प्राप्त होते. ॥ ११ ॥ याजकरितां जग ह्मणजे काय, जीव ह्मणजे काय, आणि आत्मा कसा आहे, याचा चांगला विचार करावा. ह्मणजे विचाराअंतीं जीव आणि जग ह्या दोहींचा बाध झाला असतां बाकी अबाधित राहिलेला आत्मा सत्य, हें अर्थातच सिद्ध झालें. ॥ १२ ॥ वर, जीव आणि जग यांचा बाध करावा असें ह्मटलें त्यांत बाध शब्दाचा अर्थ त्यांचें मुळींच न दिसणें नव्हे, तर तीं खोटीं आहेत असा निश्चय झाला ह्मणजे झालें. कारण असें जर न मानलें, तर सुषुप्तिमूर्च्छादिकांचेठायीं श्रमावांचून मोक्षप्राप्ति होईल. ॥ १३ ॥ तसेंच आत्म्याचा अवशेष याचा अर्थ, तो सत्य आहे असा निश्चय करणें हा होय. जगाचें विस्मरण होणें असा त्याचा अर्थ केल्यास जीवन्मुक्ति ह्मणून जी ह्मणतात ती मुळींच संभवणार नाहीं. ॥ १४ ॥ वर सांगितलेली जी विद्या ( ज्ञान ) ती दोन प्रका-

---

दृशा इव कल्पिताः ॥६॥ पृथक् पृथक् चिदाभासाश्चैतन्याध्यस्तदेहिनाम् ॥ कल्प्यंते जीवनामानो बहुधा संसरंत्यमी ॥७॥ वस्त्राभासस्थितान् वर्णान् यद्वदाधारवस्त्रगान् ॥ वदंत्यज्ञास्तथा जीवसंसारं चिद्गतं विदुः ॥ ८ ॥ चित्रस्थपर्वतादीनां वस्त्राभासो न लिख्यते ॥ सृष्टिस्थमृत्तिकादीनां चिदाभासस्तथा न हि ॥ ९ ॥ संसारः परमार्थोऽयं संलग्नः स्वात्मवस्तुनि ॥ इति भ्रांतिरविद्या स्याद्विद्ययैषा निवर्तते ॥ १० ॥ आत्माभासस्य जीवस्य संसारो नात्मवस्तुनः ॥ इति बोधो भवेद्विद्या लभ्यतेऽसौ विचारणात् ॥ ११ ॥ सदा विचारयेत्तस्माज्जगज्जीवपरात्मनः ॥ जीवभावजगद्भावबाधे स्वात्मैव शिष्यते ॥ १२ ॥ नाप्रतीतिस्तयोर्बाधः किंतु मिथ्यात्वनिश्चयः ॥ नोचेत्सुषुप्तिमूर्च्छादौ मुच्येतायत्नतो जनः ॥ १३ ॥ परमात्मावशेषोपि तत्सत्यत्वविनिश्चयः ॥ न जगद्विस्मृतिर्नोचेज्जीवन्मुक्तिर्न संभवेत् ॥ १४ ॥ परोक्षा चापरोक्षेति विद्या द्वेधा विचारजा ॥ तत्रापरोक्षविद्याप्तौ विचारोऽयं समाप्यते

रची:—परोक्ष आणि अपरोक्ष. अपरोक्ष ज्ञान झालें ह्मणजे विचार संपला. ॥ १५ ॥ " ब्रह्म आहे " इतकेंच केवळ गुरुमुखापासून किंवा श्रुतीपासून जें समजणें त्यास परोक्ष विद्या ह्मणतात; आणि " तें ब्रह्म मीच आहें " असें जें प्रत्यक्ष अनुभवास येणें त्यास अपरोक्ष विद्या किंवा साक्षात्कार असें ह्मणतात. ॥ १६ ॥ हा साक्षात्कार झाला असतां जन्ममरणापासून प्राणी तत्काल मुक्त होतो. ह्मणून याच्या प्राप्तीकरितां आत्मतत्त्वाचें विवेचन आह्मी पुढें करितों. ॥ १७ ॥ ज्याप्रमाणें घटाकाश, महाकाश, जलाकाश आणि अभ्राकाश असे आकाशाचे चार प्रकार आहेत, त्याप्रमाणें कूटस्थ, ब्रह्म, जीव आणि ईश असे चैतन्याचे चार प्रकार आहेत. ॥ १८ ॥ ह्यांपैकीं घटाकाश हें प्रसिद्धच आहे, ह्मणून त्याविषयीं येथें विशेष सांगणें नलगे. महाकाश ह्मणजे ज्यामध्यें सूर्य, चंद्र व नक्षत्रें प्रकाशित होतात अशी अवाढव्य पोकळी. जलाकाश ह्मणजे घटांतील पोकळींत पाणी घालून तो आंगणांत ठेवला असतां त्यांत साभ्र नक्षत्र ( ढग आणि नक्षत्रें यांसहित ) जें आभाळाचें प्रतिबिंब पडतें तें. ॥१९॥ आणि अभ्राकाश ह्मणजे पूर्वोक्त महाकाशामध्यें जें मेघमंडळ दिसतें त्यांत जें महाकाशाचें प्रतिबिंब, तें होय. ॥ २० ॥ हे जे आकाशाचे चार प्रकार सांगितले त्यांपैकीं पहिले तीन तर स्पष्ट समजण्याजोगे आहेत. परंतु चवथें जें अभ्राकाश तें कसें समजावें ? कारण, जेथें मुळीं पाण्याचेंच ज्ञान होण्याची पंचाईत, तेथें त्यांतील प्रतिबिंब कोठून समजणार ? असें कोणी ह्मणेल तर त्याविषयींची समजूत अशी.—मेघ ही केवळ वाफ असल्यामुळें त्याचे घटकावयव उदकतुषारच आहेत. उदक ह्मटलें ह्मणजे त्यांत प्रतिबिंब पडलेंच पाहिजे. या नियमावरून पूर्वोक्त जें मेघप्रतिबिंबित आकाश, ज्यास आह्मीं अभ्राकाश असें नांव दिलें, तें जरी स्पष्ट दिसलें नाहीं, तरी तें तेथें आहे असें अनुमान होतें. ॥ २१ ॥ याप्रमाणें दृष्टांतभूत आकाशाचे चार प्रकार सांगितले, तसेच, आतां चैतन्याचेही चार प्रकार स्पष्ट करून सांगतों. पंचीकृत स्थूल आणि अपंचीकृत सूक्ष्म अशा दोन शरीरांना आधारभूत असून ओतप्रोत आंत-बाहेर व्यापून असणारा जो आत्मा त्यास कूटस्थ असें ह्मणतात. यास कूटस्थ ह्मण-

---

॥ १५ ॥ अस्ति ब्रह्मेति चेद्वेद परोक्षज्ञानमेव तत् ॥ अहं ब्रह्मेति चेद्वेद साक्षात्कारः स उच्यते ॥ १६ ॥ तत्साक्षात्कारसिद्ध्यर्थमात्मतत्त्वं विविच्यते ॥ येनायं सर्वसंसारात् सद्य एव विमुच्यते ॥ १७ ॥ कूटस्थो ब्रह्म जीवेशावित्येवं चिच्चतुर्विधा ॥ घटाकाशमहाकाशौ जलाकाशाभ्रखे यथा ॥ १८ ॥ घटावच्छिन्नखे नीरं यत्तत्र प्रतिबिंबितः ॥ साभ्रनक्षत्र आकाशो जलाकाश उदीर्यते ॥ १९ ॥ महाकाशस्य मध्ये यन्मेघमंडलमीक्ष्यते ॥ प्रतिबिंबतया तत्र मेघाकाशो जले स्थितः ॥ २० ॥ मेघांशरूपमुदकं तुषाराकारसंस्थितं ॥ तत्र खप्रतिबिंबोऽयं नीरत्वादनुमीयते ॥ २१ ॥ अधिष्ठानतया देहद्वयावच्छिन्नचेतनः ॥ कूटवन्नि-

ण्याचें कारण कूट ह्मणजे पर्वताचें शिखर तें जसें वादळादिकांच्या झपाट्याखालीं कांहीं वि-कार न पावतां जशाचें तसेंच रहातें, तसा आत्माही निर्विकार असतो. ॥ २२ ॥ कूटस्थाचे ठायीं कल्पित अशी जी बुद्धि तींत पडलेलें जें चैतन्याचें प्रतिबिंब तोच जीव. हा प्राणधारण करितो ह्मणून याला जीव हें नांव दिलें. या जीवालाच संसार आहे; कूटस्थाला नाहीं. ॥ २३ ॥ वरील दृष्टांतांत जें जलाकाश सांगितलें, त्यानें जसें खरें घटाकाश झांकून टाकिलें, त्याप्रमाणें येथेंही जीवानें कूटस्थाला अगदीं झांकून टाकल्यामुळें खरा कूटस्थ प्रत्ययास येत नाहीं. हें जें जीवाचें ' नसून भासणें, ' आणि कूटस्थाचें ' असून न दिसणें, ' यासच भाष्यकारादिक अन्योन्याध्यास असें ह्मणतात. ॥ २४ ॥ ह्या जीवकूटस्थांमधील भेद जीवास मुळींच समजत नाहीं. हा अविवेक आजकालचा नव्हे, तर अनादि आहे. याला मूलाविद्या ह्मणतात. ॥ २५ ॥ या अविद्येचीं रूपें दोनः—एक विक्षेप आणि दुसरें, आवृति (आवरण) कूटस्थ भासत नाहीं, व मुळींच तो नाहीं ह्मा व्यवहारास जें हेतु तेंच आवरण समजावें. ॥ २६ ॥ अविद्या व तिजपासून झालेलें आवरण या दोहींचाही अनुभव लोकांत आहे, तो कसा ह्मणाल, तर त्यास उदाहरण.—एका अज्ञानी मनुष्यास एका विद्वानानें विचारिलें कीं, कूटस्थ तूं जाणतोस काय ? याजवर तो असें उत्तर देईल कीं, "मला कूटस्थ ठाऊक नाहीं," हा त्याचा अविद्यानुभव झाला, व जेव्हां तो असें उत्तर देतो. कीं, " कूटस्थ मला दिसत नाहीं, व तो नाहीं, " हा त्याचा आवरणानुभव झाला. ॥ २७ ॥ आत्मा स्वप्रकाश असून त्याचे ठायीं अविद्या कशी आली ? कारण, प्रकाश आणि अंधकार यांचा एकत्र वास, कसा संभवेल ? बरें, अविद्या नाहीं ह्मटलें तर मग तिणें केलेलें आवरण तरी कोठून येणार ? तें नाहीं तर विक्षेपही नाहीं, तेव्हां अर्थातच ज्ञान व्यर्थ झालें, व त्यामुळें तत्प्रतिपादक सर्व शास्त्रही निष्फळ, असे जे प्रतिपक्ष्यांचे नानातऱ्हेचे तर्क ते सर्व एका स्वानुभवानें नाहींसे होतात. ॥ २८ ॥ आतां अनुभवावरही आमचा विश्वास नाहीं, असें कोणी ह्मणेल, तर मग

---

र्निकारेण स्थितः कूटस्थ उच्यते ॥ २२ ॥ कूटस्थे कल्पिता बु-द्धिस्तत्र चित्प्रतिबिंबकः ॥ प्राणानां धारणाज्जीवः संसारेण स युज्यते ॥ २३ ॥ जलव्योम्ना घटाकाशो यथा सर्वस्तिरोहितः ॥ तथा जीवेन कूटस्थः सोऽन्योन्याध्यास उच्यते ॥ २४ ॥ अयं जीवो न कूटस्थं विविनक्ति [illegible] ॥ [illegible]विवेकोऽयं मू-लाविद्येति [illegible] ॥ २५ ॥ विक्षेपावृतिरूपाभ्यां द्विधाऽविद्या [illegible]स्थिता ॥ न भाति नास्ति कूटस्थ इत्यापादनमावृतिः ॥ २६ ॥ अज्ञानी विदुषा पृष्टः कूटस्थं न प्रबुध्यते ॥ न भाति नास्ति कूटस्थ इति बुध्वा वदत्यपि ॥ २७ ॥ स्वप्रकाशे कुतोऽ-विद्या तां विना कथमावृतिः ॥ इत्यादितर्कजालानि स्वानुभूति-र्ग्रसत्यसौ ॥ २८ ॥ स्वानुभूतावविश्वासे तर्कस्याप्यनवस्थितेः ॥

तर्काला आधारच राहिला नाहीं. तार्किक ह्मणविणारास अनुभवावांचून तत्त्वनिश्चय तरी कसा व्हावा ? ॥ २९ ॥ तर्कावांचून समजूत पडत नाहीं, असें जर कोणी ह्मणत असेल, तर अवश्य तर्काचें साहाय्य घ्यावें; परंतु जो तर्क करणें तो अनुभवास अनुसरूनच करावा. व्यर्थ कुतर्क कधींही करूं नये. ॥ ३० ॥ आतां येथें तो अनुभव कोणता ह्मणाल तर अविद्या आणि आवरण याविषयींचा वर सांगितलाच आहे; ह्मणून कूटस्थ आणि अविद्या यांत विरोध नाहीं, असें ह्मणण्यास कोणती हरकत आहे ? ॥ ३१ ॥ कारण, तसा जर विरोध असता, तर या आवरणाचा अनुभव कोणाला आला असता ? एवढ्यावरून या अविद्येस विरोधी कोणी नाहीं, असें मात्र समजूं नये. हिला विवेकजन्य ज्ञानच विरोधी आहे. या गोष्टीचा अनुभव तत्त्वज्ञान्याच्याठायीं पहावा. ॥ ३२ ॥ अविद्येनें वेष्टिलेल्या कूटस्थावर, स्थूल आणि सूक्ष्म या दोन देहांनीं युक्त असा चिदाभास शिंपीवरील रुप्याप्रमाणें केवळ भ्रमानें दिसतो. यालाच विक्षेपाध्यास ह्मणतात. ॥ ३३ ॥ आरोपित रजतावर ज्याप्रमाणें शुक्तीचा ' इदं ' अंश आणि सत्यत्व दिसून येतें, त्याप्रमाणें आरोपित चिदाभासावर कूटस्थाचेठायीं असणारीं स्वयंत्व आणि वस्तुत्व हीं दोन दिसून येतात. ॥ ३४ ॥ शिंपीची निळी पाठ आणि त्रिकोण आकृति हीं जशीं शिंपीच्याठायीं आच्छादित असतात, त्याप्रमाणें कूटस्थाचे असंगत्व आणि आनंदरूपता हे गुण त्याचेठायीं झांकले जातात. ॥ ३५ ॥ तसेंच ज्याप्रमाणें दृष्टांतामध्यें आरोपितास ' रुपें ' हें नांव पडलें, त्याप्रमाणें कूटस्थाचेठायीं अध्यस्त जो विक्षेपरूप चिदाभास त्याला ' अहं ' असें नांव पडलें. ॥ ३६ ॥ दृष्टांतामध्यें शुक्तिशकल प्रत्यक्ष पहात असून त्याला मनुष्य रुपें असें ह्मणतो. त्याचप्रमाणें दार्ष्टांतिकामध्यें स्वतःला पहात असून तो

---

कथं वा तार्किकं मन्यस्तत्त्वनिश्चयमाप्नुयात् ॥ २९ ॥ बुद्ध्यारोहाय तर्कश्चेदपेक्षेत तथा सति ॥ स्वानुभूत्यनुसारेण तर्क्यतां मा कुतर्क्यतां ॥ ३० ॥ स्वानुभूतिरविद्यायामावृतौ च प्रदर्शिता ॥ अतः कूटस्थचैतन्यमविरोधीति तर्क्यताम् ॥ ३१ ॥ तच्चेद्विरोधि केनेयमावृतिर्ह्यनुभूयताम् ॥ विवेकस्तु विरोध्यस्यास्तत्त्वज्ञानिनि दृश्यतां ॥ ३२ ॥ अविद्यावृतकूटस्थे देहद्वययुता चितिः ॥ शुक्तौ रूप्यवदध्यस्ता विक्षेपाध्यास एव हि ॥ ३३ ॥ इदमंशश्च सत्यत्वं शुक्तिगं रूप्य ईक्ष्यते ॥ स्वयंत्वं वस्तुता चैवं विक्षेपे वीक्ष्यतेऽन्यगं ॥ ३४ ॥ नीलपृष्ठत्रिकोणत्वं यथा शुक्तौ तिरोहितम् ॥ असंगानंदताद्येवं कूटस्थेऽपि तिरोहितम् ॥ ३५ ॥ आरोपितस्य दृष्टांते रूप्यं नाम यथा तथा ॥ कूटस्थाध्यस्तविक्षेपनामाहमिति निश्चयः ॥ ३६ ॥ इदमंशं स्वतः पश्यन् रूप्यमित्यभिमन्यते ॥ तथा स्वं च स्वतः पश्यन्नहमित्य-

मी मी असें ह्मणतो. ॥ ३७ ॥ दृष्टांतांत इदंता आणि रूप्यता या जशा दोन्ही एकमेकांपासून भिन्न आहेत, त्याप्रमाणें दार्ष्टांतिकांतही स्वयंता आणि अहंता ह्या दोन्ही भिन्न आहेत. एक सामान्य आणि दुसरें विशेष हाच दोहोंमधील भेद. ॥ ३८ ॥ स्वयं शब्दास सामान्यत्व आहे. यास उदाहरण.—तो देवदत्त स्वतः जातो, तूं स्वतः पहातोस, आणि मी स्वतः करूं शकत नाहीं. असा लोकांमध्यें बोलण्याचा परिपाठ आहे. ॥ ३९ ॥ हें रुपें, हें वस्त्र ह्यांमध्यें " इदं " जसें सामान्य आहे तसें हा मी, हा तूं, या दोनही पुरुषांमध्यें स्वयं हें सामान्य आहे. ॥ ४० ॥ बरें, अहंपणा आणि स्वयंपणा यांमध्यें भेद ठरला; पण त्याचा कूटस्थाशीं काय संबंध ? तर येथें जो स्वयं शब्दाचा अर्थ तोच आमचा कूटस्थ. ॥ ४१ ॥ आतां कोणी ह्मणेल, स्वयं शब्दाचा अर्थ " दुसरा नव्हे " असा होतो. तर त्याजवर आमचें असें ह्मणणें आहे कीं, स्वयं शब्दाप्रमाणें आत्म्यालाही अन्यवारकत्व येतें. आतां कूटस्थ आणि आत्मा हे दोन्ही ज्याअर्थी आमच्या मतें एकच आहेत, त्याअर्थी तो अर्थ आह्मांस इष्टच आहे. ॥ ४२ ॥ स्वयं आणि आत्मा हे दोन शब्द एकार्थक आहेत ह्मणूनच लोकांमध्यें त्याचा एकत्र प्रयोग आढळत नाहीं. त्याकरितां " स्वयं " या शब्दाचा अर्थ जसा अन्यवारक होतो तसा आत्मशब्दाचाही होतो. ॥ ४३ ॥ " घट स्वत जाणत नाहीं " इत्यादि प्रयोगावरून घटादिक अचेतन पदार्थांस देखील स्वयं शब्द लागतो अशी शंका कोणी घेईल तर तीही आह्माला विरुद्ध नाहीं. कारण आत्म्याची व्याप्ति स्फुरणरूपानें सर्वत्र असल्यामुळें स्वयं शब्द घटादिकांस लागणें हें योग्यच आहे. ॥ ४४ ॥ सचेतन आणि अचेतन हा भेद आत्म्यामुळें झालेला नाहीं. ह्मणजे, अमुक पदार्थांत आत्मा असला ह्मणजे त्यास सचेतन ह्मणावें, व अमुकांत तो नसला ह्मणजे त्याला अचेतन ह्मणावें असें कांहीं नाहीं. आत्मा सर्वव्यापक असल्यामुळें आत्म्याचें असणें नसणें हेंच मुळीं अशक्य आहे. ह्मणूनच वरील भेद बुद्धिप्रतिबिंबित

---

भिमन्यते ॥ ३७ ॥ इदंत्वरूप्यते भिन्ने स्वत्वाहंते तथेष्यताम् ॥ सामान्यं च विशेषश्च ह्युभयत्रापि गम्यते ॥ ३८ ॥ देवदत्तः स्वयं गच्छेत्त्वं वीक्षस्व स्वयं तथा ॥ अहं स्वयं न शक्नोमीत्येवं लोके प्रयुज्यते ॥ ३९ ॥ इदं रूप्यमिदं वस्त्रमिति यद्वदिदं तथा ॥ असौत्वमहमित्येषु स्वयमित्यभिमन्यते ॥ ४० ॥ अहंत्वाद्भिद्यतां स्वत्वं कूटस्थे तेन किं तव ॥ स्वयंशब्दार्थ एवैष कूटस्थ इति मे भवेत् ॥ ४१ ॥ अन्यत्ववारकं स्वत्वमिति चेदन्यवारणम् ॥ कूटस्थस्यात्मतां वक्तुरिष्टमेव हि तद्भवेत् ॥ ४२ ॥ स्वयमात्मेति पर्यायौ तेन लोके तयोः सह ॥ प्रयोगो नास्त्यतः स्वत्वमात्मत्वं चान्यवारकम् ॥ ४३ ॥ घटः स्वयं न जानातीत्येवं स्वत्वं घटादिषु ॥ अचेतनेषु दृष्टं चेद् दृश्यतामात्मसत्त्वतः ॥ ४४ ॥ चेतनाचेतनभिदाकूटस्थात्मकृता न

चिदाभासामुळेंच झाला आहे. ह्मणजे सजीव प्राण्याला अंतःकरण असतें. त्या अंतःकरणांत जें आत्म्याचें प्रतिबिंब तोच चिदाभास; तो जड पदार्थांत नाहीं. ह्मणून त्याचे असण्या नसण्या-वर चेतनाचेतनभेद अवलंबून असतो. ॥ ४५ ॥ आत्मा सचेतन आणि अचेतन या दोनही कल्पनांस आधार आहे. ज्याप्रमाणें चिदाभास कूटस्थावर भ्रांतीनें कल्पिलेला आहे, त्याप्रमाणें घटादिक अचेतन पदार्थही कूटस्थावरच कल्पिलेले आहेत. दोन्हींचेंही अधिष्ठान तोच आहे. ॥ ४६ ॥ येथें अशी एक शंका आहे कीं, तूं, मी, इत्यादिक पुरुषांमध्यें स्वशब्द जसा सा-मान्य आहे तसेंच तत्ता आणि इदंता हे शब्दही सामान्यत्वेंकरून लागतात. तेव्हां स्वयं श-ब्दाप्रमाणें यालाही आत्मत्व येईल. ॥ ४७ ॥ तर त्याचें समाधान हेंच कीं, तत्ता व इदंता हे शब्द अहमादिकांचीं जशीं विशेषणें आहेत तशीं आत्मत्वाचींही विशेषणें आहेत. ह्मणून बरें, वाईट या विशेषणांस जसें आत्मत्व येत नाहीं, तसें यांसही येत नाहीं. ॥ ४८ ॥ ( तूं, मी ), ( तें, हें ), ( आपण, दुसरा ) हीं शब्दयुग्में परस्पर विरुद्धार्थी आहेत असें लोकांत प्रसिद्ध आहे यांत संशय नाहीं. ॥ ४९ ॥ अन्यतेचा प्रतियोगी जो " स्वयं " शब्द तो कूटस्थवाची असें समजावें. त्या कूटस्थ आत्म्यावर तूं या शब्दाचा प्रतियोगी जो मी शब्द तो कल्पिलेला आहे. ॥ ५० ॥ इदंता आणि रूप्यता यांमध्यें जसा भेद स्पष्ट आहे, तसाच अहंता आणि स्वत्व यांमध्येंही आहे. असें असूनही मनुष्य भ्रमामुळें ते एकच मा-नितो. ॥ ५१ ॥ असें जें जीवकूटस्थांचें ऐक्य मानणें यालाच तादात्म्याध्यास ह्मणतात. तो पूर्वोक्त अविद्येपासून होतो. त्या अविद्येची निवृत्ति झाली असतां तिचें कार्यही नाहींसें होतें. ॥ ५२ ॥ अविद्येपासून होणारें आवरण आणि तादात्म्य हीं विद्येचे योगानें नाश पावतात.

---

हि ॥ किंतु बुद्धिकृता भासकृतैवेत्यवगम्यताम् ॥ ४५ ॥ यथा चेतन आभासः कूटस्थे भ्रांतिकल्पितः ॥ अचेतनो घटादिश्च तथा तत्रैव कल्पितः ॥ ४६ ॥ तत्तेदंते अपि स्वत्वमिव त्वमह-मादिषु ॥ सर्वत्रानुगते तेन तयोरप्यात्मतेति चेत् ॥ ४७ ॥ ते आत्मत्वेऽप्यनुगते तत्तेदंते ततस्तयोः ॥ आत्मत्वं नैव संभाव्यं सम्यक्त्वादेर्यथा तथा ॥ ४८ ॥ तत्तेदंते स्वतान्यत्वे त्वंताहंते परस्परम् ॥ प्रतिद्वंद्वितया लोके प्रसिद्धे नास्ति संशयः ॥ ४९ ॥ अन्यतायाः प्रतिद्वंद्वी स्वयं कूटस्थ इष्यताम् ॥ त्वंतायाः प्रति-योग्येषोऽहमित्यात्मनि कल्पितः ॥ ५० ॥ अहंतास्वत्वयोर्भेदे रूप्यतेदंतयोरिव ॥ स्पष्टेऽपि मोहमापन्ना एकत्वं प्रतिपेदिरे॥५१॥ तादात्म्याध्यास एवात्र पूर्वोक्ताविद्यया कृतः ॥ अविद्यायां नि-वृत्तायां तत्कार्यं विनिवर्तते ॥ ५२ ॥ अविद्यावृतितादात्म्ये वि-द्ययैव विनश्यतः ॥ विक्षेपस्य स्वरूपं तु प्रारब्धक्षयमीक्षते

परंतु विक्षेपाचें स्वरूप मात्र प्रारब्धक्षयापर्यंत असतें. ॥ ५३ ॥ उपादान कारणाचा नाश झाला तरी त्याचें कार्य क्षणभर रहातें असें नैय्यायिकांचें मत आहे, त्याचा स्वीकार आह्मीं कां करूं नये ? ॥ ५४ ॥ आतां कोणी ह्मणेल कीं, तार्किकांच्या मतीं कार्य क्षणभर रहातें असें आहे. परंतु विक्षेपरूप कार्य वर्षानुवर्ष रहातें हें कसें ? तर ह्याचें उत्तर हेंच कीं, दिवसांच्या प्रमाणानें त्यांनीं क्षण सांगितला; परंतु आमची भ्रांति असंख्य कल्पांपासून चालत आल्यामुळें येथें वर्षानुवर्ष हाच क्षण आहे. ॥ ५५ ॥ येवढ्यावरून तार्किकांचें व आमचें मत एकच असें मात्र समजूं नये. कारण तार्किक केवळ युक्तीवरच अवलंबून पाहिजे तसा तर्क करितात. तशी आमची गोष्ट नाहीं. श्रुति, युक्ती आणि अनुभव ह्या तिन्हींवरून सिद्धांत करणारास काय भीति आहे ? ॥ ५६ ॥ आतां हा तार्किकाशीं वाद पुरे. एकंदरींत कूटस्थवाची स्वयंशब्द आणि त्याजवर दिसणारा जो अहं शब्द या दोन्हींचें एकत्व अज्ञानी मानतात असें ठरलें. ॥ ५७ ॥ असें असून ही भ्रांति आहे, असें लोकांस कां समजत नाहीं ? असें जर ह्मणाल तर याचें कारण हेंच कीं, मोठमोठे पंडित ह्मणविणारे केवळ युक्ति लढवून मूर्खपणानें श्रुतींचा अनादर करून भ्रांतींत पडतात. ॥ ५८ ॥ ते, शास्त्राचा पूर्वापर संबंध मनांत न आणून वाक्याचे वरवर दिसणारे अर्थ आपापले पक्ष सिद्ध करण्याकरितां निर्लज्जपणानें योजितात. ॥ ५९ ॥ कूटस्थापासून स्थूल शरीरापर्यंत जो एक सगळा समुदाय त्यालाच लोकायत आणि पामर ( अज्ञानी ) हे आत्मा असें मानितात. कारण, प्रत्यक्ष तेवढें खरें असें त्यांना वाटतें. ॥ ६० ॥ लोकवंचनार्थ आपल्या पक्षास श्रुति प्रमाण आहे असें दाखविण्याकरितां ते " स वा एष पुरुषोऽन्नरसमयः " इत्यादिक श्रुतिवाक्यें देऊन विरोचनसिद्धांताचा अनुवाद करितात. ॥ ६१ ॥ ह्या लोकांचेच आणखी दुसरे बंधु असें ह्मणतात कीं, ज्याअर्थी

---

॥५३॥ उपादाने विनष्टेऽपि क्षणं कार्यं प्रतीक्षते ॥ इत्याहुस्तार्किकास्तद्वदस्माकं किन्न संभवेत् ॥५४॥ तंतूनां दिनसंख्यानां तैस्तादृक् क्षण ईरितः ॥ भ्रमस्यासंख्यकल्पस्य योग्यः क्षण इहेष्यताम् ॥५५॥ विना क्षोदक्षमं मानं तैर्वृथा परिकल्प्यते ॥ श्रुतियुक्त्यनुभूतिभ्यो वदतां किन्नु दुःशकम् ॥५६॥ आस्तां दुस्तार्किकैः सार्कं विवादः प्रकृतं ब्रुवे ॥ स्वाहमोः सिद्धमेकत्वं कूटस्थपरिणामिनोः ॥५७॥ भ्राम्यन्ते पंडितंमन्याः सर्वे लौकिकतैर्थिकाः॥ अनादृत्य श्रुतिं मौर्ख्यात्केवलां युक्तिमाश्रिताः ॥ ५८ ॥ पूर्वापरपरामर्शविकलास्तत्र केचन ॥ वाक्याभासान् स्वस्वपक्षे योजयंत्यप्यलज्जया ॥ ५९ ॥ कूटस्थादिशरीरांतसंघातस्यात्मतां जगुः ॥ लोकायताः पामराश्च प्रत्यक्षाभासमाश्रिताः ॥ ६० ॥ श्रौतीकर्तुं स्वपक्षं ते कोशमन्नमयं तथा ॥ विरोचनस्य सिद्धांतं प्रमाणं प्रतिजज्ञिरे ॥६१॥ जीवात्मनिर्गमे देहमरणस्यात्र दर्शनात् ॥ देहातिरिक्तएवात्मे-

प्राण गेला ह्मणजे हें शरीर नाशाप्रत पावतें, त्या अर्थी ह्या शरीराहून आत्मा कोणी निराळा असावा. ॥ ६२ ॥ हा देहाहून भिन्न आत्मा त्यांच्या मतें इंद्रियसमूह होय. कारण मी बोलतों, पहातों, ऐकतों असें मनुष्य ह्मणतो. त्यावरून इंद्रियेंच आत्मा असें ते ह्मणतात.॥६३॥ तें यावर असें प्रतिपादन करितात कीं, श्रुतींमध्यें इंद्रियांमध्यें भांडण लागलेलें दिसून येतें. यावरून त्यांस चैतन्य असलेंच पाहिजे. ज्यापेक्षां चैतन्य आहे, त्यापेक्षां त्यांना आत्मत्व सिद्ध झालें. ॥ ६४ ॥ प्राणात्मवादी जे हैरण्यगर्भ यांचें ह्मणणें असें कीं, मनुष्य जिवंत असण्यास इंद्रियाची गरज नाहीं. कारण, नेत्रादि इंद्रियांचा नाश झाला तरी प्राण असेपर्यंत तो जगतो. ॥ ६५ ॥ मनुष्य निजला तरी प्राण जागृतच असतो. प्राणाचें श्रेष्ठत्व श्रुतींत वर्णिलें आहे. प्राणमय कोशाचें वर्णन वेदांतविस्तारेंकरून केलें आहे. ॥ ६६ ॥ दुसरे कित्येक उपासना करणारे लोक असें ह्मणतात कीं, ज्या अर्थी प्राणास भोक्तेपणा नाहीं हें स्पष्ट आहे, त्या अर्थी भोक्तृ जें मन तोच आत्मा होय. ॥ ६७ ॥ ह्यास प्रमाण.—“ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ” हा गीतेंतील श्लोक ह्याचा अर्थ मनुष्यांच्या बंधमोक्षांस कारण मनच आहे. शिवाय श्रुतींमध्यें मनोमय कोशाचें वर्णन आहेच, त्या अर्थी मनच आत्मा असें सिद्ध होतें. ॥ ६८ ॥ क्षणिक वादी ( बौद्ध ) असें ह्मणतात. कीं, विज्ञान ह्मणजे बुद्धि ती मनाचें मूळ आहे ह्मणून बुद्धि हाच आत्मा. ॥ ६९ ॥ याची सिद्धि अशी कीं, अंतःकरणाचे भाग दोन, एक अहंवृत्ति आणि दुसरी इदंवृत्ति. एथें अहंवृत्ति हें विज्ञान आणि इदंवृत्ति हें मन. ॥ ७० ॥ मीपणाचा प्रत्यय आल्यावांचून बाहेरचें जग आह्माला कदापि सम-

---

त्याहुर्लोकायताः परे ॥ ६२ ॥ प्रत्यक्षत्वेनाभिमताहंधीर्देहातिरेकिणम् ॥ गमयेदिंद्रियात्मानं वच्मीत्यादिप्रयोगतः ॥६३॥ वागादीनामिंद्रियाणां कलहः श्रुतिषु श्रुतः ॥ तेन चैतन्यमेतेषामात्मत्वं तत एव हि ॥ ६४ ॥ हैरण्यगर्भाः प्राणात्मवादिनस्त्वेवमूचिरे ॥ चक्षुराद्यक्षलोपेऽपि प्राणसत्त्वे तु जीवति ॥ ६५ ॥ प्राणो जागर्ति सुप्तेऽपि प्राणश्रैष्ठ्यादिकं श्रुतम् ॥ कोशः प्राणमयः सम्यग्विस्तरेण प्रपंचितः ॥ ६६ ॥ मन आत्मेति मन्यंत उपासनपरा जनाः ॥ प्राणस्याभोक्तृता स्पष्टा भोक्तृत्वं मनसस्ततः ॥६७॥ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥ श्रुतो मनोमयः कोशस्तेनात्मेतीरितं मनः ॥६८॥ विज्ञानमात्मेति पर आहुः क्षणिकवादिनः ॥ यतो विज्ञानमूलत्वं मनसो गम्यते स्फुटम् ॥६९॥ अहंवृत्तिरिदंवृत्तिरित्यंतःकरणं द्विधा ॥ विज्ञानं स्यादहंवृत्तिरिदंवृत्तिर्मनो भवेत् ॥ ७० ॥ अहंप्रत्ययबीजत्वमिदंवृत्तेरिति स्फुटम् ॥ अवि-

जणार नाहीं, ह्मणून इदंवृत्तीचें बीज अहंवृत्ति आहे. ॥ ७१ ॥ ज्या अर्थी ह्या अहं-वृत्तीस क्षणोक्षणीं जन्म आणि नाश आहेत, त्या अर्थी विज्ञान हें क्षणिक आहे आणि तें स्वयंप्रकाश आहे, ह्याला तर दुसरें प्रमाणच नको. ॥ ७२ ॥ ह्याविषयीं वेदाचें प्रमाण वि-ज्ञानमय कोश जो श्रुतींत सांगितला आहे, तेंच आहे. कारण सुखदुःखादि सर्व संसार या-ह्याचं आहे. ॥ ७३ ॥ विज्ञान हें विद्युल्लता, अभ्र आणि निमेष यांसारखें क्षणिक आहे, ह्म-णून याला आत्मा ह्मणतां येत नाहीं. बरें त्यावांचून पाहूं गेल्यास दुसरें कोणी दिसत नाहीं; ह्मणून शून्यच आहे असें माध्यमिक ह्मणतात. ॥ ७४ ॥ ते आपल्या पक्षास "असदेवेदमग्र आसीत्" इत्यादिक श्रुतीचें प्रमाण सांगतात. ज्ञानज्ञेयात्मक सर्व जग तर केवळ भ्रांतीच आहे. ॥ ७५ ॥ मूळ अधिष्ठानावांचून भ्रांति होणें अशक्य आहे ह्मणून आत्म्याचें अस्तित्व मानलें पाहिजे, ह्मणून शून्यवादी जो आहे त्याणेंही आत्म्याचें अस्तित्व कबूल केलें पाहिजे. नाहीं तर शून्य आहे असें समजणारा कोणी असल्यावांचून तसें बोलणेंच संभव-णार नाहीं. ॥ ७६ ॥ विज्ञानमयाचे आंत दुसरा एक आनंदमय जो कोश तो आत्मा असा वैदिक सिद्धांत आहे. ॥ ७७ ॥ हीं जशीं आत्म्याच्या स्वरूपाविषयीं निरनिराळ्या लोकांचीं निरनिराळीं मतें आहेत, तशींच त्याच्या परिमाणाविषयींही आहेत. कोणी आत्मा अणु ( लहान ) ह्मणतात. कोणी महान् ह्मणतात, आणि कोणी मध्यम ह्मणतात. याप्रमाणें श्रुतीचें व युक्तीचें एकदेशीं सहाय्य घेऊन नानाप्रकारें वाद करितात. ॥ ७८ ॥ अणुवाद्यांस अंत-राल असें ह्मणतात. ते ह्मणतात कीं, ज्या अर्थी एका रोमाच्या सहस्राव्या भागाइतक्या सूक्ष्म नाडीमध्यें आत्म्याचा संचार आहे त्या अर्थी आत्मा अणुरूप आहे. ॥ ७९ ॥ यास श्रुतीं-

---

दित्वा स्वमात्मानं बाह्यं वेत्ति नतु क्वचित् ॥ ७१ ॥ क्षणे क्षणे जन्मनाशावहंवृत्तेर्मितौ यतः ॥ विज्ञानं क्षणिकं तेन स्वप्रकाशं स्वतो मितेः ॥७२॥ विज्ञानमयकोशोऽयं जीव इत्यागमा जगुः ॥ सर्वसंसार एतस्य जन्मनाशसुखादिकः ॥७३॥ विज्ञानं क्षणिकं ना-त्मा विद्युदभ्रनिमेषवत् ॥ अन्यस्यानुपलब्धत्वाच्छून्यं माध्यमिका जगुः ॥७४॥ असदेवेदमित्यादाविदमेव श्रुतं ततः ॥ ज्ञानज्ञेयात्मकं सर्वं जगद्भ्रांतिप्रकल्पितम् ॥७५॥ निरधिष्ठानविभ्रांतेरभावादात्मनोऽस्तिता ॥ शून्यस्यापि ससाक्षित्वादन्यथा नोक्तिरस्य ते ॥ ७६ ॥ अन्यो विज्ञानमयत आनंदमय आंतरः ॥ अस्तीत्येवोपलब्धव्य इतिवैदिकदर्शनम् ॥७७॥ अणुर्महान्मध्यमो वेत्येवं तत्रापि वा-दिनः ॥ बहुधा विवदंते हि श्रुतियुक्तिसमाश्रयात् ॥ ७८ ॥ अणुं वदंत्यांतरालाः सूक्ष्मनाडीप्रचारतः ॥ रोम्णः सहस्रभागेन तुल्या-सु प्रचरत्ययम् ॥७९॥ अणोरणीयानेषोऽणुः सूक्ष्मात्सूक्ष्मतरं त्वि-

तील प्रमाण असें देतात कीं, " अणोरणीयान् " ( लहानाहून लहान ) " एषोऽणुः " ( हा अणु आहे ) " सूक्ष्मात् सूक्ष्मतरं " ( सूक्ष्माहून अतिसूक्ष्म ) इत्यादिक शेंकडों हजारों श्रुति आहेत. हीं अणुवाद्यांचीं प्रमाणें होत. ॥ ८० ॥ दुसरी श्रुति असें सांगते कीं, वालाग्राच्या शंभराव्या हिश्शाच्या शंभराव्या हिश्शाएवढा जीव आहे असें समजावें. ॥ ८१ ॥ दिगंबरवादी आत्मा मध्यम असें ह्मणतात. कारण चैतन्याची व्याप्ति आपादमस्तकपर्यंत आहे, व " आनखाग्रं प्रविष्टः " असें श्रुतिप्रमाणही आहे. ॥ ८२ ॥ वरील श्रुतिसिद्ध जो नाडीप्रचार तो येथें लागू पडत नाहीं असें समजूं नये. जसा देहाचा अंगरख्यांत प्रवेश हस्तद्वारा होतो त्याप्रमाणें येथेंही सूक्ष्म अवयवानें आत्म्याचा प्रवेश कां ह्मणूं नये ॥ ८३ ॥ लहान मोठ्या देहांत याचा प्रवेश होणार नाहीं असें समजूं नये. कारण, आत्म्याचे अंशही त्या त्या देहांप्रमाणें कमी जास्त होतात. तेव्हां तसें होण्यास कांहीं चिंता नाहीं. ॥ ८४ ॥ परंतु ज्याला अंश आहेत त्याचा नाश झालाच पाहिजे. ह्मणून आत्मा सांश मानल्यास घटासारखा तोही नाशवंत होईल. आत्मा अनित्य झाल्यास कृतप्रणाश आणि अकृताभ्यागम हे दोष कसे निवारितां येतील ? ॥ ८५ ॥ ह्मणून ज्या अर्थी आत्मा अणुही ह्मणतां येत नाहीं आणि मध्यमही ह्मणतां येत नाहीं, त्या अर्थी तो आकाशाप्रमाणें व्यापकच असला पाहिजे. त्याचें निरंशत्व तर श्रुतिसिद्धच आहे. ॥ ८६ ॥ अशीं आत्म्याच्या परिमाणाविषयीं निरनिराळीं मतें सांगून शेवटीं आत्म्याचें विभुत्व ठरविलें. आतां त्याच्या विशेष स्वरूपाविषयीं निरनिराळ्या वाद्यांचें मत सांगतों. कोणी आत्मा चैतन्यरूप असें ह्मणतात; कोणी जड असें ह्मणतात; आणि कित्येक तो चिज्जड असें ह्मणतात. ॥ ८७ ॥ प्रभाकरमताचे लोक आणि तार्किक लोक आत्मा जड असें ह्मणतात. आकाश द्रव्य असून त्याचा गुण जसा शब्द त्याप्रमाणें

---

ति ॥ अणुत्वमाहुः श्रुतयः शतशोऽथ सहस्रशः ॥ ८० ॥ वालाग्रशतभागस्य शतधाकल्पितस्य च ॥ भागो जीवः स विज्ञेय इति चाहापराश्रुतिः ॥ ८१ ॥ दिगंबरा मध्यमत्वमाहुरापादमस्तकम् ॥ चैतन्यव्याप्तिसंदृष्टेरानखाग्रश्रुतेरपि ॥ ८२ ॥ सूक्ष्मनाडीप्रचारस्तु सूक्ष्मैरवयवैर्भवेत् ॥ स्थूलदेहस्य हस्ताभ्यां कंचुकप्रतिमोकवत् ॥ ८३ ॥ न्यूनाधिकशरीरेषु प्रवेशोऽपि गमागमैः ॥ आत्मांशानां भवेत्तेन मध्यमत्वं विनिश्चितम् ॥ ८४ ॥ सांशस्य घटवन्नाशो भवत्येव तथा सति ॥ कृतनाशाकृताभ्यागमयोः को वारको भवेत् ॥ ८५ ॥ तस्मादात्मा महानेव नैवाणुर्नापि मध्यमः ॥ आकाशवत्सर्वगतो निरंशः श्रुतिसंमतः ॥ ८६ ॥ इत्युक्त्वा तद्विशेषे तु बहुधा कलहं ययुः ॥ अचिद्रूपोऽथ चिद्रूपश्चिदचिद्रूप इत्यपि ॥ ८७ ॥ प्राभाकरास्तार्किकाश्च प्राहुरस्या-

आत्मा द्रव्य असून चैतन्य हा त्याचा गुण आहे. ॥ ८८ ॥ इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, सुख, दुःख आणि त्यांचे संस्कार हे चैतन्याप्रमाणें आत्म्याचेच गुण आहेत असें ते ह्मणतात. ॥ ८९ ॥ आत्म्याचा आणि मनाचा संयोग झाला असतां आपल्या अदृष्ट कर्माच्या योगानें वरील गुण उत्पन्न होतात; आणि अदृष्टाचा क्षय झाला असतां सुषुप्तींत लीन होतात. ॥ ९० ॥ असें असून तो सचेतन कसा भासतो या शंकेचें ते असें समाधान करितात कीं, तो स्वतः जड आहे तरी चैतन्यगुण त्याचे अंगीं आहे, आणि इच्छा, द्वेष, प्रयत्न हेही पण गुण त्याचे अंगीं आहेत, ह्मणून तो चैतन्यरूप भासतो. तो धर्माधर्माचा कर्ता आणि सुखदुःखांचा भोक्ता आहे. ॥ ९१ ॥ ज्याप्रमाणें कर्मवशेंकरून या देहाचेठायीं केव्हां केव्हां प्राप्त होणारीं जीं सुखदुःखें त्यांच्या भोगाकरितां आत्मा रहातो असें ह्मणतात, त्याप्रमाणें अन्यलोकींही कर्मवशें देहधारण करण्याची इच्छा वगैरे होते. असा आत्म्याविषयीं औपचारिक व्यवहार आहे. ॥ ९२ ॥ या दृष्टीनें सर्वव्यापी जो आत्मा त्याला जाणें येणें संभवतें, एतद्विषयीं सर्व कर्मकांड प्रमाण आहे असें ते ह्मणतात. ॥ ९३ ॥ आनंदमयकोश जो [illegible]ेकाळीं रहातो त्यांत चैतन्य स्पष्ट नाहीं तोच आमचा आत्मा. तो पंचकोशांत पहिला आहे. आणि पूर्वोक्त जे ज्ञानादिक ते त्याचे गुण आहेत. ॥ ९४ ॥ आत्म्याचेठायीं अस्पष्ट चैतन्याचें अनुमान करून आत्मा चिज्जड आहे असें भाट्ट ह्मणतात. कारण निजून उठलेल्याला जडत्वाची जी आठवण होते. ती पूर्वीच्या अनुभवावांचून होणार नाहीं. ह्मणून आत्मा उभयात्मक आहे असें ते ह्मणतात. ॥ ९५ ॥ निजून उठलेला असें ह्मणतो कीं, मी इतका वेळ जड होऊन निजलों होतों. ही जाड्यस्मृति जाड्याच्या अनुभवावांचून कशी हो-

---

चिदात्मताम् ॥ आकाशवद्द्रव्यमात्मा शब्दवत्तद्गुणश्चितिः ॥८८॥ इच्छाद्वेषप्रयत्नाश्च धर्माधर्मौ सुखासुखे ॥ तत्संस्काराश्च तस्यैते गुणाश्चितिवदीरिताः ॥ ८९ ॥ आत्मनो मनसा योगे स्वादृष्टवशतो गुणाः ॥ जायंतेऽथ प्रलीयंते सुषुप्तेऽदृष्टसंक्षयात् ॥९०॥ चितिमत्त्वाच्चेतनोऽयमिच्छाद्वेषप्रयत्नवान् ॥ स्याद्धर्माधर्मयोः कर्ता भोक्ता दुःखादिमत्त्वतः ॥ ९१ ॥ यथाऽत्र कर्मवशतः कादाचित्कं सुखादिकम् ॥ तथा लोकांतरे देहे कर्मणेच्छादि जन्यते ॥ ९२ ॥ एवं च सर्वगस्यापि संभवेतां गमागमौ ॥ कर्मकांडः समग्रोऽत्र प्रमाणमिति तेऽवदन् ॥ ९३ ॥ आनंदमयकोशो यः सुषुप्तौ परिशिष्यते ॥ अस्पष्टचित्स आत्मैषां पूर्वकोशोऽस्य ते गुणाः ॥ ९४ ॥ गूढं चैतन्यमुत्प्रेक्ष्य जडबोधस्वरूपताम् ॥ आत्मनो ब्रुवते भाट्टाश्चिदुत्प्रेक्षोत्थितस्मृतेः ॥९५॥ जडो भूत्वा तदाऽस्वाप्समिति जाड्यस्मृतिस्तदा ॥ विना जाड्यानुभूतिं न

ईल. ॥ ९६ ॥ द्रष्ट्याच्या दृष्टीचा लोप सुषुप्तींत होत नाहीं असें श्रुतींत सांगितलें आहे. ह्मणून आत्मा काजव्याप्रमाणें प्रकाश व अप्रकाश या दोहोंनीं युक्त आहे. ॥ ९७ ॥ याजवर सांख्यवादी असें ह्मणतात कीं, ज्याला अंश नाहीं त्याला उभयात्मकत्व कधींही संभवणार नाहीं, यास्तव आत्मा चिद्रूप आहे. ॥ ९८ ॥ जाड्यांशाची व्यवस्था कशी या प्रश्नाचें उत्तर ते असें देतात कीं, तो जाड्यांश प्रकृतीचें रूप आहे. तें रूप विकारी असून त्रिगुणात्मक आहे. चैतन्याला जे बंधमोक्ष भासतात त्यास कांहीं तरी कारण पाहिजे ह्मणून प्रकृतीची कल्पना त्यांणीं केली. ॥ ९९ ॥ प्रकृति आणि पुरुष अत्यंत भिन्न असतां असंग चैतन्याला बंधमोक्ष कसे? या शंकेचें समाधान ते असें करितात कीं, तो भेद न समजल्यामुळें बंधमोक्षांचा व्यवहार चालला आहे. आणि या व्यवस्थेकरितांच तार्किकांप्रमाणें सांख्यांनींही आत्मभेद मानला आहे. ॥ १०० ॥ " महतः परमव्यक्तं " हें प्रमाण प्रकृतीविषयीं आणि " असंगोहि " हें प्रमाण पुरुषाविषयीं श्रुतींत आहे. ॥ १०१ ॥ चैतन्याजवळ प्रवृत्त झालेली जी प्रकृति तिचें नियमन करणारा जो त्यास योगी ईश्वर असें ह्मणतात. तो परमेश्वर जीवापासून भिन्न आहे, असें श्रुतींत आहे. ॥ २ ॥ प्रधान ( प्रकृति ) व क्षेत्रज्ञ ( जीव ) यांचा पति आणि त्रिगुणांचा ईश अशी श्रुति आहे. याप्रमाणेंच आरण्यक उपनिषदांत अंतर्यामीचें उपपादन केलें आहे. ॥ ३ ॥ याविषयींही वादी आपापल्या युक्ति लढवून कलह करितात, आणि आपला पक्ष दृढ करण्याकरितां यथामति श्रुतिवाक्येंही दाखवितात. ॥ ४ ॥ अविद्यादिक क्लेशकर्मांचीं फळें व कर्मांचे संस्कार यांचा ज्याला स्पर्श मुळींच नाहीं असा जो पुरुषविशेष त्याला ईश असें ह्मणतात. तो जीवात्म्याप्रमाणें असंग आणि चिद्रूप आहे, असें

---

कथंचिदुपपद्यते ॥९६॥ द्रष्टुर्दृष्टेरलोपश्च श्रुतः सुप्तौ ततस्त्वयम् ॥ अप्रकाशप्रकाशाभ्यामात्मा खद्योतवद्युतः ॥ ९७ ॥ निरंशस्योभयात्मत्वं न कथंचिद् घटिष्यते ॥ तेन चिद्रूप एवात्मेत्याहुःसांख्यविवेकिनः ॥ ९८ ॥ जाड्यांशः प्रकृते रूपं विकारि त्रिगुणं च तत् ॥ चितो भोगापवर्गार्थं प्रकृतिः सा प्रवर्तते ॥ ९९ ॥ असंगायाश्चितेर्बंधमोक्षौ भेदाग्रहान्मतौ ॥ बंधमुक्तिव्यवस्थार्थं पूर्वेषामिव चिद्भिदा ॥ १०० ॥ महतः परमव्यक्तमिति प्रकृतिरुच्यते ॥ श्रुतावसंगता तद्वदसंगो हीत्यतः स्फुटा ॥ १ ॥ चित्संनिधौ प्रवृत्तायाः प्रकृतेर्हि नियामकम् ॥ ईश्वरं ब्रुवते योगाः स जीवेभ्यः परः श्रुतः ॥ २ ॥ प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेश इति हि श्रुतिः ॥ आरण्यकेऽसंभ्रमेण ह्यंतर्याम्युपपादितः ॥ ३ ॥ अत्रापि कलहायंते वादिनः स्वस्वयुक्तिभिः॥ वाक्यान्यपि यथाप्रज्ञं दार्ढ्यायोदाहरंति हि ॥ ४ ॥ क्लेशकर्मविपाकैस्तदाशयैरप्यसंयुतः ॥ पुंवि-

पतंजलि म्हणतात. ॥ ५ ॥ तथापि, हा एक विशेष पुरुष आहे असें श्रुतीनें सांगितलें म्हणून त्याला नियंतृता असली पाहिजे. कारण तसें जर न घेतलें तर बंधमोक्षांची व्यवस्था होणार नाहीं. ॥ ६ ॥ " भीषास्मात् " इत्यादिक श्रुतीमध्यें असंग परमात्म्याला नियंतृत्व सांगितलें आहे. आणि ईश्वर असंग असल्यामुळें क्लेशादिकांचा संभव नाहीं. यावरून तें श्रुतिप्रमाण युक्तही दिसतें. ॥ ७ ॥ तर जीवही असंग आहे म्हणून त्यालाही क्लेशादिक नसावेत असें जर कोणी म्हणेल तर जीवांना तत्त्वज्ञान नसल्यामुळें क्लेशादिक होतात, असें पूर्वींच सांगितलें आहे. ॥ ८ ॥ नित्यज्ञान, नित्यप्रयत्न, नित्यइच्छा इत्यादिक गुण ईश्वराला आहेत म्हणून तो असंग नव्हे. कारण, असंगाला नियंतृत्व अयोग्य आहे असें तार्किक मानितात. ॥ ९ ॥ त्यांचें म्हणणें असें.—याला नित्यगुण असल्यामुळें विशेष पुरुष म्हणून जें वर म्हटलें तेंही योग्य आहे. सत्यकाम सत्यसंकल्प असें श्रुतींत प्रमाण आहेच. ॥ ११० ॥ ईश्वराचे ज्ञानादि गुण जर नित्य मानले तर सदा सृष्टीच होईल. म्हणून लिंगदेहानें संयुक्त असा हिरण्यगर्भच आमचा ईश असें कित्येक म्हणतात. ॥ ११ ॥ उद्गीथ ब्राह्मणांत हिरण्यगर्भाचें माहात्म्य विस्तारेंकरून सांगितलें आहे. लिंग शरीर असल्यामुळें त्याला जीवत्व येईल अशी शंका नको. कारण, अविद्येमुळें होणारीं कर्मे तीं त्याला संभवत नाहींत. ॥ १२ ॥ आतां दुसरें मत.—स्थूळ देहावांचून लिंगदेह कोठेंच दिसत नाहीं. याकरितां सर्वत्र मस्तकें धारण करणारा असा जो विराट् पुरुष तोच ईश्वर. ॥ १३ ॥ ते विराड्उपासक आपल्या मतास

---

शेषो भवेदीशो जीववत्सोऽप्यसंगचित् ॥ ५ ॥ तथापि पुंविशेषत्वाद्धटतेऽस्य नियंतृता ॥ अव्यवस्थौ बंधमोक्षावापतेतामिहान्यथा ॥ ६ ॥ भीषास्मादित्येवमादावसंगस्य परमात्मनः ॥ श्रुतं तद्युक्तमप्यस्य क्लेशकर्माद्यसंगमात् ॥ ७ ॥ जीवानामप्यसंगत्वात् क्लेशादिर्न ह्यथाऽपि च ॥ विवेकाग्रहतः क्लेशकर्मादि प्रागुदीरितम् ॥ ८ ॥ नित्यज्ञानप्रयत्नेच्छा - गुणानीशस्य मन्वते ॥ असंगस्य नियंतृत्वमयुक्तमिति तार्किकाः ॥ ९ ॥ पुंविशेषत्वमप्यस्य गुणैरेव न चान्यथा ॥ सत्यकामः सत्यसंकल्प इत्यादिश्रुतिर्जगौ ॥ १० ॥ नित्यज्ञानादिमत्वेऽस्य सृष्टिरेव सदा भवेत् ॥ हिरण्यगर्भ ईशोऽतो लिंगदेहेन संयुतः ॥ ११ ॥ उद्गीथब्राह्मणे तस्य माहात्म्यमतिविस्तृतम् ॥ लिंगसत्वेऽपि जीवत्वं नास्य कर्माद्यभावतः ॥ १२ ॥ स्थूलदेहं विना लिंगदेहो न क्वापि दृश्यते ॥ वैराजो देह ईशोऽतः सर्वतो मस्तकादिमान् ॥१३॥ सहस्रशीर्षेत्येवं च विश्वतश्चक्षुरित्यपि ॥ श्रुतमित्याहुरनिशं विश्वरू-

" सहस्रशीर्षा " " विश्वतश्चक्षुः " इत्यादिक प्रमाणें देतात. ॥ १४ ॥ जिकडून तिकडून हातपाय ज्याला आहेत तो ईश्वर असें मानल्यास कित्येक किड्यांना देखील ईश्वर ह्मणावें लागेल. ह्मणून चतुर्मुख जो ब्रह्मदेव तोच ईश्वर; त्यावांचून दुसरा पुरुष ईश्वर नाहीं. ॥१५॥ हें मत जे लोक पुत्राकरितां उपासना करितात त्यांचें होय. " प्रजापतिः प्रजाः असृजत " इत्यादिक श्रुतीच हे लोक प्रमाणास देतात. ॥ १६ ॥ ब्रह्मदेव विष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला आहे, ह्मणून भागवतजन विष्णूच ईश्वर असें ह्मणतात. ॥ १७ ॥ शंकराचे पाय शोधण्यास विष्णु समर्थ झाला नाहीं. ह्मणून शिवच ईश्वर होय, विष्णु नव्हे; असें आगमाला मुख्य मानणारे जे शैव ते म्हणतात. ॥ १८ ॥ त्या शिवानेंही त्रिपुराचा नाश करण्याकरतां विघ्नेशाची पूजा केली, म्हणून, गाणपत्य मताला अनुसरणारे विनायकालाच ईश्वर म्हणतात. ॥ १९ ॥ ह्या प्रकारें दुसरे, आपापलीं मतें, अभिमानानें निरनिराळे मंत्र, अर्थवाद आणि कल्पना यांच्या आधारानें प्रतिपादन करितात. ॥ १२० ॥ ह्या प्रकारें अंतर्यामीपासून स्थावरापर्यंत सर्व पदार्थांस ईश्वर मानणारे लोक आहेत. कित्येक लोकांचें अश्वत्थ, कित्येकांचें रुईचें झाड, कित्येकांचें वेळू हें कुलदैवत असलेलें जगांत आढळतें ॥ १२१ ॥ तत्त्वाचा निश्चय करण्याचे हेतूनें न्याय आणि आगम यांच्या आधारानें तत्त्ववेत्त्यांनीं ईश्वराविषयीं सिद्धांत एकच ठरविला आहे; तो एथें स्पष्ट सांगतों. ॥ १२२ ॥ माया हीच प्रकृति ( जगाचें उपादान कारण ) आहे. आणि ही मायोपाधि ज्याणें धारण केली आहे तोच परमेश्वर (जगाचें निमित्त कारण) होय. आणि याच्या अंशरूपानें सर्व जग व्यापून गेलें आहे. ॥ १२३ ॥ या

---

पस्य चिंतकाः ॥१४॥ सर्वतः पाणिपादत्वे कृम्यादेरपि चेशता ॥ ततश्चतुर्मुखो देव एवेशो नेतरः पुमान् ॥ १५ ॥ पुत्रार्थं तमुपासीना एवमाहुः प्रजापतिः ॥ प्रजा असृजतेत्यादिश्रुतिं चोदाहरंत्यमी ॥ १६ ॥ विष्णोर्नाभेः समुद्भूतो वेधाः कमलजस्ततः ॥ विष्णुरेवेश इत्याहुर्लोके भागवता जनाः ॥ १७ ॥ शिवस्य पादावन्वेष्टुं शाङ्‌र्ग्यशक्तस्ततः शिवः ॥ ईशो न विष्णुरित्याहुः शैवा आगममानिनः ॥ १८ ॥ पुरत्रयं सादयितुं विघ्नेशं सोऽप्यपूजयत् ॥ विनायकं प्राहुरीशं गाणपत्यमते रताः ॥ १९ ॥ एवमन्ये स्वस्वपक्षाभिमानेनान्यथाऽन्यथा ॥ मंत्रार्थवादकल्पादीनाश्रित्य प्रतिपेदिरे ॥ २० ॥ अंतर्यामिणमारभ्य स्थावरांतेशवादिनः ॥ संत्यश्वत्थार्कवंशादेः कुलदैवतदर्शनात् ॥ २१ ॥ तत्त्वनिश्चयकामेन न्यायागमविचारिणाम् ॥ एकैव प्रतिपत्तिः स्यात् साऽप्यत्र स्फुटमुच्यते ॥ २२ ॥ मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥ अस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥ २३ ॥ इति

श्रुतीच्या आधारानें ईश्वराविषयीं निर्णय करणें योग्य आहे. असें केल्यानें स्थावरापर्यंत ईश्वर मानणारांपैकीं कोणाच्याही मतास विरोध येत नाहीं. ॥१२४॥ ही माया तमोरूप (जड) आहे असें तापनीय उपनिषदांत सांगितलें आहे. याविषयीं अनुभूति प्रमाण आहे असें स्वतः श्रुतीच म्हणते. ॥१२५॥ " जडं मोहात्मकं तच्च " ( तें मायारूप जड आणि मोहात्मक आहे) असें श्रुति अनुभवास आणिते. तें बाळगोपाळांच्या अनुभवास आल्यामुळें ती अनंतही आहे असें श्रुति म्हणते. ॥ १२६ ॥ घटादिक अचेतन पदार्थांचें जें स्वरूप तें जड असें समजावें. आणि जेथें बुद्धि कुंठित होते तोच मोह असें लोक म्हणतात. ॥ १२७ ॥ याप्रमाणें लौकिक दृष्ट्या हें मायारूप सर्वांच्या अनुभवास येतें. परंतु युक्तीनें पाहिलें असतां " नो सदासीत् " या श्रुतीवरून तें अनिर्वाच्य आहे असें ठरतें. म्हणजे तें आहे असेंही म्हणतां येत नाहीं. व नाहीं असेंही म्हणतां येत नाहीं. ॥ १२८ ॥ तें भासतें म्हणून नाहीं म्हणतां येत नाहीं. व बाधित होतें म्हणून आहे असेंही म्हणतां येत नाहीं. म्हणून ज्ञानदृष्टीनें या मायेचें रूप तुच्छ आहे असें श्रुतीनें सांगितलें. कारण, त्याला नेहमीं निवृत्ति ( नाश ) आहे. ॥ १२९ ॥ या प्रकारेंकरून श्रुति, युक्ति आणि लौकिक या तीन दृष्टींनीं मायेचें रूप तीन प्रकारचें आहे. म्हणजे श्रुतीनें ती तुच्छ, युक्तीनें ती अनिर्वाच्य आणि व्यवहारदृष्टीनें ती खरी. ॥ १३० ॥ ज्याप्रमाणें चित्रपट गुंडाळण्यानें व तो पसरण्यानें चित्राचें नसणें व असणें अनुभवाला येतें, त्याप्रमाणें मायेमुळें जगाचें असणें व नसणें घडतें. ॥ ३१ ॥ ब्रह्मावांचून मायेची प्रतीति नाहीं म्हणून हिला स्वतंत्र म्हणतां येत नाहीं. बरें असें जर म्हणावें, तर असंग जें ब्रह्म त्याला हिर्णे

---

श्रुत्यनुसारेण न्याय्यो निर्णय ईश्वरे ॥ तथा सत्यविरोधः स्यात्स्थावरांते शंवादिनाम् ॥ २४ ॥ माया चेयं तमोरूपा तापनीये तदीरणात् ॥ अनुभूतिं तत्र मानं प्रतिजज्ञे श्रुतिः स्वयम् ॥२५॥ जडं मोहात्मकं तच्चेत्यनुभावयति श्रुतिः ॥ आबालगोपं स्पष्टत्वादानंत्यं तस्य साऽब्रवीत् ॥ २६ ॥ अचिदात्मघटादीनां यत्स्वरूपं जडं हि तत् ॥ यत्र कुंठीभवेद्बुद्धिः स मोह इति लौकिकाः ॥ ॥२७॥ इत्थं लौकिकदृष्ट्यैतत्सर्वैरप्यनुभूयते ॥ युक्तिदृष्ट्या त्वनिर्वाच्यं नासदासीदिति श्रुतेः ॥ २८ ॥ नासदासीद्विभातत्वान्नो सदासीच्च बाधनात् ॥ विद्यादृष्ट्या श्रुतं तुच्छं तस्यानित्यनिवृत्तितः ॥ २९ ॥ तुच्छाऽनिर्वचनीया च वास्तवी चेत्यसौ त्रिधा॥ ज्ञेया माया त्रिभिर्बोधैः श्रौतयौक्तिकलौकिकैः ॥ ३० ॥ अस्य सत्त्वमसत्त्वं च जगतो दर्शयत्यसौ ॥ प्रसारणाच्च संकोचाद्यथा चित्रपटस्तथा ॥ ३१ ॥ अस्वतंत्रा हि माया स्यादप्रतीतेर्विना चितिम् ॥ स्वतंत्राऽपि तथैव स्यादसंगस्यान्यथाकृतेः ॥ ३२ ॥

ससंग केलें म्हणून परतंत्रही म्हणतां येत नाहीं. ॥ ३२ ॥ असंगाची अन्यथा कृति कोणती म्हणाल तर कूटस्थ असंग जो आत्मा त्याला तिनें जगाचें रूप आणिलें; आणि चिदाभासरूपानें जीव आणि ईश यांना तिनेंच निर्माण केलें. ॥ ३३ ॥ एवढें जग करूनही तिचा कूटस्थास लवमात्र संपर्क नाहीं. मायेचा स्वभावच दुर्घट रचनेचा आहे. मग तिच्या या कृतीमध्यें नवल तें काय ? ॥ ३४ ॥ ज्याप्रमाणें उदकाचा स्वभाव द्रवत्व, अग्नीचा स्वभाव उष्णता, आणि दगडाचा स्वभाव काठिन्य, त्याप्रमाणें दुर्घटत्व हा मायेचा स्वभावच आहे. स्वभावास दुसरें प्रमाण लागत नाहीं.॥३५॥जोंपर्यंत लोकांनीं तिचा स्वभाव जाणला नाहीं तोंपर्यंत तिचा चमत्कार त्यांस वाटतो. नंतर ही माया आहे असें समजलें की, तत्काळ समाधान होतें. ॥ ३६ ॥ सृष्टिसंबंधीं शंका, जगाला खरें मानणारें जे नैय्यायिक आहेत त्यांच्यामध्यें मात्र पुष्कळ चालतात. मायावाद्यांपुढें त्यांची लटपट चालत नाहीं. कारण त्यांचे मतें मायेचें रूप शंकात्मकच आहे. ॥ ३७ ॥ शंकारूपी माया आहे असें आम्हीं म्हटलें, त्याजवरही जर कोणी शंका घेईल तर त्याचे शंकेवर पुनः आम्हीं शंका घेतों. म्हणून शंकेवर शंका घेणें हें योग्य नव्हे. तर शंका घेतल्यावर तिचें निवारणच केलें पाहिजे. ॥ ३८ ॥ केवळ विस्मयाचीच पुतळी अशी जी माया तिचें रूप शंकामय असल्यामुळें तिचा परिहार काय आहे याचा शोध करण्याविषयीं पंडितांनीं प्रयत्न करावा. ॥ ३९ ॥ ही मायाच आहे असें जर तुमचे मनांत समजावयाचें आहे तर लोकप्रसिद्ध मायेचें लक्षण समजून घेतलें म्हणजे झालें. ॥ १४० ॥ स्पष्ट तर भासतें आणि तिचें कारण तर सांगतां येत नाहीं. तीच माया असें लोक म्हणतात, ती माया गारुडादिकांत सर्वांच्या दृष्टीस पडते. ॥ १४१ ॥ हें लक्षण

---

कूटस्थासंगमात्मानं जगत्वेन करोति सा ॥ चिदाभासस्वरूपेण जीवेशावपि निर्ममे ॥ ३३ ॥ कूटस्थमनुपद्रुत्य करोति जगदादिकम् ॥ दुर्घटैकविधायिन्यां मायायां का चमत्कृतिः ॥ ३४ ॥ द्रवत्वमुदके वन्हावौष्ण्यं काठिन्यमश्मनि ॥ मायाया दुर्घटत्वं च स्वतः सिद्ध्यति नान्यतः ॥ ३५ ॥ न वेत्ति लोको यावत्तां साक्षात्तावच्चमत्कृतिम् ॥ धत्ते मनसि पश्चात्तु मायैवेत्युपशाम्यति ॥ ॥ ३६ ॥ प्रसरंति हि चोद्यानि जगद्वस्तुत्ववादिषु ॥ न चोदनीयं मायायां तस्याश्चोद्यैकरूपतः ॥ ३७ ॥ चोद्येऽपि यदि चोद्यं स्यात् त्वच्चोद्ये चोद्यते मया ॥ परिहार्यं ततश्चोद्यं न पुनः प्रतिचोद्यताम् ॥३८॥ विस्मयैकशरीराया मायायाश्चोद्यरूपतः ॥ अन्वेष्यः परिहारोऽस्या बुद्धिमद्भिः प्रयत्नतः ॥ ३९ ॥ मायात्वमेव निश्चेयमिति चेत्तर्हि निश्चिनु ॥ लोकप्रसिद्धमायाया लक्षणं यत्तदीक्ष्यताम् ॥ ४० ॥ न निरूपयितुं शक्या विस्पष्टं भासते च या ॥ सा मायेतींद्रजालादौ लोकाः संप्रतिपेदिरे ॥ ४१ ॥ स्पष्टं

जगालाही कसें लागू पडतें तें पहा. कारण तेंही स्पष्ट भासून त्याची उपपत्ति कांहीं समजत नाहीं. याकरितां जग मायामय आहे ही गोष्ट निष्पक्षपात दृष्टीनें मनांत आणा. ॥ १४२ ॥ आजपर्यंत पंडितांनीं या जगाचें निरूपण करण्यास पुष्कळ प्रयत्न केले. परंतु त्यांचे पुढें अज्ञानाचा परिघ शेवटीं भासतोच. ॥ १४३ ॥ वरील ह्मणणें ज्यांना खरें वाटत नसेल त्यांणीं आह्मी जे प्रश्न करितों त्यांचीं उत्तरें द्यावींत:—वीर्यापासून देहेंद्रियादिक कशीं उत्पन्न होतात ? व पुढें त्यांत चैतन्य-प्रवेश कसा होतो ? ॥ १४४ ॥ वीर्याचा हा स्वभावच असें जर ह्मणाल तर तें तुह्मांला कसें समजलें ? अन्वयव्यतिरेकाचे योगानें— ह्मणजे जेथें वीर्य तेथें देहादिक आहेत; आणि जेथें वीर्य नाहीं तेथें तेही नाहींत,-या नियमांवरून आम्हांस समजलें, असें कदाचित् उत्तर येईल तर तसा नियम अनुभवास येत नाहीं. कारण, वीर्य हें पुष्कळदां निष्फळ होतें. ॥ १४५ ॥ यावर मला कांहीं ठाऊक नाहीं हेंच शेवटचें उत्तर येणार. म्हणूनच मोठमोठ्यांनीं हें जग गारुड असें ठरविलें. ॥ १४६ ॥ काय चमत्कार सांगावा ! गर्भांत असणाऱ्या रेताला हातपाय, डोकें असे नानांकुर फुटून शेवटीं तें चेतना पावतें. नंतर क्रमानें बाल, यौवन आणि वृद्ध या दशा मनुष्य अनुभवितो. आणि पाहणें, ऐकणें, वास घेणें इत्यादिक क्रिया करून आला तसा जातो यापेक्षां दुसरें गारुड तें कोणचें ? ॥ १४७ ॥ देहाप्रमाणेंच वटबीजादिकांचा विचार करून पहावा. कोणीकडे तें सूक्ष्म बीज, आणि कोणीकडे तो अफाट वृक्ष ! तस्मात् ही माया आहे अशा निश्चयांतच समाधान आहे. ॥ १४८ ॥ आम्हांला जरी याचें उत्तर देतां आलें नाहीं, तरी तार्किकादिक जे आहेत ते त्याचें उत्तर देण्यास समर्थ आहेत, असें जर म्हणाल,

---

भाति जगच्चेदमशक्यं तन्निरूपणम् ॥ मायामयं जगत्तस्मादीक्षस्वापक्षपाततः ॥ ४२ ॥ निरूपयितुमारब्धे निखिलैरपि पंडितैः ॥ अज्ञानं पुरतस्तेषां भाति कक्षासु कासुचित् ॥ ४३ ॥ देहेंद्रियादयो भावा वीर्येणोत्पादिताः कथम् ॥ कथं वा तत्र चैतन्यमित्युक्ते ते किमुत्तरम् ॥ ४४ ॥ वीर्यस्यैष स्वभावश्चेत्कथं तद्विदितं त्वया ॥ अन्वयव्यतिरेकौ यौ भग्नौ तौ वंध्यवीर्यतः ॥ ॥ ४५ ॥ न जानामि किमप्येतदित्यंते शरणं तव ॥ अत एव महांतोऽस्य प्रवदंतींद्रजालताम् ॥ ४६ ॥ एतस्मात्किमिवेंद्रजालमपरं यद्गर्भवासस्थितम् ॥ रेतश्चेतति हस्तमस्तकपदप्रोद्भूतनानांकुरम् ॥ पर्यायेण शिशुत्वयौवनजरावेषैरनेकैर्वृतं ॥ पश्यत्यत्ति शृणोति जिघ्रति तथा गच्छत्यथागच्छति ॥ ४७ ॥ देहवद्वटधानादौ सुविचार्य विलोक्यताम् ॥ क्व धाना कुत्र वा वृक्षस्तस्मान्मायेति निश्चिनु ॥ ४८ ॥ निरुक्तावभिमानं ये दधते तार्किकादयः ॥

तर हर्षमिश्रादिक जे आहेत ते त्यांनाही वादांत हटविणारे आहेत. ॥ १४९ ॥ ह्याकरितां खरोखर जें तर्कापलीकडे आहे तेथें तर्काची योजना कधींही करूं नये. हें जग असें आहे कीं, त्याजविषयीं बुद्धीचा तर्क कांहींच चालत नाहीं. मग उगीच बडबड करण्यांत काय अर्थ आहे ? ॥ १५० ॥ ही जगाची गोष्ट झाली. परंतु मायेचा संबंध येथें काय आला ? असें जर म्हणाल तर अचिंत्य रचना शक्तिरूप जें जगाचें कारण तीच माया. हें मायाबीज सुषुप्तीमध्यें प्रत्ययास येतें. ॥ १५१ ॥ त्या कारणांत जाग्रत्स्वप्नरूप जें जग, तें बीजांत जसा वृक्ष लीन होतो त्याप्रमाणें लीन होतें. याकरितां सर्व जगाच्या वासना त्या कारणांत आहेत असें म्हटलें पाहिजे. ॥ १५२ ॥ त्या बुद्धीच्या वासनांमध्यें चैतन्याचें प्रतिबिंब पडतें. येथें अभ्राकाशाप्रमाणें अस्पष्ट चिदाभासाचें अनुमान करावें. ॥ १५३ ॥ तें मायारूप बीज बुद्धीच्या रूपानें प्रतिबिंब घेऊनच उदयास येतें. याकरितां बुद्धीच्याठायीं चिदाभास स्पष्ट दिसतो. ॥ १५४ ॥ म्हणूनच श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, माया ही प्रतिबिंबाच्या योगानें जीव आणि ईश यांस करिते. जलाकाश व मेघाकाशाप्रमाणें त्यांचा भेद समजावा. ॥ १५५ ॥ येथें मेघांप्रमाणें माया. तुषारांप्रमाणें धीवासना, आणि तुषारांत असलेल्या आकाशाप्रमाणें चिदाभास समजावा. ॥ १५६ ॥ माया ज्याच्या आधीन आहे त्यालाच श्रुतीमध्यें मायी, अंतर्यामी, सर्वज्ञ आणि जगद्योनि, असें नांव दिलें आहे. ॥ १५७ ॥ ह्याप्रमाणें सुषुप्तीसंबंधीं जो आनंदमय कोश तो ईश्वर असें श्रुतीनें सांगितलें. वेदोक्त ईश्वर

---

हर्षमिश्रादिभिस्ते तु खंडनादौ सुशिक्षिताः ॥ ४९ ॥ अचिंत्याः खलु ये भावा न तांस्तर्केषु योजयेत् ॥ अचिंत्यरचनारूपं मनसाऽपि जगत्खलु ॥ १५० ॥ अचिंत्यरचनाशक्तिबीजं मायेति निश्चिनु ॥ मायाबीजं तदेवैकं सुषुप्तावनुभूयते ॥ ५१ ॥ जाग्रत्स्वप्नजगत्तत्र लीनं बीज इव द्रुमः ॥ तस्मादशेषजगतो वासनास्तत्र संस्थिताः ॥ ५२ ॥ याबुद्धिवासनास्तासु चैतन्यं प्रतिबिंबति ॥ मेघाकाशवदस्पष्टचिदाभासोऽनुमीयताम् ॥ ५३ ॥ साभासमेव तद्बीजं धीरूपेण प्ररोहति ॥ अतो बुद्धौ चिदाभासो विस्पष्टं प्रतिभासते ॥ ५४ ॥ मायाभासेन जीवेशौ करोतीति श्रुतौ श्रुतम् ॥ मेघाकाशजलाकाशाविव तौ सुव्यवस्थितौ ॥ ५५ ॥ मेघवद्वर्तते माया मेघस्थिततुषारवत् ॥ धीवासनाश्चिदाभासस्तुषारस्थखवत् स्थितः ॥ ५६ ॥ मायाधीनश्चिदाभासः श्रुतो मायी महेश्वरः ॥ अंतर्यामी च सर्वज्ञो जगद्योनिः स एव हि ॥ ५७ ॥ सौषुप्तमानंदमयं प्रक्रम्यैवं श्रुतिर्जगौ ॥ एष सर्वेश्वर इति सोऽयं वेदो-

ह्याच. ॥ १५८ ॥ हा ईश्वर मानला तर त्याचे ठायीं सर्वज्ञत्वादि गुण कसे आले अशी शंका नको. कारण श्रुतीचा अर्थ तर्कास योग्य नाहीं. आणि मायेचेठायीं सर्व संभव आहे. ॥ १५९ ॥ ईश्वर जी सृष्टि उत्पन्न करितो ती अन्यथा करण्यास कोणी समर्थ नाहीं. म्हणून याला सर्वेश्वर असें ह्मणतात. ॥ १६० ॥ अखिल प्राण्यांच्या बुद्धिवासना त्याच्या ठायीं एकत्र झालेल्या आहेत, आणि त्या सर्व वासनांला हें सर्व जग विषय आहे म्हणून त्याला सर्वज्ञ म्हटलें. ॥ १६१ ॥ वासना परोक्ष आहेत ह्मणून सर्वज्ञत्व अनुभवास येत नाहीं खरें; तथापि, तेंच सर्वांच्या बुद्धींत असल्यामुळें वासनांतही त्याचें अनुमान होतें. ॥ १६२ ॥ विज्ञानमयादिक कोशांमध्यें आणि पृथ्व्यादिक जड पदार्थांमध्यें आंत राहून नियमन करितो ह्मणून तो अंतर्यामी. ॥ १६३ ॥ बुद्धीच्या ठायीं राहून, बुद्धीला अदृश्य, बुद्धि हेंच त्याचें शरीर, असें असून तो बुद्धीचें नियमन करितो असा श्रुतीचा डांगोरा आहे. ॥ १६४ ॥ ज्याप्रमाणें पटामध्यें तंतु उपादानरूपानें असतो त्याप्रमाणें ईश्वरही सर्व सृष्टीचें उपादान असल्यामुळें तो सर्वत्र व्यापक आहे. ॥ १६५ ॥ पटाच्या आंत तंतु, तंतूच्या आंत अंशु, या रीतीनें जेथें आंतपणाची सीमा संपून बुद्धि विश्रांति घेते तेथें ईश्वराचें अनुमान करावयाचें. ॥ १६६ ॥ एकीच्या आंत दुसरी, दुसरीच्या आंत तिसरी, याप्रमाणें कक्षा किती जरी दृष्टीस पडल्या, तरी अंतर्यामी परमेश्वर दिसत नाहीं; ह्मणून त्याचा निर्णय युक्ति आणि श्रुति या दोहोंच्या साहाय्यानेंच केला पाहिजे. ॥ १६७ ॥ तंतु पटरूपानें असतो ह्मणून पट हा तंतूचें बनलेलें असें एक शरीरच आहे, त्याप्रमाणें सर्वरूपानें ईश्वर आहे ह्मणून सर्व जगच याचें

---

क्त ईश्वरः ॥ ५८ ॥ सर्वज्ञत्वादिके तस्य नैव विप्रातिपद्यताम् ॥
श्रौतार्थस्यावितर्क्यत्वान्मायायां सर्वसंभवात् ॥ ५९ ॥ अयं यत्सृजते विश्वं तदन्यथयितुं पुमान् ॥ न कोऽपि शक्तस्तेनायं सर्वेश्वर इतीरितः ॥ १६० ॥ अशेषप्राणिबुद्धीनां वासनास्तत्र संस्थिताः ॥
तांभिः क्रोडीकृतं सर्वं तेन सर्वज्ञ ईरितः ॥ ६१ ॥ वासनानां परोक्षत्वात्सर्वज्ञत्वं न हीक्ष्यते ॥ सर्वबुद्धिषु तद्दृष्ट्वा वासनास्वनुमीयताम् ॥ ६२ ॥ विज्ञानमयमुख्येषु कोशेष्वन्यत्र चैव हि ॥
अंतस्तिष्ठन् यमयति तेनांतर्यामितां व्रजेत् ॥ ६३ ॥ बुद्धौ तिष्ठन्नांतरोऽस्यांधियोनीक्ष्यश्च धीवपुः ॥ धियमंतर्यमयतीत्येवं वेदेन घोषितम् ॥ ६४ ॥ तंतुः पटे स्थितो यद्वदुपादानतया तथा ॥
सर्वोपादानरूपत्वात् सर्वत्रायमवस्थितः ॥ ६५ ॥ पटादप्यांतरस्तंतुस्तंतोरप्यंशुरांतरः ॥ आंतरत्वस्य विश्रांतिर्यत्रासावनुमीयताम् ॥
॥ ६६ ॥ द्वित्रांतरत्वकक्षाणां दर्शनेऽप्ययमांतरः ॥ न वीक्ष्यते ततो युक्तिश्रुतिभ्यामेव निर्णयः ॥ ६७ ॥ पटरूपेण संस्थानात्

शरीर आहे. ॥ १६८ ॥ तंतूचा संकोच, विस्तार आणि चलन हे जसजसे होतील तसतसा पटही संकोचादिक दशा पावतो. पटाच्याठायीं स्वातंत्र्य मुळींच नाहीं. ॥ १६९ ॥ त्याप्रमाणें हा अंतर्यामी जेथें जेथें ज्या वासनेनें जसा जसा विकार पावतो, त्या त्याप्रमाणें सर्व गोष्टी घडतात यांत संशय नाहीं. ॥ १७० ॥ भगवंतांनीं अर्जुनास असें सांगितलें आहे कीं, 'सर्व भूतांच्या हृदयांमध्यें ईश्वर वास करितो. आणि जणु यंत्रावरच बसविलेलीं भूतें आपल्या मायारूप किल्लीनें फिरवीत आहे. ॥ १७१ ॥ येथें " सर्वभूतानां " याचा अर्थ हृदयांत असलेले विज्ञानमय जे कोश तेच येथें भूतें समजावीं. त्यांचें उपादान कारण जो ईश तोच विकारातें पावतो. ॥ १७२ ॥ येथें देह, मन, बुद्धि आदिक जे पंजर तेंच यंत्र होय. त्याजवरील जो अभिमान हाच आरोह ( चढणें ) आणि विधिनिषेधात्मक कर्माविषयीं जी प्रवृत्ति तेंच भ्रमण होय. ॥ १७३ ॥ आतां " भ्रामयन् " ही प्रयोजक क्रिया व माया या दोन शब्दांचा अर्थ सांगतों. त्या कर्माची प्रवृत्ति विज्ञानमयरूपानें असल्यामुळें ईश आपल्या शक्तीच्या योगानें जो विकार करितो त्यालाच मायेचे योगानें फिरविणें असें ह्मणतात.॥१७४॥ श्रुतींत " अंतर्यमयति " असें जें वचन आहे त्याचाही अर्थ हाच आहे. हाच न्यायबुद्धीनें पृथिव्यादिकांना लावावा. ॥ १७५ ॥ मी धर्म जाणतों ह्मणून माझी धर्माकडे प्रवृत्ति आहे असें नाहीं. व अधर्म जाणतों ह्मणून अधर्मापासून माझी निवृत्ति आहे असेंही नाहीं. तर हृदयांत बसलेला कोणी एक देव मजकडून जसें करवितो तसें मी करीत आहें, असें पुराणांत वचन आहे. ॥ १७६ ॥ तर मग मनुष्य–प्रयत्न व्यर्थ अशी शंका कोणी घे-

---

पटस्तंतोर्वपुर्यथा ॥ सर्वरूपेण संस्थानात्सर्वमस्य वपुस्तथा ॥६८॥ तंतोः संकोचविस्तारचलनादौ पटस्तथा ॥ अवश्यमेव भवति न स्वातंत्र्यं पटे मनाक् ॥ ६९ ॥ तथांतर्याम्ययं यत्र यया वासनया यथा ॥ विक्रियेत तथाऽवश्यं भवत्येव न संशयः ॥ १७० ॥ ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥ भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ७१ ॥ सर्वभूतानि विज्ञानमयास्ते हृदये स्थिताः ॥ तदुपादानभूतेशस्तत्र विक्रियते खलु ॥ ७२ ॥ देहादिपंजरं यंत्रं तदारोहोऽभिमानिता ॥ विहितप्रतिषिद्धेषु प्रवृत्तिर्भ्रमणं भवेत् ॥ ७३ ॥ विज्ञानमयरूपेण तत्प्रवृत्तिस्वरूपतः ॥ स्वशक्त्येशो विक्रियते मायया भ्रमणं हि तत् ॥ ७४ ॥ अंतर्यमयतीत्युक्त्याऽयमेवार्थः श्रुतौ श्रुतः ॥ पृथिव्यादिषु सर्वत्र न्यायोऽयं योज्यताम् धिया ॥ ७५ ॥ जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिर्जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ॥ केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ॥ ७६ ॥ नार्थः पुरुषका-

सतां ब्रह्म असंग आहे आणि सृष्टिकर्ता ईश्वर आहे असें समजलें. ॥ १९५ ॥ " सत्यं ज्ञानमनंतं " या श्रुतीनें ( उपक्रम ) करून " यतो वाचो निवर्तंते " या श्रुतीनें उपसंहार ( समाप्ति ) करून ब्रह्माच्या असंगत्वाविषयीं शास्त्रांत निर्णय केला आहे. ॥ १९६ ॥ मायावी ईश्वर जग उत्पन्न करितो आणि त्या जगांत जीव मायेनें बद्ध झाला आहे अशी दुसरी एक श्रुति आहे. त्यावरून ईश्वर जगाचा उत्पन्नकर्ता, असें होतें. ॥ १९७ ॥ आनंदमय जो ईश तोच " बहुस्यां " असा संकल्प करून निद्रा जशी स्वप्न होते त्याप्रमाणें हिरण्यगर्भ झाला. ॥ १९८ ॥ ही सृष्टि दोन प्रकारची घ्यावी. एक क्रमसृष्टि आणि दुसरी युगपत्सृष्टि. कारण, त्याला दोन प्रकारच्या श्रुतीही प्रमाण आहेत. आणि ज्या स्वप्नाचा आह्मीं दृष्टांत दिला, तें स्वप्नही दोन प्रकारचें अनुभवास येतें. ॥ १९९ ॥ सूक्ष्म देहाख्य जो सूत्रात्मा तो सर्व जीवांचें समष्टिरूप आहे. कारण, आह्मी जसे एकेका देहाविषयीं अभिमानी आहोंत, त्याप्रमाणें तो सर्व जगाचा अभिमानी आहे. आणि क्रियाज्ञान आदिकरून शक्ति त्याच्यामध्यें आहेत. ॥ २०० ॥ पहांटेस अथवा सायंकाळीं मंद अंधकारांत जग जसें अस्पष्ट भासतें तसेंच हिरण्यगर्भावस्थेमध्यें भासतें. ॥ १ ॥ ज्याप्रमाणें खळ दिलेला पट मषीनें आंखलेला सर्वत्र असतो, त्याप्रमाणें ईश्वराचें शरीर या अवस्थेमध्यें सूक्ष्म आकारांनीं लांछित झालेलें असतें.॥२॥ अथवा ज्याप्रमाणें धान्य अथवा भाजीपाला यांचे कोंवळे अंकुर भूमीवर उगवतात, त्याप्रमाणें या अवस्थेंत जगाचा अंकुर फार कोंवळा असतो. ॥ ३ ॥ आतां हिरण्यगर्भ अवस्थेला वर जे तीन दृष्टांत दिले त्यांच्याच क्रमेंकरून स्पष्ट दशा पाहिल्या असतां विराट्–स्वरूप चांगलें ध्यानांत येईल. ह्मणजे मदांधकार जाऊन ऊन पडलें असतां जग जसें स्पष्ट भासतें, पट रंगविला असतां चित्रें जशीं स्पष्ट भासतात, अथवा शेतें पक्क झालीं असतां धान्यफळें जशीं स्पष्ट

---

जत्येष महेश्वरः ॥ ९५ ॥ सत्यं ज्ञानमनंतं चेत्युपक्रम्योपसंहृतम् ॥ यतो वाचो निवर्तन्त इत्यसंगत्वनिर्णयः ॥ ९६ ॥ मायी सृजति विश्वं सन्निरुद्धस्तत्र मायया ॥ अन्य इत्यपराब्रूते श्रुतिस्तेनेश्वरः सृजेत् ॥ ९७ ॥ आनंदमय ईशोऽयं बहुस्यामित्यवैक्षत ॥ हिरण्यगर्भरूपोऽभूत्सुप्तिः स्वप्नो यथा भवेत् ॥ ९८ ॥ क्रमेण युगपद्वैषा सृष्टिर्ज्ञेया यथाश्रुति ॥ द्विविधश्रुतिसद्भावात् द्विविधस्वप्नदर्शनात् ॥ ९९ ॥ सूत्रात्मा सूक्ष्मदेहाख्यः सर्वजीवघनात्मकः ॥ सर्वाहंमानधारित्वात् क्रियाज्ञानादिशक्तिमान् ॥ २०० ॥ प्रत्यूषे वा प्रदोषे वा मग्नो मंदे तमस्ययं ॥ लोको भाति यथा तद्वदस्पष्टं जगदीक्ष्यते ॥ १ ॥ सर्वतो लांछितो मष्या यथा स्याद्घट्टितः पटः ॥ सूक्ष्माकारैस्तथेशस्य वपुः सर्वत्र लांछितं ॥ २ ॥ सस्यं वा शाकजातं वा सर्वतोऽङ्कुरितं यथा ॥ कोमलं तद्वदेवैष पेलवो जगदंकुरः ॥ ३ ॥ आतपाभातलोको वा पटो वा वर्ण-

भासतात; त्याप्रमाणें हिरण्यगर्भ विराट्-रूपानें स्पष्ट भासूं लागतो. ॥४॥ विश्वरूपाध्यायामध्यें आणि पुरुषसूक्तांतही ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत या विराटाचे सर्व अवयव आहेत असें म्हटलें आहे. ॥ ५ ॥ ईश, सूत्र, विराट्, ब्रह्मदेव, विष्णु, रुद्र, इंद्र, अग्नि, विघ्नेश, भैरव, मैराल, मारिका, यक्ष व राक्षस. ॥ ६ ॥ विप्र, क्षत्रिय, विट्, शूद्र, गाय, घोडा, मृग, पक्षी, अश्वत्थ, वट, आम्रवृक्षादि, यवादि, धान्यतृणादि. ॥ ७ ॥ जल, पाषाण, माति, काष्ठ, वास्याकुद्दालकादिपर्यंत ईश्वर मानून पूजिले असतां फलदायी होतात. ॥ ८ ॥ जशी जशी उपासना करावी तसें तसें फळ मिळतें. कमजास्त फळ मिळणें हें पूज्य देवता आणि पूजेचा प्रकार यांवर अवलंबून आहे. ॥ ९ ॥ परंतु मुक्ति ही ब्रह्मतत्त्वाच्या ज्ञानावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें मिळणार नाहीं. पहा, स्वप्न जर नाहींसें करावयाचें आहे, तर जागेंच झालें पाहिजे; त्यावांचून दुसरा उपाय नाहीं. ॥ २१० ॥ एथें स्वप्नाचा दृष्टांतही योग्य आहे. कारण, अद्वितीय ब्रह्मतत्त्वाचेठायीं ईशजीवादिरूपानें असणारें सर्व चराचर जग स्वप्नाप्रमाणेंच आहे. ॥ ११ ॥ आनंदमय ईश्वर आणि विज्ञानमय जीव हे आदिमायेनें कल्पिले आणि त्या उभयतांनीं बाकी जगाची कल्पना केली. आतां मायेनें कल्पिलें तेंही जगच आहे; तेव्हां जीव आणि ईश हे जगापैकींच झाले. ॥ १२ ॥ इच्छादिकरून प्रवेशापर्यंत जी सृष्टि आहे ती ईश्वरानें केलेली, आणि जागृतीपासून मोक्षापर्यंत जी सृष्टि ती जीवानें केलेली आहे. ॥ १३ ॥ असंग, अद्वितीय जें ब्रह्मतत्त्व, तें न जाणतां मायीक जे

---

पूरितः ॥ सस्यं वा फलितं यद्वत्तथा स्पष्टवपुर्विराट् ॥ ४ ॥ विश्वरूपाध्याय एष उक्तः सूक्तेऽपि पौरुषे ॥ धात्रादिस्तंबपर्यंतानेतस्यावयवान्विदुः ॥ ५ ॥ ईशसूत्रविराड्वेधोविष्णुरुद्रेंद्रवन्हयः ॥ विघ्नभैरवमैरालमारिका यक्षराक्षसाः ॥ ६ ॥ विप्रक्षत्रियविट्शूद्रा गवाश्वमृगपक्षिणः। अश्वत्थवटचूताद्या यवव्रीहितृणादयः ॥ ॥ ७ ॥ जलपाषाणमृत्काष्ठवास्याकुद्दालकादयः ॥ ईश्वराः सर्व एवैते पूजिताः फलदायिनः ॥ ८ ॥ यथा यथोपासते तं फलमीयुस्तथा तथा ॥ फलोत्कर्षापकर्षौ तु पूज्यपूजानुसारतः ॥ ९ ॥ मुक्तिस्तु ब्रह्मतत्त्वस्य ज्ञानादेव न चान्यथा ॥ स्वप्रबोधं विनानैव स्वस्वप्नो हीयते यथा ॥ २१० ॥ अद्वितीयब्रह्मतत्त्वे स्वप्नोऽयमखिलं जगत् ॥ ईशजीवादिरूपेण चेतनाचेतनात्मकम् ॥ ११ ॥ आनंदमयविज्ञानमयावीश्वरजीवकौ ॥ मायया कल्पितावेतौ ताभ्यां सर्वं प्रकल्पितम् ॥ १२ ॥ ईक्षणादिप्रवेशान्ता सृष्टिरीशेन कल्पिता ॥ जाग्रदादिविमोक्षांतः संसारो जीवकल्पितः ॥ १३ ॥ अद्वितीयं ब्रह्मतत्त्वमसंगं तन्न जानते ॥ जीवेशयोर्मायिकयोर्वृथैव

जीव आणि ईश यांविषयीं लोक व्यर्थ कलह करितात. ॥ १४ ॥ आतां यांना बोध करून मार्गास लावावें असें कोणी ह्मणेल, तर आमची रीति अशी आहे. तत्त्वनिष्ठांना पाहून आह्मी मान डोलवितों. अज्ञान्यांना पाहून आम्हांस वाईट वाटतें, आणि भ्रमिष्टांशीं आह्मी वादच करीत नाहीं. ॥ १५ ॥ तृणार्चकापासून योगवाद्यापर्यंत सारे ईश्वराविषयीं भ्रांतींत पडले आहेत, आणि लोकायत म्हणजे देहात्मवाद्यांपासून सांख्यवाद्यांपर्यंत सगळे जीवाविषयीं भ्रांतींत पडले आहेत. ॥ १६ ॥ हे भ्रांत कसे जर ह्मणाल तर जोंपर्यंत अद्वितीय ब्रह्मतत्त्व समजलें नाहीं, तोंपर्यंत सर्व भ्रमांतच आहेत असें म्हटलें पाहिजे. अशा लोकांस मुक्तीही नाहीं आणि ऐहिक सुखही नाहीं. ॥ १७ ॥ कोणी म्हणेल कीं, त्यांस ब्रह्मज्ञान जरी कदाचित् नसलें, तरी इतर विद्येच्यासंबंधानें लहानमोठेपणा आहे, आणि त्याप्रमाणें त्यांना सुखाची प्राप्तीही आहे; तर तसें सुख असून नसून सारखेंच, त्याचा आम्हास काय उपयोग? स्वप्नांत राज्यप्राप्ति आणि भिक्षा मागणें या दोन्ही गोष्टींचा संपर्क जागृताला मुळींच नाहीं. ॥ १८ ॥ म्हणून मुमुक्षूंनीं जीव आणि ईश याविषयींचा वाद सोडून देऊन ब्रह्मतत्त्वाचा विचार करावा, आणि तें नीट समजून घ्यावें. ॥ १९ ॥ ब्रह्मतत्त्वाचा निश्चय करण्याकरितां तरी या दोन्ही वादांची आवश्यकता आहे कीं नाहीं असा जर कोणी प्रश्न करील, तर त्यास असें सांगतों कीं गरजेपुरता त्याचा उपयोग करून स्वीकार करावा. अविचारानें त्यांतच गढून बसूं नये. ॥२२०॥ असंग चिद्रूप आणि विभु असा सांख्यांनीं वर्णिलेला जीव आणि तसाच योगांत सांगितलेला ईश्वर हे दोन्हीही " तत् " आणि " त्वं " या दोन पदांचे जे तुम्हीं अर्थ केले आहेत त्यापासून भिन्न नाहींत. मग त्यांस पूर्व पक्ष तरी कां म्हणावें असें जर कोणाचें म्हणणें असेल तर त्यावर आमचें असें उत्तर आहे कीं, ॥ २१ ॥ त्यांनीं केलेले अर्थ आमच्या सिद्धांतापासून भिन्न आहेत. आतां आम्हीं जे " तत् " आणि " त्वं " पदांचे अर्थ केले

---

कलहं ययुः॥ १४ ॥ ज्ञात्वा सदा तत्त्वनिष्ठान् नु मोदामहे वयम् ॥ अनुशोचाम एवान्यान्न भ्रांतैर्विवदामहे ॥ १५ ॥ तृणार्चकादियोगांता ईश्वरे भ्रांतिमाश्रिताः ॥ लोकायतादिसांख्यांता जीवे विभ्रांतिमाश्रिताः ॥ १६ ॥ अद्वितीयब्रह्मतत्त्वं न जानंति यदा तदा ॥ भ्रांता एवाखिलास्तेषां क मुक्तिः केह वा सुखम् ॥ १७ ॥ उत्तमाधमभावश्चेत्तेषां स्यादस्तु तेन किम् ॥ स्वप्नस्थराज्यभिक्षाभ्यां न बुद्धः स्पृश्यते खलु ॥ १८ ॥ तस्मान्मुमुक्षुभिर्नैव मतिर्जीवेशवादयोः ॥ कार्या किंतु ब्रह्मतत्त्वं विचार्य बुध्यतां च तत् ॥ १९ ॥ पूर्वपक्षतया तौ चेत्तत्त्वनिश्चयहेतुताम् ॥ प्राप्नुतोऽस्तु निमज्जस्व तयोर्नैतावतार्ऽथशः ॥ २२० ॥ असंगचिद्विभुर्जीवः सांख्योक्तस्तादृगीश्वरः ॥ योगोक्तस्तत्त्वमोरर्थौ शुद्धौ ताविति चेच्छृणु ॥ २१ ॥ न तत्त्वमोरुभावर्थावस्मत्सि-

आहेत ते केवळ अद्वैताचा बोध व्हावा म्हणून. ॥ २२ ॥ अनादि मायेनें मोहित होऊन जीव आणि ईश हे निराळे आहेत असें लोक समजतात, ती समजूत काढून टाकण्याकरितां आम्हीं त्या दोन पदार्थांचें शोधन केलें आहे. ॥ २३ ॥ याकरितांच पूर्वी सांगितलेला, घटाकाश, महाकाश, जलाकाश व अभ्राकाश या चोहोंचा दृष्टांत येथें चांगला जुळतो ॥ २४ ॥ यांत जलाकाश आणि अभ्राकाश हीं दोन्ही जल आणि अभ्र या उपाधींवर अवलंबून आहेत. या उभय आकाशांना आधारभूत घटाकाश आणि महाकाश हीं अत्यंत निर्मल आहेत. ॥२५॥ त्याचप्रमाणें आनंदमय ईश आणि विज्ञानमय जीव हे उभयतां क्रमेंकरून माया आणि बुद्धि यांवर अवलंबून आहेत. आणि त्या दोहोंस अधिष्ठानभूत कूटस्थ आणि ब्रह्म हे अत्यंत निर्मल आहेत. २६ एवढा तुम्हीं उपयोग करून घेतला म्हणून तरी सांख्य व योग हे तुम्हाला मान्य आहेत कीं नाहींत असें जर कोणी पुसेल, तर आम्ही म्हणतों कीं, सांख्य व योगच कां? आम्हीं अन्नमय कोशाचें वर्णन केल्यानें देहात्मत्वसुद्धां स्वीकारलें असें होईल ॥ २७ ॥ आत्मे निरनिराळे आहेत. जग सत्य आहे, आणि ईश्वर निराळा आहे. ह्या तीन गोष्टी जर वगळल्या, तर सांख्य, योग आणि वेदान्त ह्या तिहींची संमति होते. ॥ २८ ॥ असंगत्वमात्रेंकरून जीव कृतार्थ आहे असें जर ह्मणाल, स्रक्चंदनादि जे विषय आहेत त्यांच्या नित्यत्वेंकरूनही तो कृतार्थ होईल. ॥ २९ ॥ परंतु स्रगादि विषयांचें नित्यत्व सिद्ध होणें अशक्य आहे, तसें जग आणि ईश हे प्रत्यक्ष असतांना जीवाचें असंगत्वही असंभाव्य आहे. ॥ २३० ॥ जरी सांख्य ज्ञानानें तात्कालिक असंगता वाटली, तरी प्रकृतीच्या योगानें जीवास पुनः संग लागणारच. आणि

---

ह्यांततां गतौ ॥ अद्वैतबोधनायैव सा कक्षा काचिदिष्यते ॥२२॥ अनादिमायया भ्रांता जीवेशौ सुविलक्षणौ ॥ मन्यंते तद्व्युदासाय केवलं शोधनं तयोः ॥२३॥ अत एवात्र दृष्टांतो योग्यः प्राक्सम्यगीरितः ॥ घटाकाशमहाकाशजलाकाशाभ्रखात्मकः ॥ २४ ॥ जलाभ्रोपाध्यधीने ते जलाकाशाभ्रखे तयोः ॥ आधारौ तु घटाकाशमहाकाशौ सुनिर्मलौ ॥ २५ ॥ एवमानंदविज्ञानमयौ मायाधियोर्वशौ ॥ तदधिष्ठानकूटस्थब्रह्मणी तु सुनिर्मले ॥ २६ ॥ एतत्कक्षोपयोगेन सांख्ययोगौ मतौ यदि ॥ देहोऽन्नमयकक्षत्वादात्मत्वेनाभ्युपेयताम् ॥ २७ ॥ आत्मभेदो जगत्सत्यमीशोऽन्य इति चेत्त्रयम् ॥ त्यज्यते तैस्तदा सांख्ययोगवेदांतसंमतिः ॥२८॥ जीवोऽसंगत्वमात्रेण कृतार्थ इति चेत्तदा ॥ स्रक्चंदनादिनित्यत्वमात्रेणापि कृतार्थता ॥ २९ ॥ यथा स्रगादिनित्यत्वं दुःसंपाद्यं तथाऽऽत्मनः ॥ असंगत्वं न संभाव्यं जीवतोर्जगदीशयोः॥२३०॥ अवश्यं प्रकृतिः संगं पुरेवापादयेत्तथा ॥ नियच्छत्येतमीशोऽपि

पुनः त्याचें ईश्वर तर नियमन करितो; मग त्यास मोक्ष कोठून मिळणार? ॥ ३१ ॥ जीवाचा संग आणि ईश्वराचें नियमन या दोहोंस कारण अविवेक आहे असें जर सांख्यवादी ह्मणेल, तर त्या कुबुद्धि सांख्याच्या मतांत बळेंच मायावाद आला. ॥ ३२ ॥ आतां कोणी ह्मणेल कीं, आत्मे जे निरनिराळे मानले ते केवळ बंधमोक्षाची व्यवस्था करण्याकरितां. तर त्यावर आमचें असें ह्मणणें कीं, ती व्यवस्था करण्यास सांख्यशास्त्र कशाला पाहिजे? एक आत्मा जरी मानला तरी ती व्यवस्था करण्यास माया समर्थ आहे. ॥ ३३ ॥ दुर्घटाचीच मी घटना करतें असें विरुद्ध वाक्य तुह्मी पहात नाहीं काय? एथें मोक्ष मायिक नव्हे असें समजूं नये. बंधाप्रमाणेंच मोक्षालाही सत्यता देणें हें श्रुतीस अगदीं सहन होत नाहीं. ॥३४॥ नाश नाहीं, उत्पत्ति नाहीं, बद्ध नाहीं, साधक नाहीं, मुमुक्षु नाहीं आणि मुक्तही नाहीं हाच परमार्थ. ॥३५॥ मायानामक कामधेनूचे जीव आणि ईश हे दोन वत्स आहेत. तिचें द्वैतरूप दुग्ध ते यथेच्छ प्राशन करोत बापडे. पण खरें तत्त्व जर ह्मणाल तर अद्वैतच आहे. ॥ ३६ ॥ कूटस्थ आणि ब्रह्म यांमधील भेद केवळ नांवाचा आहे, वस्तुतः भेदच नाहीं. जसें घटाकाश आणि महाकाश यांचा वियोग कधींच झालेला नाहीं, त्याप्रमाणें त्या दोहोंमध्यें वियोगच नाहीं. ॥ ३७ ॥ सृष्टीच्या पूर्वीं जें अद्वैत होतें म्हणून श्रुतींत सांगितलें आहे तेंच आज आहे, आणि यानंतरही तेंच असणार; आणि तेंच मुक्तीनंतरही असणार. मायेनें सर्व लोकांस व्यर्थ भ्रमांत पाडलें आहे. ॥ ३८ ॥ प्रपंच खोटा आणि अद्वैत खरें असे जे बोलतात ते देखील संसार करितात, मग तुमचें ब्रह्मज्ञान घेऊन करावयाचें काय अशी शंका कोणीं घेण्याचें कारण नाहीं. कारण, जरी त्यांणीं पूर्व कर्माच्या ओघानें संसार केला तरी त्यांस पूर्वीप्रमाणें भ्रांति नसते. ॥ ३९ ॥ ऐहिक आणि पारलौकिक संसार खरा आहे, आणि अद्वैत भासत नाहीं

---

कोऽस्य मोक्षस्तथा सति ॥ ३१ ॥ अविवेककृतः संगो नियमश्चेति चेत्तदा ॥ बलादापतितो मायावादः सांख्यस्य दुर्मतेः॥३२॥ बंधमोक्षव्यवस्थार्थमात्मनानात्वमिष्यताम् ॥ इति चेन्न यतो माया व्यवस्थापयितुं क्षमा ॥ ३३ ॥ दुर्घटं घटयामीति विरुद्धं किन्न पश्यसि ॥ वास्तवौ बंधमोक्षौ तु श्रुतिर्न सहतेतराम् ॥ ३४ ॥ न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो नच साधकः ॥ न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥ ३५ ॥ मायाख्यायाः कामधेनोर्वत्सौ जीवेश्वरावुभौ ॥ यथेच्छं पिबतां द्वैतं तत्त्वं त्वद्वैतमेवहि ॥३६॥ कूटस्थब्रह्मणोर्भेदो नाममात्राद‍ृते न हि ॥ घटाकाशमहाकाशौ वियुज्येते न हि क्वचित् ॥ ३७ ॥ यदद्वैतं श्रुतं सृष्टेः प्राक्तदेवाद्य चोपरि ॥ मुक्तावपि वृथा माया भ्रामयत्यखिलान् जनान् ॥ ३८ ॥ ये वदंतीत्थमेतेऽपिभ्राम्यंतेऽविद्ययाऽत्र किम् ॥ न यथा पूर्वमेतेषामत्र भ्रांतेरदर्शनात् ॥ ३९ ॥ ऐहिकामुष्मिकः सर्वः

तर्केंच नव्हे तर तें मुळींच नाहीं असा अज्ञानी लोकांचा निश्चय असतो. ॥ २४० ॥ हा जो अज्ञानी लोकांचा निश्चय सांगितला, त्याच्या उलट ज्ञान्यांचा निश्चय स्पष्ट दिसून येतो. ज्ञानी आणि अज्ञानी हे दोघेही आपापल्या निश्चयांप्रमाणें मी मुक्त आणि मी बद्ध असें मानतात. ॥ ४१ ॥ अद्वैत युक्तीनेंच सिद्ध होतें. अनुभवास तें येत नाहीं, मग निश्चय कसा करावा असें जर कोणी म्हणेल तर तशी शंका घेणें नलगे. कारण, घटादिक जे आम्हांस भासतात त्यांत ज्ञानरूपानें तें प्रत्यक्ष अनुभवास येतें; परंतु तें समग्र भासत नाहीं, असें जर कोणी म्हणेल तर आम्ही त्यास पुसतों कीं, तुमची द्वैतसृष्टि तरी समग्र भासते काय? समग्र न भासण्याचे संबंधानें द्वैत आणि अद्वैत हीं दोन्ही सारखींच आहेत. ॥ ४२ ॥ दिङ्मात्रेंकरून जसें तुमचें द्वैत भासतें, तसें आमचें अद्वैतही भासतें. ही गोष्ट दोहींलाही साधारणच आहे. परंतु तेवढ्यानें जर तुमची द्वैतसिद्धि होते, तर मग आमची अद्वैतसिद्धि ही कां न व्हावी? ॥ ४३ ॥ या श्लोकांत पूर्वपक्षी अद्वैतसिद्धि होत नाहीं अशी शंका अन्य प्रकारानें करितो कीं, अद्वैत ह्मणजे द्वैतरहित; म्हणून द्वैत आणि अद्वैत हीं परस्पर अत्यंत विरुद्ध आहेत; आणि हें जर सत्य आहे, तर सांप्रत द्वैतप्रतीति असतां अद्वैत कसें संभवेल? संभवणारच नाहीं. आतां, हे सिद्धांती जर तूं असें ह्मणशील कीं, अद्वैत हें द्वैतविरोधी आहे, तर मग अद्वैतप्रतीतिकालीं द्वैतही असिद्ध आहे असा तुझा समान प्रश्न मला होणारच; यावर मी (पूर्वपक्षी) असें सांगतों कीं, हे सिद्धांती, तुझ्या मनांत चिद्रूपप्रतीति ह्मणजेच अद्वैतप्रतीति आहे, आणि ती चिद्रूपप्रतीति तर ह्या प्रत्यक्ष द्वैताच्या विरोधी नाहीं; याकरितां उभयसाम्य नाहीं. या बोलण्यांत पूर्वपक्ष्याचा इतकाच अभिप्राय कीं, चिद्रूप जें अद्वैत, त्याच्या प्रतीतिकालीं द्वैतभान संभवतें. ॥ ४४ ॥ याचें समाधान हेंच कीं, द्वैत मायाकल्पित असल्यामुळें तें मुळींच खोटें आहे; म्हणून खरें उरलें जें अद्वैत तेंच भासतें असें म्हणावयाचें. ॥ ४५ ॥ ज्याच्या रचनेची कल्पनाच करितां येत नाहीं असें जें जग तें मायाक-

---

संसारो वास्तवस्ततः ॥ न भाति नास्ति चाद्वैतमित्यज्ञानिविनिश्चयः ॥ २४० ॥ ज्ञानिनो विपरीतोऽस्मान्निश्चयः सम्यगीक्ष्यते ॥ स्वस्वनिश्चयतो बद्धो मुक्तोऽहं चेति मन्यते ॥ ४१ ॥ नाद्वैतमपरोक्षं चेन्न चिद्रूपेण भासनात् ॥ अशेषेण न भातं चेद् द्वैतं किं भासतेऽखिलम् ॥ ४२ ॥ दिङ्मात्रेण विभानं तु द्वयोरपि समं खलु ॥ द्वैतसिद्धिवदद्वैतसिद्धिस्ते तावता न किम् ॥ ४३ ॥ द्वैतेन हीनमद्वैतं द्वैतज्ञाने कथं त्विदम् ॥ चिद्भानं त्वविरोध्यस्य द्वैतस्यातोऽसमेउभे ॥ ४४ ॥ एवं तर्हि शृणु द्वैतमसन्मायामयत्वतः ॥ तेन वास्तवमद्वैतं परिशेषाद्विभासते ॥ ४५ ॥ अचिंत्यरचनारूपं मायैव सकलं जगत् ॥ इति निश्चित्य वस्तु-

ल्पित आहे म्हणून तें मिथ्या असा निश्चय करून उर्वरीत जें अद्वैत तेंच खरें असें समजावें. ॥ ४६ ॥ सिद्धांतानें जगन्मिथ्यात्व जरी भासलें, तरी तें पुनः पुनः खरेंच भासतें असें जर कोणी म्हणेल, तर पुनः त्याचाच निदिध्यास करावा यांत श्रम तो काय? ॥४७॥ अशीच किती दिवस याची घोंटणी करावी अशी जर कोणास चिंता असेल तर तीच चिंता द्वैताविषयीं "देवा, हें द्वैत किती दिवस मला भासणार" अशी चिंता करावी. अद्वैताविषयीं चिंता नको. कारण, त्यानें सर्व खेदाचें निवारण होतें.॥४८॥इतकें मला ज्ञान होऊन क्षुधातृषादि प्राणधर्म मला पूर्वीप्रमाणेंच भासतात, असें जर कोणी म्हणेल, तर आम्ही नाहीं कोठें म्हणतों? जरी ते भासले, तरी मी म्हणणारा जो अहंकार त्याचेठायीं ते भासतात, तर भासेनात बापडे. ॥ ४९ ॥ आत्म्यालाही तादात्म्याध्यासामुळें त्यांचा संपर्क लागेल अशी जर भीति वाटत असेल, तर तशी वाटण्याचें कारण नाहीं. कारण, तसा अध्यास न होऊं देतां विवेकच केला ह्मणजे झालें.॥२५०॥ आतां फार दिवसांची दृढवासना असल्यामुळें विवेक केला तरी पुनः पुनः अध्यास होतो हें खरें आहे. पण त्याजवर विवेकावांचून दुसरा उपाय नाहीं. विवेकाचें पुनः पुनः आवर्तन करून तेंच दृढ करावें. ॥ ५१ ॥ विवेकानें जें जगाचें मिथ्यात्व ठरतें तें केवळ युक्तिसिद्ध होय. प्रत्यक्ष अनुभवास येत नाहीं. ही शंका योग्य नाहीं. कारण, जगाची अचिंत्य रचना प्रत्यक्ष अनुभवास येते; तेव्हां त्याचें मिथ्यात्व ज्ञान प्रत्यक्षच म्हटलें पाहिजे. ॥ ५२ ॥ तुमच्या चैतन्याची रचनाही अचिंत्यच आहे असें म्हणाल, तर आम्ही नाहीं कोठें म्हणतों ? द्वैत व अद्वैत हीं दोनीही अचिंत्यच आहेत; परंतु हेतु मात्र निराळे. एकाला अनित्यत्व कारण, आणि दुसऱ्याला नित्यत्व कारण. अनित्य ह्मणजे पदार्थाचा प्रागभाव ज्यास आहे तें. ॥ ५३ ॥ तुमच्या चैतन्याला तरी नित्यत्व कोठें आहे असें जर कोणी म्हणेल तर आमचें उत्तर असें कीं, ज्या पदार्थाला प्रागभाव आहे तो अनित्य. चैतन्याचा प्रागभाव कोणाच्याच अनुभवास येत

---

त्वमद्वैते परिशेष्यताम् ॥ ४६ ॥ पुनर्द्वैतस्य वस्तुत्वं भाति चेत्त्वं तथा पुनः ॥ परिशीलय को वाऽत्र प्रयासस्तेन ते वद ॥ ४७ ॥ कियंतं कालमिति चेत् खेदोऽयं द्वैत इष्यतां ॥ अद्वैते तु न युक्तोऽयं सर्वानर्थनिवारणात् ॥ ४८ ॥ क्षुत्पिपासादयो दृष्टा यथापूर्वं मयीति चेत् ॥ मच्छब्दवाच्येऽहंकारे दृश्यतां नेति को वदेत् ॥ ४९ ॥ चिद्रूपेऽपि प्रसज्येरंस्तादात्म्याध्यासतो यदि॥ माऽध्यासं कुरु किंतु त्वं विवेकं कुरु सर्वदा ॥ २५० ॥ झटित्यध्यास आयाति दृढवासनयेति चेत् ॥ आवर्तयेद्विवेकं च दृढं वासयितुं सदा ॥ ५१ ॥ विवेके द्वैतमिथ्यात्वं युक्त्यैवेति न भण्यताम् ॥ अचिंत्यरचनात्वस्यानुभूतिर्हि स्वसाक्षिकी ॥ ५२ ॥ चिदप्यचिंत्यरचना यदि तर्ह्यस्तु नो वयम् ॥ चितिं सुचिंत्य रचनां ब्रूमो नित्यत्वकारणात् ॥ ५३ ॥ प्रागभावो नानुभूतश्चिते-

नाहीं. परंतु द्वैतसृष्टीचा अभाव निद्रेमध्यें साक्षी चैतन्याचे अनुभवास येतो. ॥ ५४ ॥ म्हणून घटादिकांप्रमाणें सकल द्वैत प्रागभावानें युक्त असून त्याची रचनाही पुनः अचिंत्य आहे; म्हणून इंद्रजालाप्रमाणें तें मिथ्या आहे हें सिद्ध. ॥ ५५ ॥ याप्रमाणें चैतन्य प्रत्यक्ष अनुभवास येतें व द्वैताचें मिथ्यात्वही तसेंच अनुभवसिद्ध आहे. असें असून अद्वैत प्रत्यक्ष नाहीं ह्मणणें.हा विरोध नव्हे काय ? ॥ ५६ ॥ इतकें समजूनही कित्येक लोक असंतुष्ट कां दिसतात, असा जर कोणी प्रश्न करीत असेल तर त्याजवर आम्ही असा प्रश्न करितों कीं, चार्वाकादिक पंडित इतके विद्वान ते देहाला आत्मा कां मानतात ? ॥ ५७ ॥ चार्वाकादिकांना काम-क्रोधादि बुद्धिदोषांमुळें चांगला विचार होत नाहीं असें जर ह्मणाल, तर आमचेंही तसेंच उत्तर आहे. जे लोक असंतुष्ट दिसतात असें तुह्मी ह्मणतां ते केवळ शास्त्राचा चांगला विचार न केल्यामुळें तसे दिसतात. ॥ ५८ ॥ तर मग " यदा सर्वे प्रमुच्यंते कामायेऽस्य हृदि श्रिताः" ( जेव्हां हृदयांतील सर्व काम नष्ट होतात ) हें श्रुतीचें फळ कोठें अनुभवास येत नाहीं, असें कोणीं ह्मणूं नये. सर्व श्रुतींची एकवाक्यता करून विचार केला असतां तें फल सिद्ध होतें. ॥ ५९ ॥ " ज्या काळीं सर्व हृदयग्रंथि सुटतात " असें दुसरें एके ठिकाणीं वाक्य आहे, तेथें हृदयग्रंथिरूपानें कामाची व्याख्या केली आहे. ॥ २६० ॥ अहंकार आणि चिदात्मा या दोहोंचें एकीकरण करून अविवेकानें हें मला असावें, हें मला असावें अशा ज्या इच्छा होतात त्यांसच काम असें ह्मणतात. ॥ ६१ ॥ अहंकाराचा संग चिदात्म्याला न लावतां अहंकारास पृथक् पाहिलें असतां कोटी वस्तूंची जरी इच्छा झाली तरी ग्रंथिभेद झाल्यामुळें त्या बाधक

---

र्नित्या ततश्चितिः ॥ द्वैतस्य प्रागभावस्तु चैतन्येनानुभूयते॥ ५४॥ प्रागभावयुतं द्वैतं रच्यते हि घटादिवत् ॥ तथापि रचनाऽचिंत्या मिथ्या तेनेंद्रजालवत् ॥ ५५ ॥ चित्प्रत्यक्षा ततोऽन्यस्य मिथ्यात्वं चानुभूयते ॥ नाद्वैतमपरोक्षं चेत्येतन्न व्याहतं कथम् ॥५६॥ इत्थं ज्ञात्वाऽप्यसंतुष्टाः केचित्कुतः इतीर्यतां ॥ चार्वाकादेः प्रबुद्धस्याप्यात्मा देहः कुतो वद ॥ ५७ ॥ सम्यग्विचारो नास्त्यस्य धीदोषादिति चेत्तथा ॥ असंतुष्टास्तु शास्त्रार्थं न त्वैक्षन्त विशेषतः ॥ ५८ ॥ यदा सर्वे प्रमुच्यंते कामा येऽस्य हृदि श्रिताः ॥ इति श्रौतं फलं दृष्टं नेति चेद्दृष्टमेव तत् ॥ ५९ ॥ यदा सर्वे प्रभिद्यंते हृदयग्रंथयस्त्विति ॥ कामा ग्रंथिस्वरूपेण व्याख्याता वाक्यशेषतः ॥ २६० ॥ अहंकारचिदात्मानावेकीकृत्याविवेकतः ॥ इदं मे स्यादिदं मे स्यादितीच्छाः कामशब्दिताः ॥ ६१ ॥ अप्रवेश्य चिदात्मानं पृथक् पश्यन्नहंकृतिम् ॥ इच्छंस्तु कोटीवस्तूनि न बाधो ग्रंथि-

होत नाहींत. ॥ ६२ ॥ अध्यास गेल्यावर इच्छा मुळींच होऊं नयेत. परंतु त्या होतात त्यास कारण प्रारब्ध होय. याला उदाहरण दुसरें नको. तुह्मी आपणाकडे पहा म्हणजे झालें. इतकें जाणून बुजून तुमच्या पूर्व जन्मींच्या पातकामुळें तुमची खात्री होत नाहीं हेंच याला प्रमाण. ॥ ६३ ॥ वृक्षादिकांचा जन्मनाश झाला असतां त्यामुळें जसें मला कांहींच होत नाहीं, त्याप्रमाणें देहामध्यें असणारे रोगादिक व अहंकारामध्यें असणारे इच्छादिक यांहींकरून मी जो चिद्रूपात्मा, त्याला काय होणार आहे ? असा ज्ञान्याचा अनुभव असतो. ॥ ६४ ॥ ग्रंथिभेदाच्या पूर्वीं देखील अशीच माझी स्थिति होती असें जर कोणी म्हणेल तर हें मात्र विसरूं नये. कारण, अशा प्रकारच्या समजुतीलाच आम्ही ग्रंथिभेद म्हणतों. आणि तो तर तुझ्या ठायीं झालाच, म्हणून तूं कृतार्थ आहेस. ॥ ६५ ॥ हें मूढाला समजत नाहीं. म्हणून हें न समजणेंच ग्रंथि, दुसरा नाहीं. अज्ञानी आणि ज्ञानी यांमध्यें भेद म्हणून इतकाच कीं, पहिल्यामध्यें तो ग्रंथि असतो आणि दुसऱ्यामध्यें तो असत नाहीं. ॥ ६६ ॥ ज्याप्रमाणें व्रात्य आणि श्रोत्रिय या दोघांमध्यें भेद इतकाच कीं, एकाला वेदाध्ययन आहे आणि दुसऱ्याला नाहीं; परंतु एरव्हीं आहारविहारादिकांमध्यें दोघेही सारखेच; त्याप्रमाणें ज्ञानी आणि अज्ञानी यांची गोष्ट आहे. प्रवृत्ति असो किंवा निवृत्ति असो, उभयतांच्या देह, इंद्रिय, मन, बुद्धि इत्यादिकांमध्यें मुळींच अंतर नाहीं. ॥ ६७ ॥ ॥ ६८ ॥ प्राप्त झालेल्या दुःखाचा द्वेष न करणें आणि अप्राप्त वस्तूची इच्छा न करणें व उदासीनाप्रमाणें असणें हें जें स्थितप्रज्ञाचें लक्षण गीतेंत सांगितलें आहे त्यालाच ग्रंथिभेद म्हणतात. ॥ ६९ ॥ औदासीन्य हें विधिपर आहे असें म्हणतां येत नाहीं; कारण, तसें मानल्यास " वत् " हा शब्द व्यर्थ होईल. आतां कोणी म्हणेल ज्ञान झाल्यावर देहादिक कर्में करण्यास असमर्थच होतात, तर अशा लक्षणास ज्ञान म्हणण्यापेक्षां

---

भेदतः ॥ ६२ ॥ ग्रंथिभेदेऽपि संभाव्या इच्छाः प्रारब्धदोषतः ॥ बुद्ध्वाऽपि पापबाहुल्यादसंतोषो यथा तव ॥ ६३ ॥ अहंकारगतेच्छाद्यैर्देहव्याध्यादिभिस्तथा ॥ वृक्षादिजन्मनाशैर्वा चिद्रूपात्मनि किं भवेत् ॥ ६४ ॥ ग्रंथिभेदात्पुराऽप्येवमिति चेत्तन्न विस्मर ॥ अयमेव ग्रंथिभेदस्तव तेन कृती भवान् ॥ ६५ ॥ नैवं जानंति मूढाश्चेत्सोऽयं ग्रंथिर्न चापरः ॥ ग्रंथितद्भेदमात्रेण वैषम्यं मूढबुद्धयोः ॥६६॥ प्रवृत्तौ वा निवृत्तौ वा देहेंद्रियमनोधियाम् ॥ न किंचिदपि वैषम्यमस्त्यज्ञानिविबुद्धयोः ॥ ६७ ॥ व्रात्यश्रोत्रिययोर्वेदपाठापाठकृता भिदा ॥ नाहारादावस्ति भेदः सोऽयं न्यायोऽत्र योज्यताम् ॥ ६८ ॥ न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ उदासीनवदासीन इति ग्रंथिभिदोच्यते ॥ ६९ ॥ औदासीन्यं विधेयं चेद्वच्छब्दव्यर्थता तदा ॥ न शक्ता अस्य

रोगच म्हणावें हें बरें ॥ २७० ॥ तत्त्वबोध हा क्षयरोग आहे असें म्हणणारे जे बुद्धिमान त्यांच्या शहाणपणाची कमाल झाली. त्यांना असाध्य काय ? ॥ ७१ ॥ आतां कोणी म्हणेल कीं, भरतादिक साधुक्रिया न करितां केवळ जडाप्रमाणें रहात असत असें पुराणांत सांगितलेलें आढळतें. म्हणून अक्रिय असणें हेंच ज्ञान्याचें लक्षण. परंतु ही शंका घेणारास पुढील श्रुति अवगत असती तर अशी शंका त्याणें घेतलीच नसती. "जक्षन् क्रीडन् रतिं विंदन्" अशी श्रुति आहे तिचें तात्पर्य—ज्ञान्यानें आहारविहारादि क्रीडा जरी केल्या, तरी त्या बाधक होत नाहींत. ह्या श्रुतिप्रमाणापुढें पुराणोक्तीची मातब्बरी किती ? ॥ ७२ ॥ पुराणांत जें सांगितलें त्याचें तरी तात्पर्य असें कीं, भरतादिक साधु जे एकांतीं अक्रिय होऊन बसले ते केवळ लोकसंगाच्या भीतीस्तव. ते म्हणजे आहारादि अवश्य क्रिया टाकून काष्ठपाषाणाप्रमाणें उगीच बसले असें नाहीं. ॥ ७३ ॥ कारण, जगांत लोक-संसर्गानें फार दुःख होतें. निःसंग मनुष्यास सुख होतें. याकरितां सुखाची इच्छा करणारानें लोक-संसर्ग सोडून दिला पाहिजे. ॥७४॥ शास्त्राचें हृदय न जाणतां मूढ लोक पाहिजे तसें बहकतात. त्यांच्या मतांशीं आह्मांस काय करावयाचें आहे ? आमचा जो सिद्धांत तो आह्मी येथें सांगतों म्हणजे झालें:—॥ ७५ ॥ वैराग्य, ज्ञान आणि उपरति हीं तीनही परस्परांस साहाय्यभूत आहेत. तीं बहुतकरून एकत्र मिळून असतात; परंतु केव्हां केव्हां ह्यांचा वियोगही होतो. ॥ ७६ ॥ ह्यांपैकीं प्रत्येकाचे हेतु, स्वरूप आणि कार्यें निरनिराळीं आहेत. म्हणून शास्त्रार्थाचा चांगला विचार करून बुद्धींत त्यांचा संकर होऊं देऊं नये. ॥७७॥ विषयाविषयीं जी दोष-दृष्टि तीच वैराग्याला हेतु ह्मणजे कारण होय. त्याविषयीं जी त्यागबुद्धि तें त्याचें स्वरूप, आणि पुनः त्याच्या भोगाविषयीं जी

---

देहाद्या इति चेद्रोग एव सः ॥ २७० ॥ तत्त्वबोधं क्षयं व्याधिं मन्यंते ये महाधियः ॥ तेषां प्रज्ञाऽतिविशदा किं तेषां दुःशकं वद ॥ ७१ ॥ भरतादेरप्रवृत्तिः पुराणोक्तेति चेत्तदा ॥ जक्षन् क्रीडन् रतिं विंदन्नित्यश्रौषीर्न किं श्रुतिम् ॥ ७२ ॥ न ह्याहारादि संत्यज्य भरताद्याः स्थिताः क्वचित् ॥ काष्ठपाषाणवत्किंतु संगभीता उदासते ॥ ७३ ॥ संगी हि बाध्यते लोके निःसंगः सुखमश्नुते ॥ तेन संगः परित्याज्यः सर्वदा सुखमिच्छता ॥ ७४ ॥ अज्ञात्वा शास्त्रहृदयं मूढो वक्त्यन्यथाऽन्यथा ॥ मूर्खाणां निर्णयस्त्वास्तामस्मत्सिद्धांत उच्यते ॥ ७५ ॥ वैराग्यबोधोपरमाः सहायास्ते परस्परम् ॥ प्रायेणसह वर्तंते वियुज्यंते क्वचित् क्वचित् ॥ ७३ ॥ हेतुस्वरूपकार्याणि भिन्नान्येषामसंकरः ॥ यथावदवगंतव्यः शास्त्रार्थं प्रविविच्यता ॥ ७७ ॥ दोषदृष्टिर्जिहासा च पुनर्भोगेष्वदीनता ॥ असाधारणहेत्वाद्या वैराग्यस्य त्रयोऽप्यमी

अप्रवृत्ति तें त्याचें कार्य म्हणजे फळ होय. ॥ ७८ ॥ त्याचप्रमाणें ज्ञानालाही हीं तीन आहेत. श्रवण, मनन आणि निदिध्यास हीं तिन्ही मिळून ज्ञानास हेतु आहेत. तत्त्व-मिथ्या-विवेचन हें ज्ञानाचें स्वरूप, आणि एकदां ग्रंथिभेद झाल्यावर पुनः तिचा उदय न होणें हेंच त्याचें कार्य. ॥ ७९ ॥ तशींच यमनियमादिक जीं योगाचीं साधनें तीं उपरतीचे हेतु. चित्ताचा निरोध म्हणजे कोंडणें हें तिचें स्वरूप आणि व्यवहाराचा लोप हें तिचें कार्य. ह्याप्रमाणें पृथक् पृथक् जाणावें ॥ २८० ॥ या तिहींमध्यें तत्त्वज्ञान हें मुख्य समजावें. कारण, त्यापासून प्रत्यक्ष मोक्षप्राप्ति होते, आणि इतर दोन म्हणजे वैराग्य आणि उपरति हीं केवळ तत्त्वज्ञानास साहाय्य करितात; म्हणून त्यांस प्राधान्य देतां येत नाहीं. ॥ ८१ ॥ कोणा पुरुपाचेठायीं हीं तीनही पूर्णपणें असतील, तर तें मोठ्या तपाचें फळ समजलें पाहिजे. केव्हां केव्हां कित्येकांमध्यें ह्यांपैकीं एका गोष्टीची उणीव असते त्याला पूर्वजन्मींचें पातकच कारण. ॥ ८२ ॥ वैराग्य आति उपरति हीं दोन साधनें ज्या पुरुषाचे ठायीं पूर्णपणें आहेत, परंतु ज्ञानाची मात्र उणीव आहे, अशा पुरुषाला मोक्षप्राप्ति होत नाहीं. त्याला तपोबलानें पुण्यलोकाची प्राप्ति मात्र होते. ॥ ८३ ॥ आतां याच्या उलट ज्या पुरुषाचे ठायीं तत्त्वज्ञान मात्र पूर्ण आहे, परंतु दुसऱ्या दोन साधनांची उणीव आहे, त्याला मोक्षप्राप्ति खचित आहे. जीवन्मुक्ति-सुख मात्र मिळत नाहीं. ॥ ८४ ॥ आतां तिहींची पूर्णता सांगतों. ब्रह्म-लोकही तुच्छ वाटावा म्हणजे वैराग्याची कमाल झाली. अज्ञातकाळीं मी देह ही बुद्धि जशी दृढ असते, तशीच मी ब्रह्म ही बुद्धि दृढ व्हावी म्हणजे ज्ञानाची पूर्णता झाली. ॥ ८५ ॥ आणि निद्रे इतकी विस्मृति झाली म्हणजे उपरमाची सीमा झाली. या दिग्दर्शनावरून बाकीचें तारतम्य समजावें. ॥ ८६ ॥ प्रारब्ध कर्में नानाप्रकारचीं असल्यामुळें तत्त्वज्ञान्याचीं आचरणेंही निरनिराळीं दृष्टीस पड-

---

॥ ७८ ॥ श्रवणादित्रयं तद्वत्तत्त्वमिथ्याविवेचनम् ॥ पुनर्ग्रंथेरनुदयो बोधस्यैते त्रयो मताः ॥ ७९ ॥ यमादिर्धीनिरोधश्च व्यवहारस्य संक्षयः ॥ स्युर्हेत्वाद्या उपरतेरित्यसंकर ईरितः ॥ २८० ॥ तत्त्वबोधः प्रधानं स्यात् साक्षान्मोक्षप्रदत्वतः ॥ बोधोपकारिणावेतौ वैराग्योपरमावुभौ ॥ ८१ ॥ त्रयोऽप्यत्यंतपक्वाश्चेन्महतस्तपसः फलम् ॥ दुरितेन कचित्किंचित्कदाचित्प्रतिबध्यते ॥ ८२ ॥ वैराग्योपरती पूर्णे बोधस्तु प्रतिबध्यते ॥ यस्य तस्य न मोक्षोऽस्ति पुण्यलोकस्तपोबलात् ॥ ८३ ॥ पूर्णे बोधे तदन्यौ द्वौ प्रतिबद्धौ यदा तदा ॥ मोक्षो विनिश्चितः किंतु दृष्टदुःखं न नश्यति ॥ ॥ ८४ ॥ ब्रह्मलोकतृणीकारो वैराग्यस्यावधिर्मतः ॥ देहात्मवत् परात्मत्वदार्ढ्ये बोधः समाप्यते ॥८५॥ सुप्तिवद्विस्मृतिः सीमा भवेदुपरमस्य हि ॥ दिशाऽनया विनिश्चेयं तारतम्यमवांतरम् ॥ ८६ ॥ आरब्धकर्मनानात्वाद्बुद्धानामन्यथाऽन्यथा ॥ वर्तनं तेन शास्त्रार्थे

तात. म्हणून शास्त्रार्थ चांगला न जाणतां पंडितांनीं व्यर्थ भ्रमांत पडूं नये. ॥ ८७ ॥ आपापल्या कर्मानुसारेंकरून ज्ञान्याचें वर्तन निराळें असलें, तरी त्या सर्वांमध्यें असणारें आत्मज्ञान एकच आहे. म्हणून सर्वांस मुक्ति ही सारखीच मिळते. ॥ ८८ ॥ आपल्या स्वरूपाचेठायीं पटावर चित्र काढल्याप्रमाणें हें जगद्रूप चित्र मायेनें काढलें आहे, त्याची उपेक्षा करून बाकी राहिलेलें चैतन्य पहावें. ॥ ८९ ॥ आतां या प्रकरणाची फलश्रुति सांगून हा विषय आटपतों. जो मनुष्य या चित्रदीपाचें नित्य अनुसंधान करील त्यास हें जगच्चित्र दिसत असूनही पहिल्याप्रमाणें तो भ्रमांत पडणार नाहीं ॥ २९० ॥ श्रीशंकरार्पणमस्तु ॥

चित्रदीपः समाप्त।

---

भ्रमितव्यं न पंडितैः ॥८७॥ स्वस्वकर्मानुसारेण वर्त्ततां ते यथा तथा॥
अविशिष्टः सर्वबोधः समा मुक्तिरिति स्थितिः ॥ ८८॥ जगच्चित्रं
स्वचैतन्ये पटे चित्रमिवार्पितम् ॥ मायया, तदुपेक्ष्यैव चैतन्यं परिशेष्यताम् ॥ ८९ ॥ चित्रदीपमिमं नित्यं येऽनुसंदधते बुधाः ॥
पश्यंतोऽपि जगच्चित्रं ते मुह्यंति न पूर्ववत् ॥ २९० ॥

॥ इति श्रीपञ्चदश्यां चित्रदीपः समाप्तः ॥

# सार्थपंचदश्याम्

## तृप्तिदीपः

### सप्तमं प्रकरणम् ।

आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ॥
किमिच्छन् कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ १ ॥

**या श्रुतीचा अर्थ**—हा आत्मा मी आहें असें आत्मज्ञान जीवास होईल तर इच्छेला विषय आणि इच्छेचें प्रयोजन हीं दोन्हींही न राहिल्यामुळें तो शरीरास झालेलीं दुःखें आत्म्यास कधींही लावणार नाहीं. ॥ १ ॥ या प्रकरणांत वरील श्रुतीच्या अभिप्रायाविषयीं आम्ही चांगल्या रीतीनें विचार करणार. त्यावरून जीवन्मुक्ताची जी तृप्ति श्रुतीमध्यें सांगितली आहे, तिचें स्वरूप स्पष्टपणें ध्यानांत येईल. ॥ २ ॥ आतां वरील श्रुतींतील पुरुष या शब्दाचा अर्थ करूं. परंतु त्यास उपोद्घातादाखल ही सृष्टि कशी झाली हें पूर्वी थोडक्यांत सांगितलें पाहिजे. मायेनें प्रतिबिंबेंकरून जीव आणि ईश या दोघांस प्रथम उत्पन्न केलें आणि त्या दोघांनीं बाकी सर्व सृष्टि कल्पिली आहे. यांत माया शब्दाचा अर्थ चिदानन्दमयब्रह्मप्रतिबिंबेंकरून युक्त जी त्रिगुणात्मक जगास उपादानभूत मूलप्रकृति ती असें समजावें. ॥३॥ जिच्या प्रारंभीं ईक्षण आणि अंतीं प्रवेश अशी जी सृष्टि ती ईश्वरानें कल्पिली. आणि ज्याच्या आरंभीं जागृति आणि अंतीं मोक्ष असा जो संसार तो जीवानें कल्पिलेला आहे. ॥४ भ्रमाला अधिष्ठानभूत असंगचैतन्यरूपी जो कूटस्थ आत्मा तो अन्योन्याध्यासामुळें बुद्धीच्याठायीं प्रतिबिंबित झाला तोच जीव असें मागील प्रकरणीं सांगितलें आहे. तोच या श्रुतींतील पुरुष समजावाः ॥ ५ ॥ मोक्ष स्वर्गादिकांच्या साधनाला नुसता प्रतिबिंबरूप जीवच अधिकारी होत

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ तृप्तिदीपः ॥ आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ॥ किमिच्छन् कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ १ ॥ अस्याः श्रुतेरभिप्रायः सम्यगत्र विचार्यते ॥ जीवन्मुक्तस्य या तृप्तिः सा तेन विशदायते ॥ २ ॥ मायाभासेन जीवेशौ करोतीति श्रुतत्वतः ॥ कल्पितावेव जीवेशौ ताभ्यां सर्वं प्रकल्पितम् ॥३॥ ईक्षणादिप्रवेशांता सृष्टिरीशेन कल्पिता ॥ जाग्रदादिविमोक्षांतः संसारो जीवकल्पितः ॥ ४ ॥ भ्रमाधिष्ठानभूतात्मा कूटस्थासंगचिद्वपुः ॥ अन्योन्याध्यासतोऽसंगधीस्थजीवोऽत्र पूरुषः ॥ ५ ॥ साधिष्ठानो विमोक्षादौ जीवोऽधिक्रियते

नाहीं. म्हणून अधिष्ठान जो कूटस्थ त्यासहितच तो घेतला पाहिजे. कारण, जीव हा कूटस्थावर केवळ भ्रांतिकल्पित आहे. आणि भ्रांतीची अधिष्ठानावांचून सिद्धताच होत नाहीं. ॥६॥ जेव्हां भ्रम होतो तेव्हां एक अधिष्ठानाचा अंश आणि एक भ्रमाचा अंश असा दोहींचा संयोग तेथें असतो. जसें शिंपीवर रुपें भासतें; यांत शिंपीचा अंश आणि आरोपित रुप्याचा अंश हे दोन्ही असतात. त्याप्रमाणेंच जीवाची स्थिति आहे. जेव्हां अधिष्ठानकूटस्थासहित भ्रमांश जो चिदाभास याचें अवलंबन जीव करितो; म्हणजे तेंच मी असें म्हणतो, तेव्हां मी संसारी असा अभिमान जीवास होतो. ॥ ७ ॥ आणि जेव्हां भ्रमांश जो चिदाभास त्याचा तिरस्कार करून, म्हणजे मिथ्यात्वबुद्धीनें अनादर करून, केवळ अधिष्ठानालाच अवलंबून असतो तेव्हां मी चैतन्यरूपी असंगात्मा आहे असें त्यास समजतें. ॥ ८ ॥ असंगाचेठायीं अहंकार संभवत नाहीं असें असून " मी असंग आहें " असें तो कसें समजतो? असें जर कोणी म्हणेल तर अहंकाराचे तीन प्रकार आहेत, त्यांपैकीं एक मुख्य आहे, आणि दोन अमुख्य म्हणजे लाक्षणिक आहेत. ॥ ९ ॥ कूटस्थ आणि चिदाभास या दोहोंचें ऐक्य करून, म्हणजे भेद न समजून, अन्योन्याध्यासरूपानें अज्ञानी लोक ज्या अहं शब्दाचा प्रयोग करितात, तो अहं शब्द मुख्य असें समजावें. ॥ १० ॥ आणि कूटस्थ व चिदाभास या दोहोंचा भेद ओळखून तत्त्ववेत्ता लौकिक व वैदिक व्यवहारांत अनुक्रमानें मी मी असें म्हणतो तेव्हां त्या प्रत्येक मी शब्दाचा अर्थ अमुख्य म्हणजे लाक्षणिक समजावा. ॥ ११ ॥ लौकिक व्यवहारांत " मी जातों " " मी करितों " असें जेव्हां हा तत्त्ववेत्ता म्हणतो तेव्हां कूटस्थापासून निराळा जो चिदाभास त्याला उद्देशून म्हणतो. ॥ १२ ॥ तसेंच शास्त्रीयदृष्टीनें " मी असंग आहें " " मी चिद्रूप आहें " असें जेव्हां तो बोलतो तेव्हां कूटस्थालाच उद्देशून तो बोलतो. ॥ १३ ॥ येथें असा एक आक्षेप निघण्याजोगा आहे कीं, " मी असंग आहें " असें जें ज्ञान झालें, तें कू-

---

न तु ॥ केवलो निरधिष्ठानविभ्रांतेः क्वाप्यसिद्धितः ॥ ६ ॥ अधिष्ठानांशसंयुक्तं भ्रमांशमवलंबते ॥ यदा तदाऽहं संसारीत्येवं जीवोऽभिमन्यते ॥ ७ ॥ भ्रमांशस्य तिरस्कारादधिष्ठानप्रधानतां॥ यदा तदा चिदात्माऽहमसंगोऽस्मीति बुध्यते ॥ ८ ॥ नासंगेऽहंकृतिर्युक्ता कथमस्मीति चेच्छृणु ॥ एको मुख्यो द्वावमुख्यावित्यर्थस्त्रिविधोऽहमः ॥ ९ ॥ अन्योन्याध्यासरूपेण कूटस्थाभासयोर्वपुः ॥ एकीभूय भवेन्मुख्यस्तत्र मूढैः प्रयुज्यते ॥ १० ॥ पृथगाभासकूटस्थावमुख्यौ तत्र तत्त्ववित् ॥ पर्यायेण प्रयुंक्तेऽहंशब्दं लोके च वैदिके ॥ ११ ॥ लौकिकव्यवहारेऽहं गच्छामीत्यादिके बुधः ॥ विविच्यैव चिदाभासं कूटस्थात्तं विवक्षति ॥१२॥ असंगोऽहं चिदात्माऽहमिति शास्त्रीयदृष्टितः ॥ अहंशब्दं प्रयुंक्तेऽयं कूटस्थे केवले बुधः ॥ १३ ॥ ज्ञानिताज्ञानिते त्वात्मा-

टस्थास कीं चिदाभासास? कूटस्थास म्हणावें तर तो असंग चिद्रूप असल्यामुळें जाणतें नेणतेपणा त्यास संभवत नाहीं; म्हणून तें चिदाभासालाच झालें पाहिजे. बरें तसें जर म्हणावें तर " मी कूटस्थ " असें ज्ञान चिदाभासास तरी कसें होईल? ॥ १४ ॥ तर यावर आमचें उत्तर असें आहे कीं, चिदाभास हा कूटस्थाहून निराळी एक वस्तू आहे असें मुळींच नाहीं. तो कूटस्थाचें प्रतिबिंब असल्यामुळें कूटस्थाचाच स्वभाव त्याला आला आहे. आतां आभास हा मिथ्याच आहे. तेव्हां बाकी राहिलेला कूटस्थ हा मात्र खरा म्हणून वरील शंका संभवत नाहीं. ॥ १५ ॥ तुमचा चिदाभास खोटा झाल्यानंतर " कूटस्थ मी आहें " असें जें त्याचें ज्ञान तेंही खोटेंच, असें जर कोणी म्हणेल तर आम्ही नाहीं कुठें म्हणतों? रज्जुसर्प जर खोटा आहे तर त्याचें सर्पटणेंहि खोटेंच म्हटलें पाहिजे. ॥ १६ ॥ परंतु अशा खोट्या ज्ञानानें संसारनिवृत्ति होत नाहीं असें मात्र समजूं नये. कारण जसें ज्ञान मिथ्या आहे तसा संसारही मिथ्याच आहे. जसा यक्ष तसा बली अशी जी लोकांत म्हण आहे तिचा भावार्थ असा कीं, पोर रडूं लागलें म्हणजे " बागुलबावाचे स्वाधीन तुला करितों " असें त्यास भय घालतात. तेथें बागुलबावा, आणि त्याचे स्वाधीन करणें, या दोन्ही गोष्टी जरी खोट्या झाल्या तरी त्यापासून मुलाचें रडणें बंद होतें. ॥ १७ ॥ याकरितां चिदाभासाचें स्वरूप कूटस्थच असल्यामुळें पुरुष शब्दवाच्य कूटस्थासहित जो चिदाभास तो, त्या कूटस्थास आपणापासून निराळा करून " मीं कूटस्थ आहें " असें समजण्यास तो योग्य होतो. अशा अभिप्रायानें श्रुतीनें " अस्मि " या शब्दाचा उपयोग केला. ॥ १८ ॥ याप्रमाणें श्रुतींतील " पुरुष " आणि " अस्मि " या दोन पदांचा अभिप्राय सांगितला. आतां " अयं " शब्दाचा अर्थ सांगतों. जसें साधारण लोकांत " हा देह मी आहें " असें देहरूप आत्म्याविषयीं निःसंशय ज्ञान असतें, तसेंच ज्ञान आत्म्याविषयींही असावें, असा निर्णय करण्याकरितां " अयं ' या सर्वनामाचा प्रयोग श्रुतीनें केला. ॥ १९ ॥ वर ज्या प्रकारचें ज्ञान सांगितलें तेंच मुक्तीला साधन आहे एतद्विषयीं आचार्यांचें पुढील वाक्य प्रमाण आहे. ( देहात्मज्ञानव-

---

भासस्यैव न चात्मनः ॥ तथा च कथमाभासः कूटस्थोऽस्मीति बुद्ध्यताम् ॥ १४ ॥ नायं दोषश्चिदाभासः कूटस्थैकस्वभाववान् ॥ आभासत्वस्य मिथ्यात्वात्कूटस्थत्वावशेषणात् ॥ १५ ॥ कूटस्थोऽस्मीति बोधोऽपि मिथ्याचेन्नेति को वदेत् ॥ न हि सत्यतयाऽभीष्टं रज्जुसर्पविसर्पणम् ॥ १६ ॥ तादृशेनापि बोधेन संसारो हि निवर्तते ॥ यक्षानुरूपो हि बलिरित्याहुर्लौकिका जनाः॥१७॥ तस्मादाभासपुरुषः सकूटस्थो विविच्य तम् ॥ कूटस्थोऽस्मीति विज्ञातुमर्हतीत्यभ्यधाच्छ्रुतिः ॥ १८ ॥ असंदिग्धाविपर्यस्तबोधो देहात्मनीक्ष्यते ॥ तद्वदत्रेति निर्णेतुमयमित्यभिधीयते ॥ १९ ॥ देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम् ॥ आत्मन्येव भवेद्यस्य

ज्ञानं ) याचा अर्थ असा कीं, " मी मनुष्य " असें साधारण लोकांस जसें दृढ ज्ञान आहे, तसें प्रत्यगात्म्याविषयीं मी ब्रह्म आहें " असें ज्ञान ज्या पुरुषास झालें त्याला मोक्ष नको म्हटला तरी सुटत नाहीं. ॥ २० ॥ ज्याप्रमाणें " हा घट " असें म्हणून घटाची प्रत्यक्षता दर्शविली जाते, त्याप्रमाणें " अयं अस्मि " यांतही " अयं " शब्दाचा अर्थ प्रत्यक्षतादर्शक आहे. अशी जर कोणाला शंका असेल तर तोही अर्थ आम्हास मान्यच आहे. कारण, आत्मचैतन्य स्वयंप्रकाश असल्यामुळें तें भासण्यास इतर साधनाची गरजच नाहीं. ॥ २१ ॥ " अयं " या दर्शक सर्वनामाच्या प्रयोगावरून आत्म्यास परोक्षत्व व प्रत्यक्षत्व तसेंच ज्ञान आणि अज्ञान हीं युग्में संभवतात असें दिसतें. तर तुमचा आत्मा नित्य अपरोक्ष असून हें कसें ? या प्रश्नाचें उत्तर पुढील दशमाच्या दृष्टांतावरून ध्यानांत येईल. ॥ २२ ॥ कल्पना करा कीं, दहा असामी मिळून नदी उतरून जात आहेत. नदी उतरल्यानंतर आपण सर्व सुरक्षितपणें आलों कीं नाहीं, हें पाहण्याकरितां त्यांतील एक मनुष्य सर्वांस मोजून पाहतो तों आपली गणना न करितां बाकीच्यांस मात्र मोजल्यामुळें प्रत्यक्ष आपल्यापुढें नऊ असामींस पहात असूनही मी दहावा हें जाणत नाहीं. हें त्याचें दशमाविषयींचें अज्ञान झालें. ॥ २३ ॥ दहावा आपण असून दहावा नाहीं आणि दिसतही नाहीं असें मानतो हें अज्ञानकृत आवरण झालें. ॥ २४ ॥ मग भ्रमानें दहावा नदींत वाहून गेलारे गेला असा शोक करून मोठ्यानें रडूं लागतो. या स्थितीस अज्ञानकृत विक्षेप म्हणतात. ॥ २५ ॥ इतक्यांत तेथें एक आप्त आला, त्याणें रडण्याचें कारण पुसून त्याला असें सांगितलें कीं, रडतोस कां, दहावा जीवंत आहे. हें त्याचें " स्वर्ग आहे " या श्रुतिवाक्याप्रमाणें, विश्वसनीय वाक्य ऐकून जें त्याला दशमाविषयींचें ज्ञान झालें तें परोक्षज्ञान. ॥ २६ ॥ मग त्याच आप्तानें त्याच्या देखत सर्वांस मोजून " हे नऊ आणि तूं दहावा " असें म्हणून डोक्यावर काठी मारून दाखविलें, तेव्हां मीच दशम असें जाणून रडणें बंद करून हर्षानें हंसतो हें अपरोक्षज्ञान, ॥ २७ ॥

---

स नेच्छन्नपि मुच्यते ॥ २० ॥ अयमित्यपरोक्षयत्वमुच्यते चेत्तदुच्यताम् ॥ स्वयंप्रकाशचैतन्यमपरोक्षं सदा यतः ॥ २१ ॥ परोक्षमपरोक्षं च ज्ञानमज्ञानमित्यदः ॥ नित्यापरोक्षरूपेऽपि द्वयं स्याद्दशमे यथा ॥ २२ ॥ नवसंख्याहृतज्ञानो दशमो विभ्रमात्तदा ॥ न वेत्ति दशमोऽस्मीति वीक्षमाणोऽपि तान्नव ॥ २३ ॥ न भाति नास्ति दशम इति स्वं दशमं तदा ॥ मत्वा वक्ति तदज्ञानकृतमावरणं विदुः ॥ २४ ॥ नद्यां ममार दशम इति शोचन्प्ररोदिति ॥ अज्ञानकृतविक्षेपं रोदनादिं विदुर्बुधाः ॥ २५ ॥ न मृतो दशमोऽस्तीति श्रुत्वाऽऽप्तवचनं तदा ॥ परोक्षत्वेन दशमं वेत्ति स्वर्गादिलोकवत् ॥ २६ ॥ त्वमेव दशमोऽसीति गणयित्वा प्रदर्शितः ॥ अपरोक्षतया ज्ञात्वा हृष्यत्येव न रोदिति ॥ २७ ॥

या दशमाच्या दृष्टांताप्रमाणें अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, शोकनिवृत्ति आणि तृप्ति या सात अवस्था चिदात्म्याच्याठायीं ताडून पहाव्या. ॥ २८ ॥ त्या अशा कीं, दृष्टांतांतील दशमाप्रमाणें हा चिदाभास संसारांत आसक्त होऊन गुरूची गांठ पडण्यापूर्वी आपलें स्वस्वरूप जो " कूटस्थ " त्याला मुळींच जाणत नाहीं. हें येथें अज्ञान ही पहिली अवस्था समजावी. ॥ २९ ॥ पुढें प्रसंगवशात् कूटस्थाविषयीं प्रश्न निघाला असतां कूटस्थ मला दिसत नाहीं व मुळींच नाहीं असें तो म्हणतो, हें त्याचें अज्ञानकृत आवरण. आणि मी कर्ता आहें, मी भोक्ता आहें, असा जो पुढें बहकत सुटतो हा विक्षेप. ॥ ३० ॥ पुढें " कूटस्थ आहे " असें आप्तवचन ऐकून जें त्याला ज्ञान होतें तें परोक्षज्ञान--आणि नंतर श्रवणमनननादिकेंकरून गुरुकृपा झाल्यावर " तो कूटस्थ मी आहें " असें जें निश्चयात्मक ज्ञान होतें तें अपरोक्षज्ञान. ॥ ३१ ॥ हें ज्ञान झाल्यावर " मी कर्ता, मी भोक्ता " अशा भ्रांतीपासून होणारा त्याचा शोक नाहींसा होतो ही शोकनिवृत्ति, आणि शोकनिवृत्तीनंतर " करावयाचें तें मीं केलें " व " मिळवावयाचें तें मीं मिळविलें " अशी धन्यता वाटून तो तृप्त होतो ही सातवी अवस्था. ॥ ३२ ॥ येणेंप्रमाणें अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, शोकनिवृत्ति आणि निरंकुशा तृप्ति--॥ ३३ ॥ या सात अवस्था आत्म्याला आहेत असें समजूं नये. त्या केवळ चिदाभासालाच आहेत. या सातांत, बंधमोक्ष दोन्हींही येतात. त्यांपैकीं पहिल्या तीन बंध करणाऱ्या, आणि बाकीच्या चार मोक्ष देणाऱ्या आहेत. ॥ ३४ ॥ पहिल्या तीन बंधकारक म्हणून सांगितलें. त्यांतील पहिली अवस्था जे अज्ञान त्याचें स्वरूप आतां स्पष्ट करून दाखवूं. आत्मतत्वाचा विचार मनांत येण्यापूर्वी मनुष्याचा जो सहज व्यवहार असतो त्याला कारणीभूत " मी जाणत नाहीं " अशी जी बुद्धि तेंच अज्ञान. हें अज्ञान मनुष्याच्या अंगांत इतकें भिनून गेलें आहे कीं, आपल्यास

---

अज्ञानावृतिविक्षेपद्विविधज्ञानतृप्तयः ॥ शोकापगम इत्येते योजनीयाश्चिदात्मनि ॥ २८ ॥ संसारासक्तचित्तः संश्चिदाभासः कदाचन ॥ स्वयंप्रकाशकूटस्थं स्वतत्त्वं नैव वेत्त्ययम् ॥ २९ ॥ न भाति नास्ति कूटस्थ इति वक्ति प्रसंगतः ॥ कर्ता भोक्ताऽहमस्मीति विक्षेपं प्रतिपद्यते ॥ ३० ॥ अस्ति कूटस्थ इत्यादौ परोक्षं वेत्ति वार्तया ॥ पश्चात्कूटस्थ एवास्मीत्येवं वेत्ति विचारतः ॥ ३१ ॥ कर्ता भोक्तेत्येवमादि शोकजातं प्रमुंचति ॥ कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव तुष्यति॥ ३२ ॥ अज्ञानमावृतिस्तद्वद्विक्षेपश्च परोक्षधीः ॥ अपरोक्षमतिः शोकमोक्षस्तृप्तिर्निरंकुशा ॥३३ सप्तावस्था इमाः संति चिदाभासस्य तास्विमौ ॥ बंधमोक्षौ स्थितौ तत्र तिस्रो बंधकृतः स्मृताः ॥ ३४ ॥ न जानामीत्युदासीन व्यवहारस्य कारणम् ॥ विचारप्रागभावेन युक्तमज्ञानमीरि-

कांहीं समजत नाहीं हें मुद्दां त्यांचे गांवीं नाहीं. ॥ ३५ ॥ आतां आवरणाचें स्वरूप आणि कार्य सांगतों. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें विचार न करितां केवळ स्वतःचेच तर्क लढवून कूटस्थ नाहीं व तो दिसतही नाहीं असें विपरीत समजतो. हाच आवरणाचा परिणाम. ॥ ३६ ॥ आतां विक्षेपाचें स्वरूप आणि कार्य याचा विचार करूं. स्थूल, सूक्ष्म या देहद्वयानें युक्त जो चिदाभास तोच विक्षेप. तोच सर्व बंधास हेतु आणि त्यापासूनच कर्तृत्वादिक संसारदुःखं होतें. ॥ ३७ ॥ आतां अज्ञान आणि आवरण या दोन अवस्था विक्षेपाच्या पूर्वींच्या आहेत आणि विक्षेप तर चिदाभासाचेंच स्वरूप असें तुह्मी ह्मणतां, तर पूर्वोक्त अवस्था चिदाभासास आहेत ही गोष्ट कशी संभवेल अशी कोणी शंका घेईल, तर त्यास तूर्त आह्मी इतकेंच सांगतों कीं असंग आत्म्यास त्या अवस्था लावण्यापेक्षां चिदाभासासच लावणें बरें. ॥३८॥ कारण, त्या दोन अवस्था असण्याचे वेळीं चिदाभासाचा जरी अभाव असला तथापि त्याचा संस्कार ह्मणून त्या वेळीं असतोच, म्हणून त्या अवस्था त्याच्याच आहेत असें मानण्यानें कोणताच विरोध येत नाहीं. बीजाच्या वेळीं वृक्ष जरी नसला तरी बीज ही वृक्षाचीच अवस्था म्हणण्यास कोणची हरकत आहे ? ॥ ३९ ॥ आतां असा एक प्रश्न निघण्याजोगा आहे कीं, केवळ अनुमानगम्य संस्कार कल्पून या दोन अवस्था विक्षेपाला लावण्यापेक्षां त्या दोन्हींचें अधिष्ठान जें ब्रह्म त्यालाच लावणें बरें नव्हे काय ? तर याजवर उत्तर असें कीं, ब्रह्म हें अधिष्ठान ह्मणून जर त्या दोन अवस्था लावाव्या तर त्या दृष्टीनें सातही अवस्था ब्रह्मालाच लागू होतील. असा अति प्रसंग करण्यापेक्षां त्या चिदाभासालाच लावणें योग्य आहे. ॥ ४० ॥ पण ब्रह्म अधिष्ठान आहे ही गोष्ट जरी सर्व अवस्थांस सारखी लागू आहे, तरी " मी संसारी " " मी ज्ञानी " " मी शोकरहित झालों " " मी तृप्ति पावलों " अशा चार उत्तरावस्था जीवालचा आहेत असें दिसतें. त्या ब्रह्माला संभवत नाहींत. या पूर्वपक्षावर आमचें उत्तर असें कीं,— ॥ ४१ ॥ वरील कारणावरून या चार अवस्था जर जीवास आहेत तर त्याच कारणास्तव पूर्वींच्या दोन अवस्थाही जीवास संभवतात. कारण मला कांहीं समजत नाहीं, ब्रह्माचें असणें

---

तम् ॥ ३५ ॥ अमार्गेण विचार्याथ नास्ति नो भाति चेत्यसौ ॥ विपरीतव्यवहृतिरावृतेः कार्यमिष्यते ॥ ३६ ॥ देहद्वयचिदाभासरूपो विक्षेप ईरितः ॥ कर्तृत्वाद्यखिलः शोकः संसाराख्योऽस्य बंधकः ॥ ३७॥ अज्ञानमावृतिश्चैते विक्षेपात् प्राक् प्रसिद्ध्यतः ॥ यद्यप्यथाप्यवस्थे ते विक्षेपस्यैव नात्मनः ॥ ३८ ॥ विक्षेपोत्पत्तितः पूर्वमपि विक्षेपसंस्कृतिः ॥ अस्त्येव तदवस्थात्वमविरुद्धं ततस्तयोः ॥ ३९ ॥ ब्रह्मण्यारोपितत्वेन ब्रह्मावस्थे इमे इति ॥ न शंकनीयं सर्वासां ब्रह्मण्येवाधिरोपणात् ॥ ४० ॥ संसार्यहं विबुद्धोऽहं निःशोकस्तुष्ट इत्यपि ॥ जीवगा उत्तरावस्था भांति न ब्रह्मगा यदि ॥ ४१ ॥ तर्ह्यज्ञोऽहं ब्रह्मसत्त्वभाने मद्दृष्टितो न हि ॥

भासणें माझ्या अनुभवास येत नाहीं असेंही जीव म्हणतो. ॥ ४२ ॥ तर ब्रह्म हें अज्ञानाला आश्रय आहे असें पूर्वाचार्यांनीं कां सांगितलें ? असें कोणी पुसेल तर त्यावर आह्मी असें सांगतों कीं, तेथें त्याची विवक्षा निराळी आहे. त्यांणीं जो आश्रय म्हटला तो केवळ अधिष्ठान असें समजावें. आणि आम्ही जें अज्ञान जीवाची अवस्था असें म्हणतों तें तेथें जीवाचें अधिष्ठान नाहीं, तर त्याचा अभिमान जीवानें घेतला आहे असें समजावें. ॥ ४३ ॥ याप्रमाणें बंधास कारणीभूत अशा तीन अवस्था दाखविल्या. आतां बाकी राहिलेल्या अवस्थांपैकीं मुक्तिला कारणीभूत ज्या दोन अवस्था त्या येथें दाखवून त्यांपासून अज्ञान व आवरण हीं कशीं नाश पावतात तें सांगतों. परोक्ष व अपरोक्ष या दोन ज्ञानांच्या योगानें पूर्वोक्त अज्ञान नाश पावलें ह्मणजे ब्रह्म नाहीं व तें दिसत नाहीं असें अज्ञानापासून होणारें जें दोन प्रकारचें आवरण तेंही नाश पावतें. ॥ ४४ ॥ परोक्षज्ञानाच्या योगानें असत्त्वरूप आवरण नाश पावतें आणि अपरोक्षज्ञानाचे योगानें अभानरूप आवरण नाश पावतें. ॥ ४५ ॥ अभानरूप आवरण अपरोक्ष ज्ञानानें नष्ट झालें असतां " मी ब्रह्म आहें " " जीव नव्हें " असा अनुभव होऊन जीवत्व नाहींसें होतें; मग अर्थातच कर्तृत्वादिक अभिमानापासून होणारा संसाररूपी शोक नाहींसा होतो. ॥ ४६ ॥ सर्व संसार निवृत्त झाला असतां मी नित्य मुक्त आहें असें सहजच वाटूं लागतें. हीच निरंकुशतृप्तिसंज्ञक सातवी अवस्था. कारण ही तृप्ति झाली असतां कोणतीही कर्तव्यता न राहिल्यामुळें पुनः दुःख होण्याचें कारणच नाहीं. ॥ ४७ ॥ या प्रकरणाच्या आरंभीं जी " आत्मानं चेत् " अशी श्रुति दिलेली आहे, तिजवर व्याख्यान देणें हा प्रकृत विषय असून, आह्मीं जें अवस्थासप्तकाचें निरूपण केलें तें विषयांतर झालें अशी शंका नघेणें कारण, चिदाभासाच्या ज्या चार उत्तर अवस्था सांगितल्या, त्यांपैकीं अपरोक्षज्ञान आणि शोकनिवृत्ति या दोन अवस्थांचें मात्र प्रतिपादन करण्याचा जरी या श्रुतीचा मुख्य उद्देश आहे तथापि बाकीच्या पांच ज्या सांगितल्या आहेत, त्या विषयाच्या ओघानें सांगाव्या लागल्या. ॥४८॥ " अयं " अयं या श्रुतीतील शब्दापासून आत्म्याच्या अपरोक्षत्वाचा बोध होतो; असें जें वर सांगितलें, त्यावरून आत्मा हा अपरोक्षज्ञानालाच विषय आहे; परोक्ष ज्ञानाला तो वि-

---

इति पूर्वे अवस्थे च भासेते जीवगे खलु ॥ ४२ ॥ अज्ञानस्याश्रयो ब्रह्मेत्यधिष्ठानतया जगुः ॥ जीवावस्थात्वमज्ञानाभिमानित्वादवादिषम् ॥४३॥ ज्ञानद्वयेन नष्टेऽस्मिन्नज्ञाने तत्कृतावृतिः ॥ न भाति नास्ति चेत्येषा द्विविधाऽपि विनश्यति ॥ ४४ ॥ परोक्षज्ञानतो नश्येदसत्त्वावृतिहेतुता ॥ अपरोक्षज्ञाननाश्या ह्यभानावृतिहेतुता ॥४५॥ अभानावरणे नष्टे जीवत्वारोपसंक्षयात् ॥ कर्तृत्वाद्यखिलः शोकः संसाराख्यो निवर्तते ॥ ४६ ॥ निवृत्ते सर्वसंसारे नित्यमुक्तत्वभासनात् ॥ निरंकुशा भवेत्तृप्तिः पुनः शोकासमुद्भवात् ॥ ४७ ॥ अपरोक्षज्ञानशोकनिवृत्त्याख्ये उभे इमे ॥ अवस्थे जीवगे ब्रूत आत्मानं चेदिति श्रुतिः ॥ ४८ ॥ अयमित्य-

षय नाहीं, असें जर कोणी ह्मणेल, तर आह्मी त्याचा विचार येथें सांगतों. तो असा कीं, अ-परोक्षज्ञानाचे दोन प्रकार आहेत. विषयस्वप्रकाशत्वेंकरून एक, व तसें बुद्धीनें त्याचें स्वरूप समजणें हा दुसरा. ॥ ४९ ॥ अपरोक्षज्ञानकालीं ब्रह्माची स्वप्रकाशता जशी असते तशीच परोक्षज्ञानकालींही असते. कारण, ब्रह्म स्वप्रकाश आहे हें तेव्हांही वाक्यद्वारा समजतें. ॥५०॥ प्रत्यगभिन्न ब्रह्माविषयींच्या ज्ञानाला परोक्षत्व कसें येईल? असें जर कोणी ह्मणेल तर, वाक्यांत प्रत्यगंशाचें ग्रहण केलें नाहीं ह्मणून ती शंका संभवत नाहीं. कारण, " मी ब्रह्म " असें न लिहितां केवळ " ब्रह्म आहे " असें लिहिलें आहे. हें परोक्षज्ञान भ्रांत्यात्मक असें कोणी ह्मणत असेल तर त्यास आह्मी असें पुसतों कीं, परोक्षज्ञान जें भ्रांत्यात्मक तुह्मी ह्मणतां तें कोणत्या कारणास्तव? काय " ब्रह्मास्ति " हें वाक्य रद्द करण्याजोगें दुसरें वाक्य आहे ह्मणून ह्मणतां! कीं व्यक्तीचा उल्लेख नाहीं ह्मणून ह्मणतां? कीं, प्रत्यक्षत्वेंकरून समजण्याची वस्तू परोक्षत्वेंकरून घेतली ह्मणून ह्मणतां? किंवा अंशाचें ग्रहण होत नाहीं ह्मणून म्हणतां? ह्या चार कारणांपैकीं, पहिलें कारण जी वाक्याची बाधा ती येथें कांहीं संभवत नाहीं. ॥५१॥ कारण, ब्रह्मास्ति या वाक्याची बाधा करण्यास ब्रह्म नास्ति असें वाक्य कोठेंही आढळत नाहीं, ह्मणून येथें बाधा संभवत नाहीं. ॥५२॥ आतां भ्रांतीचें दुसरें कारण व्यक्तीचा अनुल्लेख येथें व्यक्तीचा उल्लेख जरी नसला तरी तेवढ्यानेंच केवळ त्या ज्ञानाला भ्रांतित्व येत नाहीं. कारण तसें जर ह्मणावें, तर स्वर्गज्ञान देखील भ्रांति म्हणावें लागेल. " स्वर्ग आहे " या वाक्यांत व्यक्तीचा उल्लेख मुळींच नाहीं. केवळ सामान्य उल्लेख आहे. ॥ ५३ ॥ तिसरें, अपरोक्षत्वास योग्य असून परोक्षत्वेंकरून ग्रहण केलें, यामुळेंच केवळ भ्रांति संभवत नाहीं. कारण " आहे " या वाक्यांत " ब्रह्म परोक्ष " असें मुळींच म्हटलें नाहीं, मग ब्रह्मज्ञान तरी परोक्ष कसें? असें जर म्हणाल तर, " इदं ब्रह्म " असा व्यक्त्युल्लेख वाक्यांत नाहीं म्हणून अर्थातच परोक्षत्वसिद्धि झाली. ॥ ५४ ॥ भ्रांतीचें चौथें कारण; अंशाचें अग्रहण. तेंही येथें बरोबर लागू पडत नाहीं. कारण तेवढ्याचमुळें जर, ज्ञान भ्रांत्यात्मक म्हणावें तर, घटज्ञानही भ्रांति ह्मणावी लागेल. कारण, घटज्ञानांत देखील आंतील सर्व अवयवांचें ग्रहण होत

---

परोक्षत्वमुक्तं तद्द्विविधं भवेत् ॥ विषयस्वप्रकाशत्वात् धियाऽप्येवं तदीक्षणात् ॥ ४९ ॥ परोक्षज्ञानकालेऽपि विषयस्वप्रकाशता ॥ समा ब्रह्म स्वप्रकाशमस्तीत्येवं विबोधनात् ॥ ५० ॥ अहं ब्रह्मेत्यनुल्लिख्य ब्रह्मास्तीत्येवमुल्लिखेत् ॥ परोक्षज्ञानमेतन्न भ्रांतं बाधानिरूपणात् ॥ ५१ ॥ ब्रह्म नास्तीति मानं चेत् स्याद्बाध्येत तदा ध्रुवम् ॥ न चैवं प्रबलं मानं पश्यामोऽतो न बाध्यते ॥ ॥ ५२ ॥ व्यक्त्यनुल्लेखमात्रेण भ्रमत्वे स्वर्गधीरपि ॥ भ्रांतिः स्याद्व्यक्त्यनुल्लेखात् सामान्योल्लेखदर्शनात् ॥ ५३ ॥ अपरोक्षत्वयोग्यस्य न परोक्षमतिर्भ्रमः ॥ परोक्षमित्यनुल्लेखादर्थात्पारोक्ष्यसंभवात् ॥ ५४ ॥ अंशागृहीतेर्भ्रांतिश्चेद् घटज्ञानं भ्रमो भवेत् ॥ नि-

नसतें. आम्हीं येथें घटाचा दृष्टांत दिला, त्याजवरून आणखी एक प्रश्न निघण्याजोगा आहे. तो हा कीं, घट सांश आहे म्हणून तेथें अंशाचें ग्रहण संभवतें. परंतु निरंश ब्रह्माला शांतत्व कसें संभवेल ? तर त्याचें उत्तर असें कीं ब्रह्मालाही, भेदक उपाधिरूप मायेचा अंश आहेच. ॥ ५५ ॥ ते भेदक अंश दोन आहेत. एक असत्वांश आणि दुसरा अभानांश. पहिला परोक्षज्ञानानें निवृत्त होतो. आणि दुसरा अपरोक्षज्ञानानें नाहींसा होतो. ॥५६॥ " दहावा आहे " या आप्तवाक्यापासून उत्पन्न होणारें परोक्षज्ञान हें वरील दृष्टांतांत जसें निभ्रांत आहे, तसेंच " ब्रह्मास्ति " या वाक्यापासून होणारें ज्ञानही निभ्रांत आहे. दोहींकडे अज्ञानाचें असत्वावरण समानच आहे. ॥ ५७ ॥ " अयमात्मा ब्रह्म " या महावाक्याचा अर्थ चांगला विचारपूर्वक केला असतां, ब्रह्माचें प्रत्यक्ष ज्ञान होतें. ज्याप्रमाणें " दहावा तूं आहेस " या वाक्याचा विचारपूर्वक अर्थ केल्यानें मीच दहावा असें अपरोक्षज्ञान झालें त्याप्रमाणें समजावें. ॥ ५८ ॥ वाक्याचा विचारपूर्वक अर्थ म्हणून सांगितला. तो असा कीं, " दहावा आहे " असें जें तुम्ही म्हणतां तो कोण ? असा प्रश्न आप्तास केल्यावर आप्त म्हणतो कीं, " तूंच दहावा " तें उत्तर ऐकून आपणासहवर्तमान बाकीच्या नवांस मोजून पाहून मीच दहावा असें त्याला स्मरलें. ॥ ५९ ॥ जेथें विचारपूर्वक अर्थ केल्यापासून मीच दहावा असें जें ज्ञान झालें तें आदि मध्य अवसानीं अप्रतिहत राहतें " मी दहावा होय कीं नाहीं हा संशय मुळींच राहत नाहीं. ॥ ६० ॥ त्याप्रमाणें " सदेव " इत्यादिक श्रुतिवाक्यानें ब्रह्म आहे असें परोक्षज्ञान झाल्यावर तत्त्वमस्यादि महावाक्यांचा विचारपूर्वक अर्थ केला तें ब्रह्म मी आहें असा साक्षात्कार होईल. ॥६१॥ दृष्टांताप्रमाणें येथेंही महावाक्यापासून झालेलें " मी ब्रह्म " असें जें ज्ञान त्याला आदि मध्य अवसानीं कोणताही व्यभिचार येत नाहीं, म्हणून महावाक्यापासून अपरोक्ष ज्ञान होतें हें सिद्ध. ॥ ६२ ॥ याप्रमाणें प्रथमतः परोक्षज्ञान होऊन मग

---

रंशस्यापि सांशत्वं व्यावर्त्यांशविभेदतः ॥ ५५ ॥ असत्त्वांशोनिवर्तेत परोक्षज्ञानतस्तथा ॥ अभानांशानिवृत्तिः स्यादपरोक्षधिया कृता ॥ ५६ ॥ दशमोऽस्तीति विभ्रांतं परोक्षज्ञानमीक्ष्यते ॥ ब्रह्मास्तीत्यपि तद्वत्स्यादज्ञानावरणं समम् ॥५७॥ आत्मा ब्रह्मेति वाक्यार्थे निःशेषेण विचारिते॥ व्यक्तिरुल्लिख्यते यद्वत् दशमस्त्वमसीत्यतः ।५८॥ दशमः क इति प्रश्ने त्वमेवेति निराकृते॥ गणयित्वा स्वेनसह स्वमेव दशमं स्मरेत्॥ ५९॥ दशमोऽस्मीति वाक्योत्था न धीरस्य विहन्यते ॥ आदिमध्यावसानेषु न नवस्वस्य संशयः॥६०॥ सदेवेत्यादिवाक्येन ब्रह्मसत्त्वं परोक्षतः ॥ गृहीत्वा तत्त्वमस्यादि वाक्याद्व्यक्तिं समुल्लिखेत् ॥ ६१ ॥ आदिमध्यावसानेषु स्वस्य ब्रह्मत्वधीरियम् ॥ नैव व्यभिचरेत्तस्मादापरोक्ष्यं प्रतिष्ठितम् ॥ ॥ ६२ ॥ जन्मादिकारणत्वाख्यलक्षणेन भृगुः पुरा ॥ पारोक्ष्येण

पुढें महावाक्याचा विचारपूर्वक अर्थ केल्यानें साक्षात्कार होतो. याचा अनुभव कोणाला आला असें कोणी विचारील तर त्याविषयीं श्रुतींतच सांगितलें आहे. कोणीएक भृगुनामक ऋषि होता त्याणें " यतो वा इमानि भूतानि जायंते " इत्यादिक बापानें सांगितलेलीं वाक्यें ऐकून ब्रह्म सर्व जगाचें कारण आहे असें परोक्ष जाणून पुढें पंचकोशविवेक केल्यानें " तें ब्रह्म मी आहें " असा साक्षात्कार त्यास झाला. ॥६३॥ जरी येथें " तूं ब्रह्म आहेस " असा भृगूच्या बापानें त्याला उपदेश केला नाहीं, तरी अन्नमयादि कोशांच्या विवेकेंकरून विचार करण्यास योग्य असें स्थळ त्याणें दाखवून दिलें. ॥६४॥ अन्नमयादि कोशांचा पुनः पुनः विचार करून शेवटच्या कोशीं आपण आनंदमय आहें, असें समजून, तो आपल्याठायीं ब्रह्माच्या लक्षणांची योजना करिता झाला. ॥ ६५ ॥ " सत्यं ज्ञानमनंतं " असें ब्रह्माचें लक्षण पूर्वीं सांगून कोशरूप गुहेंत असणारें ब्रह्म त्याणें शिष्यास दाखविलें. ॥ ६६ ॥ त्याचप्रमाणें छांदोग्य श्रुतींत दुसरें एक उदाहरण आहे. इंद्राला जेव्हां मोक्षाची इच्छा झाली तेव्हां " य आत्मापहत " या श्रुतीनें ब्रह्म परोक्षत्वेंकरून जाणून त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याकरितां चारदां गुरूकडे तो गेला. ॥ ६७ ॥ " आत्मा वा इदं " इत्यादि श्रुतीनें परोक्ष ब्रह्म दाखवून, अध्यारोप आणि अपवाद या दोहोंचे योगानें " प्रज्ञानं ब्रह्म " या महावाक्यद्वारा प्रज्ञानरूप जो आत्मा तोच ब्रह्म असें दाखविलें. ॥ ६८ ॥ श्रुतीमध्यें जीं महावाक्यें आहेत तीं मात्र अपरोक्ष ज्ञानाला कारण आहेत. बाकी सर्व ब्रह्माचें लक्षण सांगणारीं जीं वाक्यें त्यांपासून परोक्षज्ञान मात्र होतें. ॥ ६९ ॥ महावाक्यापासून ब्रह्माचें अपरोक्षज्ञान होतें हें सांगणें आमचें पदरचें नव्हे. ही गोष्ट शंकराचार्यांनीं वाक्यवृत्ति ग्रंथांत सांगितली आहे. म्हणून एतद्विषयीं संशय घेणें नको. ॥ ७० ॥ तेथें आचार्यांनीं त्वंपदाचा असा अर्थ केला आहे कीं, जो " मी " या ज्ञानाला आणि " मी " या शब्दाला विषय होऊन प्रकाशणारा असा अंतःकरणाचा जो साक्षी बोधरूप

---

गृहीत्वाऽथ विचाराद्व्यक्तिमैक्षत ॥ ६३ ॥ यद्यपि त्वमसीत्यत्र वाक्यं नोचे भृगोः पिता ॥ तथाप्यन्नं प्राणमिति विचार्य स्थलमुक्तवान् ॥ ६४ ॥ अन्नप्राणादिकोशेषु सुविचार्य पुनः पुनः ॥ आनंदव्यक्तिमीक्षित्वा ब्रह्मलक्ष्माप्ययूयुजत् ॥ ६५ ॥ सत्यं ज्ञानमनंतं चेत्येवं ब्रह्मस्वलक्षणम् ॥ उक्त्वा गुहाहितत्वेन कोशेष्वेतत्प्रदर्शितम् ॥ ६६ ॥ पारोक्ष्येण विबुध्येंद्रो य आत्मेत्यादिलक्षणात् ॥ अपरोक्षीकर्तुमिच्छंश्चतुर्वारं गुरुं ययौ ॥ ६७ ॥ आत्मा वा इदमित्यादौ परोक्षं ब्रह्म लक्षितं ॥ अध्यारोपापवादाभ्यां प्रज्ञानं ब्रह्म दर्शितम् ॥ ६८ ॥ अवांतरेण वाक्येन परोक्षा ब्रह्मधीर्भवेत् ॥ सर्वत्रैव महावाक्यविचारादपरोक्षधीः ॥ ६९ ॥ ब्रह्मापरोक्ष्यसिध्यर्थं महावाक्यमितीरितम् ॥ वाक्यवृत्तावतो ब्रह्मापरोक्ष्ये विमातिर्नहि ॥७०॥ आलंबनतया भाति योऽस्मत्प्रत्ययशब्दयोः ॥

आत्मा त्यालाच त्वं असें म्हणतात. ॥ ७१ ॥ माया आहे उपाधि ज्याला, जो जगाची योनि ह्मणजे कारण, सर्वज्ञत्वादि कारणेंकरून जो युक्त, आणि जो परोक्षत्व धर्मयुक्त आणि सत्य-ज्ञानानंतरूप, जो कोणी आहे त्यास तत् असें म्हणतात. ॥७२॥ एकाच वस्तूस परोक्षता आणि अपरोक्षता तसेंच सद्वितीयता आणि पूर्णता हीं असणें हें विरुद्ध आहे, याकरितां त्या विरोधाचे परिहारार्थ लक्षणावृत्ति म्हणोन जी वाक्यार्थ करण्याची रीत आहे ती येथें घेतली पाहिजे. ॥ ७३ ॥ तत्त्वमस्यादि वाक्यांचेठायीं जी लक्षणावृत्ति घ्यावयाची ती भागत्यागलक्षणा घेतली पाहिजे. दुसरी नाहीं. भागत्यागलक्षणा ह्मणजे काय, तें येथें सांगितलें पाहिजे. लक्षणेचे प्रकार तीन आहेत. जहत्, अजहत् आणि जहद्जहत्. त्यांपैकीं तिसरी येथें घेतली पाहिजे. त्यास उदाहरण " सोऽयं देवदत्तः " याचा अर्थ काल पुण्यांत धोतर पांघरून आलेला जो देवदत्त भट तोच हा शालजोडी पांघरलेला आज येथें आला आहे. ॥७४॥ " गाय आण " या वाक्यांत लक्षणावृत्तीवांचून संबंधानें स्पष्टार्थ होतो. यास संसर्गार्थ म्हणतात. आणि " नीलोत्पलं " या वाक्यांतही निळें कमळ असा अर्थ स्पष्ट होतो. यास विशिष्टार्थ म्हणतात. तशी महावाक्याची गोष्ट नाहीं. त्याचा अर्थ करितांना ब्रह्माचें अखंडैकरसत्व सिद्ध झालें पाहिजे. असाच अर्थ सर्व विद्वानांस मान्य आहे. ॥७५॥ बुद्ध्यादिकांचा साक्षी जो प्रत्यग्बोध अहंबुद्धीस विषय भासतो, तो अद्वयानंदरूप आहे. आणि जो अद्वयानंदरूप परमात्मा, तो प्रत्यग्बोधरूप साक्षी आहे. ॥ ७६ ॥ असें एकमेकांचें ऐक्य जेव्हां सिद्ध होईल, तेव्हां त्वंपदवाच्य जीव ब्रह्म नव्हेसें जें वाटतें, तें वाटणें नाहींसें होतें. ॥ ७७ ॥ आणि तत् पदाची परोक्षता, ही तत्काल नाहींशी होते. असें झालें असतां पूर्णानंद स्वरूपी प्रत्यग्बोध साक्षीच केवळ रहातो. ॥ ७८ ॥ असें असून महावाक्यापासून अपरोक्ष ज्ञानच होत नाहीं असें जे ह्मणतात

---

अंतःकरणसंभिन्नबोधः स त्वंपदाभिधः ॥ ७१ ॥ मायोपाधिर्जगद्योनिः सर्वज्ञत्वादिलक्षणः ॥ पारोक्ष्यशबलः सत्याद्यात्मकस्तत्पदाभिधः ॥ ७२ ॥ प्रत्यक्परोक्षतैकस्य सद्वितीयत्वपूर्णता ॥ विरुध्येते यतस्तस्माल्लक्षणा संप्रवर्तते ॥ ७३ ॥ तत्त्वमस्यादिवाक्येषु लक्षणा भागलक्षणा ॥ सोऽयमित्यादिवाक्यस्थपदयोरिव नापरा ॥ ७४ ॥ संसर्गो वा विशिष्टो वा वाक्यार्थो नात्र संमतः ॥ अखंडैकरसत्वेन वाक्यार्थो विदुषां मतः ॥ ७५ ॥ प्रत्यग्बोधो य आभाति सोऽद्वयानंदलक्षणः ॥ अद्वयानंदरूपश्च प्रत्यग्बोधैकलक्षणः ॥ ७६ ॥ इत्थमन्योन्यतादात्म्यप्रतिपत्तिर्यदा भवेत् ॥ अब्रह्मत्वं त्वमर्थस्य व्यावर्तेत तदैव हि ॥ ७७ ॥ तदर्थस्य च पारोक्ष्यं यदेवं किं ततः शृणु ॥ पूर्णानंदैकरूपेण प्रत्यग्बोधोऽवतिष्ठते ॥ ७८ ॥ एवं सति महावाक्यात्परोक्षज्ञानमीर्यते ॥ यैस्ते-

त्यांचें शास्त्रसिद्धांतज्ञान कोठवर वर्णावें. ॥ ७९ ॥ तूर्त शास्त्रसिद्धांत असो दे. परंतु युक्तीनें नर पाहिलें तर कोणत्याही वाक्यापासून परोक्षच ज्ञान होतें असें ठरतें. कारण, स्वर्गप्रतिपादक सर्व वाक्यें परोक्षज्ञानच देणारीं आहेत, असें कोणी ह्मणेल तर " तूं दशम आहेस " या वाक्यांत या नियमास व्यभिचार येतो. कारण, या वाक्यानें अपरोक्षज्ञानही होतें. ॥ ८० ॥ स्वतः जो अपरोक्ष जीव आहे आणि तोच ब्रह्म होऊं इच्छिल्यानें त्याचें जें मूळचें अपरोक्षत्व तेंही नाहींसें होतें ही कल्पना मोठीच ह्मणावयाची ! ॥ ८१ ॥ एकून " वृद्धिमिष्टवतो मूलमपि नष्टं " हीं जी लोकांत म्हण आहे तिचें सार्थक्य तूं आज केलेंस ही मोठी कृपाच समजावयाची. ( व्याज इच्छिणाराचें मुद्दलही गमावलें. ) ॥ ८२ ॥ याजवर असा एक पूर्वपक्ष आहे कीं, हा बोध अंतःकरणविशिष्ट साक्षी जो जीव त्याच्या स्वरूपाचें अपरोक्षज्ञान होणें योग्य आहे. कारण तेथें उपाधि आहे. परंतु ब्रह्मास तशी मुळींच उपाधि नाहीं, तेव्हां त्याचें अपरोक्षज्ञान कसें व्हावें? ॥ ८३ ॥ तर तशी कांहीं शंका घ्यावयास नको. ब्रह्माला ही उपाधि आहेच. कारण, उपाधि विदेहकैवल्यापर्यंत ( ह्मणजे जीवन्मुक्ताच्या देहपातापर्यंत ) जात नाहीं. ॥ ८४ ॥ अंतःकरणासहवर्तमान असणें ही जशी जीवाची उपाधि तशीच अंतःकरणाविरहीत असणें ही ब्रह्माची उपाधि आहे. ॥ ८५ ॥ पहिली आहेपणाची उपाधि आहे आणि दुसरी नाहींपणाची आहे; एवढाच काय तो भेद. विधि उपाधि झाल्यानंतर मग निषेध उपाधि कां नव्हे ? एक सोन्याची शृंखला झाली आणि दुसरी लोखंडाची; म्हणून शृंखला कोठें जाईल. उपाधीचें लक्षण हेंच कीं, कार्य असेपर्यंत असणाऱ्या भेदाचें जें कारण तीच उपाधि. ॥ ८६ ॥ आचार्यांनीं असें सांगितलें आहे कीं, वेदांतांत ब्रह्माचें जें वर्णन केलें आहे तें कांहीं ठिकाणीं विधिमुखानें व कांहीं ठिकाणीं निषेधमुखानें केलें आहे. ह्मणजे " सत्यंज्ञानमनंतं ब्रह्म " इत्यादिक श्रुतीनें ब्रह्म अशा अशा प्रकारचें आहे म्हणून सांगितलें आहे आणि

---

षां शास्त्रसिद्धांतविज्ञानं शोभतेतरां ॥ ७९ ॥ आस्तां शास्त्रस्य सिद्धांतो युक्त्या वाक्यात्परोक्षधीः ॥ स्वर्गादिवाक्यवन्नैवं दशमे व्यभिचारतः ॥ ८० ॥ स्वतोऽपरोक्षजीवस्य ब्रह्मत्वमभिवांछतः ॥ नश्येत्सिद्धापरोक्ष्यत्वमिति युक्तिर्महत्यहो ॥ ८१ ॥ वृद्धिमिष्टवतो मूलमपि नष्टमितीदृशं ॥ लौकिकं वचनं सार्थं संपन्नं त्वत्प्रसादतः ॥ ८२ ॥ अंतःकरणसंभिन्नबोधो जीवोऽपरोक्षताम् ॥ अर्हत्युपाधिसद्भावान्न तु ब्रह्मानुपाधितः ॥८३॥ नैवं ब्रह्मत्वबोधस्य सोपाधिविषयत्वतः ॥ यावद्विदेहकैवल्यमुपाधेरनिवारणात् ॥ ८४ ॥ अंतःकरणसाहित्यराहित्याभ्यां विशिष्यते ॥ उपाधिर्जीवभावस्य ब्रह्मतायाश्च नान्यथा ॥ ८५ ॥ यथा विधिरुपाधिः स्यात्प्रतिषेधस्तथा न किम् ॥ सुवर्णलोहभेदेन शृंखलात्वं न भिद्यते ॥ ८६ ॥ अतद्व्यावृत्तिरूपेण साक्षाद्विधिमुखेन च ॥ वेदां-

कोठें कोठें " नेति नेति " इत्यादिक श्रुतीनें द्वैतांतील मिथ्या पदार्थांचें निरसन करून म्हणजे हें ब्रह्म नव्हे, हें ब्रह्म नव्हे, अशा रीतीनें त्याचें स्वरूप वर्णन केलें आहे. ॥ ८७ ॥ वर निषेधमुखानें ब्रह्मस्वरूप वर्णिलें आहे असें म्हटलें त्यावरून असा एक प्रश्न निघण्याजोगा आहे कीं, " अहं ब्रह्मास्मि " या वाक्यांत " अहं " शब्दाचाही " नेति नेति " या श्रुतीवरून त्याग करावा लागेल. मग मी ब्रह्म आहें असें सामानाधिकरण्यानें ऐक्यज्ञान कसें होईल ? तर त्याजवर आमचें उत्तर असें आहें कीं, तेथें " अहं " शब्दाचा सर्वांशीं त्याग होत नाहीं. जहदजहल्लक्षणेच्या योगानें केवळ त्यांतील जडांशाचा मात्र त्याग सांगितला आहे. कूटस्थाचा त्याग होत नाहीं. म्हणून " मी ब्रह्म आहें " असें ऐक्यज्ञान होण्यास प्रत्यवाय नाहीं. ॥ ८८ ॥ येथें अंतःकरणरूप उपाधीचा त्याग करून बाकी राहिलेल्या साक्षीचेठायीं अहं ब्रह्म या वाक्यानें ब्रह्मत्व सिद्ध होतें. ॥ ८९ ॥ येथें दुसरी अशी एक शंका आहे कीं, आत्मा स्वप्रकाश असून तो बुद्धीस कसा विषय होईल ? तर याचें समाधान असें कीं, आत्मा जरी स्वप्रकाश असला तरी बाकीच्या घटादि पदार्थांप्रमाणें तो बुद्धीनें व्याप्त होतो. आतां शास्त्रकारांनीं जें आत्म्याचें बुद्धिव्याप्यत्व निराकृत केलें ( मनोवृत्तीस विषय नाहीं असें जें म्हटलें ) त्याचा अभिप्राय असा कीं, चिदाभासाचा परिणाम त्याजवर विशेष घडत नाहीं. ॥ ९० ॥ कोणच्याही पदार्थाचें ज्ञान होतांना बुद्धि आणि तिजमधील प्रतिबिंबित चिदाभास हे दोन्हीही त्या पदार्थास व्यापतात. तेव्हां दोन्हींचीं निरनिराळीं कार्यें त्या पदार्थावर घडतात. बुद्धिव्याप्तीनें अज्ञानाचा नाश होतो. आभासानें पदार्थाचें स्फुरण होतें. म्हणजे तो अमुक असें भासतें. ॥ ९१ ॥ ब्रह्मज्ञान होतांनाही असाच प्रकार घडतो. परंतु येथें अज्ञानाचा नाश होण्याची मात्र गरज आहे. स्फुरणाची गरज नाहीं. कारण तें स्वतः स्फुरणरूप आहे. याकरितां बुद्धिव्याप्तीचा मात्र येथें उपयोग होतो. परंतु चिदाभासाचा जो विशेष उपयोग तो येथें होत नाहीं, हें पुढील दृष्टांतावरून चांगलें ध्यानांत येईल. ॥ ९२ ॥ घटादिक पदार्थ पहाण्यास डोळा आणि दिवा हीं दोन साधनें अवश्य आहेत. परंतु केवळ दिवाच पहावयाचा असेल तर, एक डोळ्याचें साधनच बस्स आहे. आणखी दुसऱ्याची

---

तानां प्रवृत्तिः स्याद्द्विधेत्याचार्यभाषितम् ॥ ८७ ॥ अहमर्थपरित्यागादहं ब्रह्मेति धीः कुतः ॥ नैवमंशस्य हि त्यागो भागलक्षणयोदितः ॥ ८८ ॥ अंतःकरणसंत्यागादवशिष्टे चिदात्मनि ॥ अहं ब्रह्मेति वाक्येन ब्रह्मत्वं साक्षिणीक्ष्यते ॥ ८९ ॥ स्वप्रकाशोऽपि साक्ष्येव धीवृत्त्या व्याप्यतेऽन्यवत् ॥ फलव्याप्यत्वमेवास्य शास्त्रकृद्भिर्निवारितम् ॥९०॥ बुद्धितत्स्थचिदाभासौ द्वावपि व्याप्नुतो घटम् ॥ तत्राज्ञानं धिया नश्येदाभासेन घटः स्फुरेत् ॥९१॥ ब्रह्मण्यज्ञाननाशाय वृत्तिव्याप्तिरपेक्षिता ॥ स्वयंस्फुरणरूपत्वान्नाभास उपयुज्यते ॥ ९२ ॥ चक्षुर्दीपावपेक्ष्येते घटादेर्दर्शने यथा ॥

गरज नाहीं. ॥ ९३ ॥ त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान होतांना चिदाभास जरी असला तरी त्याचा विशेष परिणाम ब्रह्मावर घडत नाहीं. सूर्यप्रकाशांत दिव्याचा प्रकाश जसा लीन होतो, त्याप्रमाणें तो चिदाभास ब्रह्माचे ठायीं लीन होतो. ॥ ९४ ॥ " अप्रमेयमनादिं च " इत्यादि श्रुतिवाक्यांचा अभिप्राय हाच कीं, चिदाभासाचा परिणाम ब्रह्मावर मुळींच घडत नाहीं. " आणि मनसैवेदमाप्तव्यं इत्यादिक श्रुतिवाक्यांवरून बुद्धिव्याप्तीची अपेक्षा आहे असा अभिप्राय निघतो. ॥ ९५ ॥ " आत्मानंचेत् विजानीयात् अयमस्मीति पूरुषः " या वाक्यावरून, सत्यादि लक्षण जें ब्रह्म तें विषय करून " मी ब्रह्म आहें " असा जो बोध, तो येथें सांगितला. ॥ ९६ ॥ महावाक्यापासून जरी एकदां अपरोक्ष ज्ञान झालें तरी तें व्हावें तसें बळकट होत नाहीं. म्हणून श्रवणमननादिकांचा अभ्यास, तें ज्ञान घट्ट होईपर्यंत केला पाहिजे. असें आचार्यांनीं म्हटलें आहे. ॥ ९७ ॥ त्यांणीं असें म्हटलें आहे कीं, " अहं ब्रह्मास्मि " या महावाक्यापासून होणारें ज्ञान अगदीं दृढ होईपर्यंत शमदमादि साधनसंपन्न होऊन मुमुक्षूनें श्रवणादिकांचा अभ्यास करावा. ॥ ९८ ॥ याजवर कोणी अशी शंका घेईल कीं, महावाक्यापासून अपरोक्ष ज्ञान होतें असें तुह्मी ह्मणतां, मग तें दृढ नाहीं असें कसें होईल ? तर त्याजवर आमचें उत्तर असें आहे कीं, जरी वाक्यापासून ज्ञान झालें तरी तें डळमळीत असण्यास पुष्कळ कारणें आहेत. एक तर श्रुति निरनिराळ्या असतात. दुसरें जाणण्याचा विषय नेहमींच्या रूढींतला नसल्यामुळें तो एकदां समजला तरी पुनः पुनः संशय येतो. तसेंच मी कर्ता व भोक्ता अशा विपरीत भावना वारंवार मनांत उठतात. या प्रकारचींच आणखी दुसरीं कारणें आहेत. ह्मणून श्रवणादिकांचा अभ्यास केलाच पाहिजे. ॥ ९९॥ ज्याप्रमाणें वेदशाखा व कर्मकर्त्यांची कामना भिन्न भिन्न असल्यामुळें वेदामध्यें कर्मेंही निरनिराळीं झालीं आहेत, त्याप्रमाणें उपनिषदांतही निरनिराळीं दिसण्यांत विरुद्ध वाक्यें पाहून मुमुक्षूस भेदशंका

---

न दीपदर्शने किंतु चक्षुरेकमपेक्ष्यते ॥ ९३ ॥ स्थितोऽप्यसौ चिदाभासो ब्रह्मण्येकीभवेत्परं ॥ न तु ब्रह्मण्यतिशयं फलं कुर्याद्घटादिवत् ॥ ९४ ॥ अप्रमेयमनादिं चेत्यत्र श्रुत्येदमीरितं ॥ मनसैवेदमाप्तव्यमिति धीव्याप्यताश्रुता ॥ ९५ ॥ आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति वाक्यतः ॥ ब्रह्मात्मव्यक्तिमुल्लिख्य यो बोधः सोऽभिधीयते ॥९६॥ अस्तु बोधोऽपरोक्षोऽत्र महावाक्यात्तथाऽप्यसौ ॥ न दृढः श्रवणादीनामाचार्यैःपुनरीरणात् ॥ ९७ ॥ अहं ब्रह्मेतिवाक्यार्थबोधो यावद्दृढीभवेत् ॥ शमादिसहितस्तावदभ्यसेच्छ्रवणादिकम् ॥ ९८ ॥ बाढं संति ह्यदार्ढ्यस्य हेतवः श्रुत्यनेकता ॥ असंभाव्यत्वमर्थस्य विपरीता च भावना ॥ ९९ ॥ शाखाभेदात्कामभेदाच्छ्रुतं कर्मान्यथान्यथा ॥ एवमत्रापि मा शं-

येईल. तिचें निवारण व्हावें ह्मणून श्रवणाची जरूर आहे. ॥ १०० ॥ सर्व वेदांतांतील वाक्यांचें पर्यवसान ब्रह्मरूप जो प्रत्यगात्मा त्यावरच आहे. असा जो बुद्धीचा निश्चय होणें, त्यालाच श्रवण असें ह्मणतात. ॥ १ ॥ हें श्रवण व्यासांनीं शारीर भाष्याच्या पहिल्या समन्वय अध्यायांत सांगितलें आहे. आणि दुसरे अध्यायांत मनाचें समाधान करणाऱ्या नानाप्रकारच्या तर्कयुक्ति सांगून अर्थसंभावनारूप मनन सांगितलें आहे. ॥ २ ॥ अनेक जन्मांच्या दृढाभ्यासानें देहादिकांचेठायीं पुनः पुनः अहंबुद्धि आणि जगाविषयीं सत्यत्व बुद्धि होते. हीच विपरीत भावना. ॥ ३ ॥ मनाचें ऐकाग्र्य केल्यानें ही विपरीत भावना नाहींशी होते. तें ऐकाग्र्य तत्त्वोपदेशापूर्वींच सगुणब्रह्मोपासनेनें होतें. ॥ ४ ॥ वेदांत व शास्त्रांत उपासनेचा विचार सांगितला आहे. पूर्वी ज्यांणीं ऐकाग्र्याचा अभ्यास केला नाहीं त्यांना तें मागून ब्रह्माभ्यासाच्या योगानें प्राप्त होतें. ॥ ५ ॥ सर्वदां ब्रह्मतत्त्वाचेंच चिंतन, त्याचेंच कथन, त्याचाच परस्परांस बोध, व त्यावांचून दूसरा विषयच नाहीं, असा जो अभ्यास त्यास ब्रह्माभ्यास ह्मणतात. ॥ ६ ॥ श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, त्या आत्म्याचें ज्ञान झाल्यावर धीर मुमुक्षूनें तेंच तत्त्व बुद्धींत ठसवावें. बहु शब्दजल्पनानें वाणीला शिण मात्र होतो. ह्मणून फार बोलूं नये. ॥ ७ ॥ ' जे लोक अनन्यभावेंकरून माझ्या स्वरूपाचें ध्यान करून माझी उपासना करितात, त्या भक्तांचा सतत योगक्षेम मी चालवितों ' या गीतावाक्याचेंही तात्पर्य हेंच आहे. ॥ ८ ॥ याप्रमाणें श्रुतिस्मृतीमध्यें विपरीतभावनानिवृत्त्यर्थ आत्म्याचेठायीं चित्ताची एकाग्रता सांगितली आहे. ॥ ९ ॥ जी वस्तु जशी आहे तशी न समजतां अन्य प्रकारें समजणें, यालाच विपरीत भावना ह्मणतात. उदाहरण, बाप, आई, बंधु इत्यादिकांस शत्रुबुद्धीनें पाहणें ही वि-

---

कीत्यतः श्रवणमाचरेत् ॥ १०० ॥ वेदांतानामशेषाणामादिमध्यावसानतः ॥ ब्रह्मात्मन्येव तात्पर्यमिती धीः श्रवणं भवेत् ॥ १ ॥ समन्वयाध्याय एतत्सूक्तं धीस्वास्थ्यकारिभिः ॥ तर्कैः संभावनाऽर्थस्य द्वितीयाध्याय ईरिता ॥ २ ॥ बहुजन्मदृढाभ्यासाद्देहादिष्वात्मधीः क्षणात् ॥ पुनः पुनरुदेत्येवं जगत्सत्यत्वधीरपि ॥३॥ विपरीता भावनेयमैकाग्र्यात्सा निवर्तते ॥ तत्त्वोपदेशात्प्रागेव भवत्येतदुपासनात् ॥ ४ ॥ उपास्तयो ऽत एवात्र ब्रह्मशास्त्रेऽपि चिंतिताः ॥ प्रागनभ्यासिनः पश्चाद्ब्रह्माभ्यासेन तद्भवेत् ॥ ५ ॥ तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥ एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥ ६ ॥ तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः ॥ नानुध्यायाद्बहूंश्च्छब्दान्वाचो विग्लापनं हि तत् ॥७॥ अनन्याश्चितयंतो मां ये जनाः पर्युपासते ॥ तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥८॥ इतिश्रुतिस्मृती नित्यमात्मन्येकाग्रतां धियः ॥ विधत्तो विपरीताया भावनायाः क्षयाय हि ॥ ९ ॥

परीत भावना आहे. ॥ ११० ॥ हें विपरीत भावनेचें लक्षण प्रकृत विषयास बरोबर लागू पडतें. आत्मा देहादिकांपासून भिन्न व जग मिथ्या असून, देहच आत्मा, आणि जग सत्य, असें आह्मी विपरीत मानतों. ॥ ११ ॥ ही विपरीत भावना खऱ्या तत्त्वाच्या भावनेच्या योगानें नाश पावते. वास्तव आत्मा देहाहून भिन्न आहे व जग मिथ्या आहे या गोष्टीचा मनामध्यें निरंतर खल करावा. ॥ १२ ॥ याजवर असा एक प्रश्न आहे कीं, देहापासून आत्म्याचें भिन्नत्व आणि जगाचें मिथ्यात्व या खऱ्या तत्त्वाची भावना करावी ह्मणून वर सांगितलें. ही भावना काम, जप, मंत्र, किंवा मूर्तिध्यानाप्रमाणें नियमानें केली पाहिजे, कीं कशीही केली तरी चालेल ? ॥ १३ ॥ उत्तर. यास नियमाची गरज नाहीं, कारण भोजनाप्रमाणें त्या भावनेचें फळ प्रत्यक्ष आहे. जपाप्रमाणें भोजनांत नियम कोणीही राखीत नाहीं. ॥ १४ ॥ मनुष्य भूक असेल तर जेवतो, नसेल तर जेवीत नाहीं. कदाचित् जेवला तरी अमुकच नियम धरून तो जेवतो असें नाहीं. कोणत्याही प्रकारें तो आपल्या क्षुधेचें निवारण करितो. नियम परलोकाकरितां आहेत. क्षुधा घालविण्यास त्याची गरज नाहीं. ॥ १५ ॥ परंतु जपाचा प्रकार तसा नाहीं, तो नियमानेंच केला पाहिजे. तसा न केल्यास प्रत्यवाय आहे. आणि भलत्या रीतीनें केल्यास स्वरवर्णांचा विपर्यय होऊन त्यापासून अनर्थप्राप्ति होते. ॥१६॥ वर सांगितलेली विपरीत भावना क्षुधेप्रमाणें प्रत्यक्ष बाधा करणारी आहे. ह्मणून तिच्या अनुष्ठानाला अमुकच क्रम नाहीं. कोणत्याही उपायेंकरून तिचा नाश केला ह्मणजे झालें. ॥ १७ ॥ जो उपाय आह्मीं सर्वदा आत्मचिंतन कथनरूप पूर्वींच सांगितला आहे, तदेकपरत्व ह्मणून आह्मीं ब्रह्माभ्यासांत सांगितलें त्याला ध्यानासारखा निर्बंध नाहीं.

---

यद्यथा वर्तते तस्य तत्त्वं हित्वाऽन्यथात्वधीः ॥ विपरीता भावना स्यात्पित्रादावरिधीर्यथा ॥ १० ॥ आत्मा देहादिभिन्नोऽयं मिथ्या चेदं जगत् तयोः ॥ देहाद्यात्मत्वसत्यत्वधीर्विपर्ययभावना ॥ ११ ॥ तत्त्वभावनया नश्येत्साऽतो देहातिरिक्तताम् ॥ आत्मनो भावयेत्तद्वन्मिथ्यात्वं जगतोऽनिशम् ॥ १२ ॥ किं मंत्रजपवन्मूर्त्तिध्यानवद्वाऽऽत्मभेदधीः ॥ जगन्मिथ्यात्वधीश्चात्र व्यावर्त्या स्यादुतान्यथा ॥ १३ ॥ अन्यथेति विजानीहि दृष्टार्थत्वेन भुक्तिवत् ॥ बुभुक्षुर्जपवद्भुंक्ते न कश्चिन्नियतः क्वचित् ॥ १४ ॥ अश्नाति वा न वाऽश्नाति भुंक्ते वा स्वेच्छयाऽन्यथा ॥ येन केन प्रकारेण क्षुधामपनिनीषति ॥ १५ ॥ नियमेन जपं कुर्यादकृतौ प्रत्यवायतः ॥ अन्यथाकरणेऽनर्थः स्वरवर्णविपर्ययात् ॥ १६ ॥ क्षुधेव दृष्टबाधाकृद्विपरीता च भावना ॥ जेया केनाप्युपायेन नास्त्यत्रानुष्ठितेः क्रमः ॥ १७ ॥ उपायः पूर्वमेवोक्तस्तच्चिंताकथनादिकः ॥ ए-

॥ १८ ॥ दुसरी कोणतीही कल्पना मध्यें आड न येतां एक सारखी एकाच मूर्तीची जी भावना तिला ध्यान ह्मणतात. मन अतिशय चंचल असल्यामुळें ध्यानाला निर्बंध अवश्य आहे. ॥ १९ ॥ मनाच्या चंचलतेविषयीं गीतेंत अर्जुनानें असें म्हटलें आहे कीं, हे कृष्णा, हें मन इतकें चंचल, हट्टी व ओढ घेणारें आहे कीं, त्याचा निग्रह मला वायुनिग्रहाप्रमाणें कठिण वाटतो. ॥ १२० ॥ एखाद्या वेळीं समुद्र प्राशन करतां येईल, मेरुपर्वत उपटून टाकितां येईल, व एकाद्या वेळीं अग्नि सुद्धां सेवन करतां येईल, पण चित्तनिग्रह असाध्य आहे असें वसिष्ठ ह्मणतात. ॥ २१ ॥ परंतु कथनादिकांचा जो अभ्यास सांगितला त्यामध्यें शृंखलाबद्ध देहाप्रमाणें अटकाव कोणाचाच नाहीं. इतकेंच नव्हे, तर नानातऱ्हेच्या पुराणांतील मनोरंजक कथा ऐकून मनाला उलटी मौज वाटते. ॥ २२ ॥ सर्व इतिहासांचें तात्पर्य आत्मा सत्य आणि जग मिथ्या, या दोन गोष्टींवर ठेवून कथनादिकांचा अभ्यास केल्यानें इतिहासादिकांच्या योगानें निदिध्यासाला विक्षेप येईल अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. ॥ २३ ॥ परंतु कृषिवाणिज्यसेवा इत्यादिक ज्या प्रपंचांतील क्रिया, व अलंकारशास्त्राचा व तर्कशास्त्राचा अभ्यास करण्याचे योगानें मात्र बुद्धीस विक्षेप होतो. कारण, तेथें तत्त्वाची विस्मृति होण्याचा संभव आहे. ॥ २४ ॥ एवढ्यावरून ह्मणजे भोजनादिकांचा देखील त्याग करावा, असें कांहीं नाहीं. कारण, आह्माला भोजन करितां करितां देखील आत्म्याचें अनुसंधान ठेवतां येतें. कदाचित् तेवढ्या काळापुरता जरी विक्षेप झाला, तरी पुनः तत्त्वस्मृतीचा संभव असल्यामुळें तेथें अत्यंत विक्षेपाची भीति मुळींच नाहीं ॥ २५ ॥ विपरीत भावनेपेक्षां सिद्धांताचें विस्मरण हजार वांट्यानें बरें. कारण, त्यापासून अनर्थ होण्याची भीति नाहीं. अनर्थ करणारी काय ती विपरीत भावना. ती होण्यास तेथें मुळींच अवकाश नाहीं. कारण मुमुक्षूला तत्त्वाचें स्मरण लागलेंच

---

तदेकपरत्वेऽपि निर्बंधो ध्यानवन्न हि ॥ १८ ॥ मूर्तिप्रत्ययसांतत्यमन्यानंतरितं धियः ॥ ध्यानं तत्रातिनिर्बंधो मनसश्चंचलात्मनः ॥ १९ ॥ चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ॥ तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ २० ॥ अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि ॥ अपि वन्ह्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः ॥ २१ ॥ कथनादौ न निर्बंधः शृंखलाबद्धदेहवत् ॥ किंत्वनंतेतिहासाद्यैर्विनोदो नाट्यवद्धियः ॥ २२ ॥ चिदेवात्मा जगन्मिथ्येत्यत्र पर्यवसायिता ॥ निदिध्यासनविक्षेपो नेतिहासादिभिर्भवेत् ॥ २३ ॥ कृषिवाणिज्यसेवादौ काव्यतर्कादिकेषु च ॥ विक्षिप्यते प्रवृत्त्या धीस्तैस्तत्त्वस्मृत्यसंभवात् ॥ २४ ॥ अनुसंदधतैवात्र भोजनादौ प्रवर्तितुम् ॥ शक्यतेऽत्यंतविक्षेपाभावादाशु पुनः स्मृतेः ॥ २५ ॥ तत्त्वविस्मृतिमात्रान्नानर्थः किंतु विपर्ययात् ॥ विपर्येतुं

होतें ॥ २६ ॥ पण काव्य तर्कोचा अभ्यास करणाऱ्या लोकांना तत्त्व आठवण्यास अवकाशच मिळत नाहीं. इतकेंच नव्हे तर तत्त्वाभ्यासाशीं त्यांचा विरोध असल्यामुळें त्यांजकडून त्याची उलटी हयगय होते ॥ २७ ॥ अध्यात्म विषयावांचून दुसऱ्या कोणत्याही शब्दाचा उच्चार करूं नये, असें श्रुतींत सांगितलें आहे. दुसऱ्याविषयीं संभाषण केल्यानें वाणीस शीण मात्र होतो असेंही एका ठिकाणीं सांगितलें आहे. ॥ २८ ॥ भोजनादिकांच्या त्यागाविषयीं इतका दुराग्रह तरी कां असावा. आहारादि टाकल्यानें मनुष्य वांचणार नाहीं. परंतु काव्य तर्कोची गोष्ट तशी नाहीं. त्यावांचून आमचें मुळींच आडत नाहीं. ॥ २९ ॥ एथें अशी कोणी शंका घेईल कीं, पुराणांतरीं जनकादिक तत्त्वज्ञांच्या ज्या कथा आह्मी ऐकितों, त्याजवरून ते राज्य करीत होते असें दिसतें. मग त्यांच्या अभ्यासांत विघ्न कसें आलें नाहीं ? तर याजवर आमचें असें उत्तर आहे कीं, आह्मीं जो अभ्यास वर सांगितला तो केवळ ज्ञानदार्ढ्याकरितां. जनकादिकांचें ज्ञान घट्टमुट्ट होतें. त्याप्रमाणें ज्यांस ज्ञान झालें असेल त्यांणीं हवां असल्यास शास्त्राभ्यास करावा, कृषिकर्म करावें, पाहिजे तें करावें. ॥ १३० ॥ ज्ञानदार्ढ्य होऊनही ( हा संसार खोटा आहे असें समजूनही ) ज्ञानाची प्रवृत्ति संसाराकडे जी होते ती केवळ प्रारब्धकर्मांच्या क्षयास्तव होते. आपापल्या कर्मास अनुसरून ते निमूटपणें संसार करितात. तेणेंकरून त्यांस क्लेश मुळींच होत नाहीं. ॥३१॥ संसाराच्या प्रवृत्तीस जर प्रारब्धकर्म कारण आहे तर त्याच कारणानें तत्त्वज्ञाच्या हातून अनाचाराचीं कृत्येंही घडतील अशी कोणी शंका घेईल तर आह्मी नाहीं कुठें म्हणतों? घडतील तर घडोत बापडीं. प्रारब्धकर्म टाळण्याचें ब्रह्मदेवाचेही हातीं नाहीं, मग आमची तुमची कथा काय ? ॥ ३२ ॥ ज्ञानी आणि अज्ञानी हे दोघेही प्रारब्धकर्म भोगण्याविषयीं सारखेच आहेत. ज्ञान्यास आंतून धैर्य असल्यामुळें क्लेश होत नाहीं. आणि मूढास, तें नसल्यामुळें तो होतो. इतकाच काय तो भेद. ॥ ३३ ॥ यास दृष्टांत

---

न कालोऽस्ति झटिति स्मरतः क्वचित् ॥ २६ ॥ तत्त्वस्मृतेरवसरो नास्त्यन्याभ्यासशालिनः ॥ प्रत्युताभ्यासघातित्वाद्बलात्तत्त्वमुपेक्ष्यते ॥ २७ ॥ तमेवैकं विजानीथ ह्यन्या वाचो विमुञ्चथ ॥ इति श्रुतं तथाऽन्यत्र वाचो विग्लापनं त्विति ॥ २८ ॥ आहारादि त्यजन्नैव जीवेच्छास्त्रांतरं त्यजन् ॥ किं न जीवसि येनैवं करोष्यत्र दुराग्रहम् ॥ २९ ॥ जनकादेः कथं राज्यमिति चेद्दृढबोधतः ॥ तथा तवापि चेत्तर्कं पठ यद्वा कृषिं कुरु ॥ ३० ॥ मिथ्यात्ववासनादार्ढ्ये प्रारब्धक्षयकांक्षया ॥ अक्लिश्यंतः प्रवर्तंते स्वस्वकर्मानुसारतः ॥ ३१ ॥ अतिप्रसंगो मा शंक्यः स्वकर्मवशवर्तिनाम् ॥ अस्तु वा केन शक्येत कर्म वारयितुं वद ॥ ३२ ॥ ज्ञानिनोऽज्ञानिनश्चात्र समे प्रारब्धकर्मणी ॥ न क्लेशो ज्ञानिनो धैर्यान्मूढः क्लिश्यत्यधैर्यतः ॥ ३३ ॥ मार्गे गंत्रोर्द्वयोः श्रांतो समा-

एका मार्गानें दोन प्रवासी जात असतां दोघांसही श्रम तितकाच. परंतु मार्गाची माहिती अ-सणारास जाईन असें धैर्य असल्यामुळें तो लवकर लवकर चालतो. व ज्यास माहिती नाहीं तो आतां कसें करूं ? ह्मणून रडत बसतो. ॥३४॥ ज्याला आत्म्याचा साक्षात्कार झाला आहे आणि त्याच्या मनांतील विपर्यय नाहींसा झाला आहे त्याच्याठायीं इच्छा करणाराही राहिला नाहीं आणि इच्छेला विषयही नाहीं. मग शरीरास संताप झाल्यानें याला जो संताप व्हावयाचा, तो कशानें होणार ? ॥ ३५ ॥ जगाचा खोटेपणा बुद्धीच्या ठायीं ठसला ह्मणजे काम्य आणि कामुक हे दोघेही नाहींसे झाले. मग अर्थातच, तेल नसलेल्या दिव्याप्रमाणें संताःपही नाहींसा होतो, ॥ ३६ ॥ गंधर्वपत्तन ह्मणून जो चमत्कार दिसतो, तें सर्व गारुड असें जाणून पाहणारा त्याचा अभिलाष करीत नाहीं. केवळ त्याचा अनादर करून हांसत बसतो. ॥ ३७ ॥ त्याप्रमाणें विचारी पुरुष केवळ डोळ्यांस मात्र रमणीय दिसणारे जे स्त्रीधनादिक विषय, ते खोटे असें मानून दोषबुद्धीनें त्यांचा त्याग करितो. ॥ ३८ ॥ वर दोषदृष्टि ह्मणून जी ह्मटली ती अशी. प्रथम द्रव्यामध्यें कोणकोणचे दोष आहेत ते पहा. द्रव्य मिळवण्यांत क्लेश—रक्षण करण्यांत क्लेश—त्याचा नाश झाला तरी क्लेश—आणि खर्च झाला तरी क्लेशच. तस्मात् हें दुःख देणारें जें द्रव्य त्यास धिक्कार असो. ॥ ३९ ॥ हे द्रव्याचे सोहळे झाले. आतां स्त्री पहा कैशी ती. स्त्री ह्मटली ह्मणजे एक हाड, मांस, स्नायु, ग्रंथी इत्यादिक पदार्थांची बनलेली पुतळीच आहे. तिच्या प्राणयंत्रानें चंचल दिसणाऱ्या शरीरांत काय सौंदर्य असेल तें असो. ॥ १४० ॥ इत्यादि वाक्यांनीं शास्त्राचे ठायीं जे दोष सांगितले आहेत, त्यांचें नित्य मनन करीत असल्यावर मनुष्य कसा बरें दुःखांत पडेल ! ॥ ४१ ॥ मनुष्य क्षुधेनें व्याकुळ झाला ह्मणून विष खाईल काय ? मग मिष्टान्नें खाऊन ज्याची तृप्ति झाली आहे असा

---

यामप्यदूरताम् ॥ जानन् धैर्याद् द्रुतं गच्छेदन्यस्तिष्ठति दीनधीः ॥ ३४ ॥ साक्षात्कृतात्मधीः सम्यगविपर्ययबाधितः ॥ किमिच्छन् कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ ३५ ॥ जगन्मिथ्यात्वधीभावादाक्षिप्तौ काम्यकामुकौ ॥ तयोरभावे संतापः शाम्येन्निःस्नेहदीपवत् ॥ ३६ ॥ गंधर्वपत्तने किंचिन्नैन्द्रजालिकनिर्मितम् ॥ जानन् कामयते किं तु जिहासति हसन्निदम् ॥ ३७ ॥ आपातरमणीयेषु भोगेष्वेवं विचारवान् ॥ नानुरज्यति किंत्वेतान् दोषदृष्ट्या जिहासति ॥ ३८ ॥ अर्थानामर्जने क्लेशस्तथैव परिपालने ॥ नाशे दुःखं व्यये दुःखं धिगर्थान् क्लेशकारिणः ॥ ३९ ॥ मांसपांचालिकायास्तु यंत्रलोलेऽङ्गपंजरे ॥ स्नाय्वस्थिग्रंथिशालिन्याः स्त्रियाः किमिव शोभनम् ॥ ४० ॥ एवमादिषु शास्त्रेषु दोषाः सम्यक् प्रपंचिताः ॥ विमृशन्ननिशं तानि कथं दुःखेषु मज्जति ॥ ॥ ४१ ॥ क्षुधया पीडयमानोऽपि न विषं ह्यत्तुमिच्छति ॥ मिष्टा-

विवेकी पुरुष तें खाणार नाहीं हें सांगावयालाच नको. ॥ ४२ ॥ प्रारब्ध कर्माच्या बलानें ज्ञान्यास भोगेच्छा होणार नाहीं असेंही नाहीं. परंतु जरी कदाचित् झाली तरी वेठीस धरलेल्या मनुष्याप्रमाणें तो त्या विषयांचा जुलमानें भोग घेतो. ॥ ४३ ॥ हें लोकांत नेहमीं आढळतें कीं, जे संसारी असून श्रद्धवान् मुमुक्षु आहेत ते आमच्या कर्माचा क्षय केव्हां होईल ". या चिंतेंतच नेहमीं असतात. ॥ ४४ ॥ चिंतेंत असतात असें म्हटलें येवढ्यावरून ते प्रपंचाची चिंता करितात असें समजूं नये. " तर हा संसार माझा जाईल " अशी चिंता ते करितात. ही चिंता वैराग्यच म्हटलें पाहिजे. कारण, संसारिक चिंता अज्ञानापासून उत्पन्न होते, परंतु या वैराग्यरूप चिंतेस ज्ञानच कारण आहे, ॥ ४५ ॥ विवेकास्तव ज्याच्या मनांत क्लेश उत्पन्न झाला, तो केवळ जरूरीपुरता विषयोपभोग करून तृप्त होतो. परंतु विवेक नसेल, तर अनंत भोगांनींही मनुष्याची तृप्ति होत नाहीं. ॥ ४६ ॥ इच्छेची तृप्ति विषयोपभोगानें कधींही होणार नाहीं. तूप तेल घातल्यानें अग्नि कधीं तरी शांत होईल काय ? ॥ ४७ ॥ विषयाचा दोष जाणून त्याचें सेवन केलें असतां थोडक्यांतच तृप्ति होते; यास उदाहरण. अमुक मनुष्य चोर आहे असें समजून त्याची संगत केली असतां तो बाधक न होतां उलटा तो मित्रच होतो. ॥ ४८ ॥ योगाभ्यासेंकरून वश केलेल्या मनाला जरी अल्पभोग मिळाला तरी त्यांत क्लेश असल्यामुळें तोच पुष्कळ असा मानतो. ॥ ४९ ॥ यास दृष्टांत. शत्रूंनीं एकाद्या राजाचा देश सर्व हिरावून घेऊन त्यास कांहीं दिवस कैदेंत घालून नंतर त्याला मोकळा करून एक लहानसें खेडें जरी दिलें तरी त्याणें त्याची तृप्ति होते. परंतु परचक्राचा हल्ला ज्याला मुळींच माहीत नाहीं, त्याला राष्ट्रांचीं राष्ट्रें जरी मिळालीं तरी तीं थोडींच. ॥ १५० ॥ दोषदर्शनरूप विवेक जागृत असून प्रारब्ध कर्मापासून

---

न्नध्वस्ततृट् जानन्नामूढस्तज्जिघत्सति ॥ ४२ ॥ प्रारब्धकर्मप्राबल्याद्भोगेष्विच्छा भवेद्यदि ॥ क्लिश्यन्नेव तदाऽप्येष भुंक्ते विष्टिगृहीतवत् ॥ ४३ ॥ भुंजाना वा अपि बुधाः श्रद्धावंतः कुटुंबिनः ॥ नाद्यापि कर्म न श्छिन्नमिति क्लिश्यंति संततम् ॥ ४४ ॥ नायं क्लेशोऽत्र संसारतापः किं तु विरक्तता ॥ भ्रांतिज्ञाननिदानो हि तापः सांसारिकः स्मृतः ॥ ४५ ॥ विवेकेन परिक्लिश्यन्नल्पभोगेन तृप्यति ॥ अन्यथाऽनंतभोगेऽपि नैव तृप्यति कर्हिचित् ॥ ४६ ॥ न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ॥ हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥४७॥ परिज्ञायोपभुक्तो हि भोगो भवति तुष्टये ॥ विज्ञाय सेवितश्चोरो मैत्रीमेति न चोरताम्॥४८॥ मनसो निगृहीतस्य लीलाभोगोऽल्पकोऽपि यः ॥ तमेवालब्धविस्तारं क्लिष्टत्वाद्बहु मन्यते ॥ ४९॥ बद्धमुक्तो महीपालो ग्राममात्रेण तुष्यति ॥ परैर्न बद्धो नाक्रांतो न राष्ट्रं बहु मन्यते ॥५०॥

भोगेच्छा उत्पन्न होते हें कसें ? अशी शंका कोणी घेऊं नये. कारण, ॥ ५१ ॥ प्रारब्ध कांहीं एकच प्रकारचें नाहीं. इच्छा प्रारब्ध, अनिच्छा प्रारब्ध आणि परेच्छा प्रारब्ध असे याचे तीन प्रकार आहेत. ॥ ५२ ॥ अपथ्य सेवन करणारा रोगी, चोरी करणारा मनुष्य आणि राजपत्नीचेठायीं रत असलेला जार, यांना आपणावर येणारा अनर्थ समजला असूनही प्रारब्ध कर्मामुळें दुष्कर्माची इच्छा होते. ॥ ५३ ॥ हें प्रारब्ध कर्म निवारण करणें ईश्वराचे देखील हातीं नाहीं. कारण, गीतेमध्यें ईश्वरानेंच प्रत्यक्ष अर्जुनाला असें सांगितलें आहे कीं, ॥ ५४ ॥ मनुष्य ज्ञानी जरी असला तरी आपल्या प्रकृतीस ( प्रारब्ध कर्मास ) अनुसरून त्याच्या सर्व चेष्टा घडतात. सर्व जीवांची अशीच स्थिति आहे. मग अर्जुना, प्रारब्ध कर्मापुढें निग्रहाचें बळ कितीसें चालतें ? ॥ ५५ ॥ अवश्य होणाऱ्या गोष्टीचें जर एखाद्या उपायानें निवारण कारितां आलें असतें तर नल, राम, युधिष्ठिर इत्यादिक महापुरुष इतकें दुःख कर्म भोगते ? तस्मात् प्रारब्धकर्म कोणासही चुकलें नाहीं. ॥ ५६ ॥ एवढ्यावरून म्हणजे ईश्वराचें सर्व ईश्वरत्व नष्ट होतें असें कोणीं समजूं नये. कारण कीं, प्रारब्ध कर्माचा नियमही ईश्वरानेंच निर्माण केला आहे. ॥ ५७ ॥ हें इच्छारूपी प्रारब्ध कर्म झालें. आतां पुढें अनिच्छा प्रारब्ध सांगतों. तेंही कृष्णार्जुनाच्या संवादावरून स्पष्ट दिसून येतें. ॥ ५८ ॥ हा मनुष्य जो आपल्या इच्छेविरुद्ध जुलमानें पापाचरण करितो तो कोणाच्या प्रेरणेनें? ॥ ५९ ॥ अशा अर्जुनाच्या प्रश्नावर भगवान् म्हणतात. रजोगुणापासून उत्पन्न होणारा काम आणि

---

विवेके जाग्रति सति दोषदर्शनलक्षणे ॥ कथमारब्धकर्मापि भोगेच्छां जनयिष्यति ॥ ५१ ॥ नैष दोषो यतोऽनेकविधं प्रारब्धमीक्ष्यते ॥ इच्छाऽनिच्छा परेच्छा च प्रारब्धं त्रिविधं स्मृतम् ॥ ॥ ५२ ॥ अपथ्यसेविनश्चोरा राजदाररताअपि ॥ जानंत एव स्वानर्थमिच्छंत्यारब्धकर्मतः ॥ ५३ ॥ न चात्रैतद्वारयितुमीश्वरेणापि शक्यते ॥ यत ईश्वर एवाह गीतायामर्जुनं प्रति ॥ ५४ ॥ सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ॥ प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ५५ ॥ अवश्यंभाविभावानां प्रतीकारो भवेद्यदि ॥ तदा दुःखैर्न लिप्येरन्नलरामयुधिष्ठिराः ॥ ५६ ॥ न चेश्वरत्वमीशस्य हीयते तावता यतः ॥ अवश्यंभाविताऽप्येषामीश्वरेणैव निर्मिता ॥ ५७ ॥ प्रश्नोत्तराभ्यामेवैतद्गम्यतेऽर्जुनकृष्णयोः ॥ अनिच्छापूर्वकं चास्ति प्रारब्धमिति तच्छृणु ॥ ५८ ॥ अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ॥ अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ५९ ॥ काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भ-

त्याचा परिणाम जो क्रोध हे महा भक्षक, महा पापी व मोठे वैरी आहेत असें समज.॥१६०॥ हें अर्जुना, तूं आपल्या प्रारब्ध कर्मानें बांधला गेला आहेस, म्हणून जें कर्म करण्याची तुला इच्छा नाहीं तेंही परवश होऊन मोहानें तुला करावेंच लागतें. ॥ ६१ ॥ मनुष्यास एकादें कृत्य करण्याची इच्छा असो किंवा नसो, दुसऱ्याचे ताब्यांत सांपडल्यामुळें तो जें करितो, तें परेच्छापूर्वक समजावें. ॥ ६२ ॥ तर मग पूर्वी दिलेल्या श्रुतींत "किमिच्छन्" या पदानें इच्छेचा निषेध सांगितला आहे तेथें हें सांगणें जमत नाहीं अशी कोणी शंका घेईल, तर त्यास हेंच उत्तर कीं, श्रुतींत जें "किमिच्छिन्" पद दिलें आहे त्याचा अर्थ ज्ञान्यास इच्छा मुळींच होत नाहींत असें नाहीं; तर त्या जरी झाल्या तरी भाजलेल्या बीजाप्रमाणें त्या निर्जीव असतात. ॥ ६३ ॥ भाजलेलें बीं दिसण्यांत बीजाप्रमाणेंच दिसतें, परंतु त्यापासून अंकुरादि कार्यें होत नाहींत. त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्याची इच्छा दिसण्यांत इतर लोकांच्या इच्छेसारखी जरी दिसली तरी विषय खोटे आहेत असें त्याला पक्कें समजलें असल्यामुळें, त्यापासून दुःखादि कार्यें होत नाहींत. ॥ ६४ ॥ भाजलेलें बीं जरी पेरण्याचे उपयोगीं नाहीं तरी खाण्याचे उपयोगीं पडतें. त्याप्रमाणें ज्ञान्याच्या इच्छेपासून भोग घडतो; परंतु दुःख होत नाहीं. ॥ ६५ ॥ प्रारब्धकर्माचा नाश भोगानें होतो, ह्मणून भोगापासून जें दुःख होतें तें प्रारब्ध कर्मापासून होतें असें नाहीं. तें दुःख होण्याचें कारण असें कीं, भोगण्याचे जे विषय ते आह्मी खरे मानतों; परंतु ते मिथ्या आहेत अशी ज्ञान्याची खात्री असते, म्हणून त्यांस दुःख होत नाहीं. ॥ ६६ ॥ वर दुःखास कारण भ्रांति असें सांगितलें ती ही कीं, हे विषयोपभोग मला नेहमीं मिळोत. उत्तरोत्तर यांची वृद्धि होवो. यांत विघ्न कोणचेंच न येवो, येणेंकरूनच मी धन्य आहें असें जें वाटणें तीच भ्रांति. ॥ ६७ ॥ या भ्रांतीचा परिहार करण्याला एक उपाय आहे. जें होण्यास अशक्य तें होत नाहीं. आणि होण्यास जें शक्य

---

वः ॥ महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ६० ॥ स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥ कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६१ ॥ तानिच्छंतो न चेच्छंतः परदाक्षिण्यसंयुताः ॥ सुखदुःखे भजंत्येतत्परेच्छा पूर्वकर्म हि ॥ ॥ ६२ ॥ कथं तर्हि किमिच्छन्नित्येवमिच्छा निषिध्यते ॥ नेच्छानिषेधः किंत्विच्छाबाधो भर्जितबीजवत् ॥ ६३ ॥ भर्जितानि तु बीजानि संत्यकार्यकराणि च ॥ विद्वदिच्छा तथेष्टव्याऽसत्त्वबोधान्न कार्यकृत् ॥ ६४ ॥ दग्धबीजमरोहेऽपि भक्षणायोपयुज्यते ॥ विद्वदिच्छाऽप्यल्पभोगं कुर्यान्न व्यसनं बहु ॥ ६५ ॥ भोगेन चरितार्थत्वात्प्रारब्धं कर्म हीयते ॥ भोक्तव्यसत्यता भ्रांत्या व्यसनं तत्र जायते ॥ ६६ ॥ मा विनश्यत्वयं भोगो वर्धतामुत्तरोत्तरम् ॥ मा विघ्नाः प्रतिबध्नंतु धन्योऽस्म्यस्मादिति भ्रमः ॥ ६७ ॥ यद-

तें झाल्यावांचून राहणार नाहीं; असा विवेक करावा. हा विवेक चिंतारूप विषाला मारतो. आणि त्यापासून भ्रांतीचें निवारण होतें. ॥ ६८ ॥ ज्ञानी आणि अज्ञानी या दोघांना जरी विषयभोग सारखाच असला तरी अज्ञान्यास जसें दुःख होतें तसें ज्ञान्यास होत नाहीं. कारण, अज्ञानी हा असंभाव्य गोष्टींचे मांडे मनांत खाऊन दुःख पावतो. परंतु ज्ञान्याची गोष्ट तशी नाहीं. ॥ ६९ ॥ भोगाचें मिथ्यात्व पक्कें समजून त्याजविषयीं अनास्था करून तें भोगीत असतांही त्याला दुःख होत नाहीं. कारण त्याचे मनांत संकल्पच नाहीं. ॥ १७० ॥ ज्याची रचना मनांत देखील आणतां येत नाहीं असें जें जग तें स्वप्नेंद्रजालाप्रमाणें दिसून नाश पावणारें असें आहे हें प्रत्यक्ष समजून तेथें त्याचें मन कसें बरें रमेल ? ॥ ७१ ॥ तें समजण्याचा प्रकार असा आहे कीं, मनुष्यानें नेहमीं सावध राहून आपलें स्वप्न व जागृति या दोन्ही अवस्थांची परस्पर तुलना करीत असावें. मग.—॥ ७२ ॥ त्या दोहोंमधील साम्य चांगलें ध्यानांत आणून जागृतीविषयीं सत्यत्वबुद्धि सोडून दिली असतां स्वप्नाप्रमाणें जागृति ही खोटी आहे असें पक्कें समजेल. मग अर्थातच पूर्वील अज्ञानदशेप्रमाणें या जगांत त्याचें मन रमणार नाहीं. ॥ ७३ ॥ ह्या सर्व जगाची रचना इंद्रजालाप्रमाणें अचिंत्य आहे हा विचार ज्याचे मनांत नेहमीं वागतो, त्याला प्रारब्धभोगापासून काय हानि आहे ? ॥ ७४ ॥ तत्त्वविद्येचें काम इतकेंच कीं, हें जग इंद्रजालाप्रमाणें खोटें आहे याची आठवण ती तत्त्वविद्या मनुष्यास करून देते, आणि जीवाकडून सुख व दुःख भोगवणें हें प्रारब्धाचें काम होय. ॥७५ याकरितां तत्त्वज्ञान आणि प्रारब्ध यांमध्यें विरोध मुळींच नाहीं. कारण त्या दोहोंचे विषय भिन्न भिन्न आहेत. गारुड्याचा खेळ पाहणारा हें गारुड आहे असें समजून केवळ कौतुकानें

---

भावि न तद्भावि भावि चेन्न तदन्यथा ॥ इति चिंताविषघ्नोऽयं बोधो भ्रमनिवर्तकः ॥ ६८ ॥ समेऽपि भोगे व्यसनं भ्रांतो गच्छेन्न बुद्धवान् ॥ अशक्यार्थस्य संकल्पाद्भ्रांतस्य व्यसनं बहु ॥ ६९ ॥ मायामयत्वं भोगस्य बुध्द्वाऽऽस्थामुपसंहरन् ॥ भुंजानोऽपि न संकल्प कुरुते व्यसनं कुतः ॥ ७० ॥ स्वप्नेन्द्रजालसदृशमचिंत्यरचनात्मकम् ॥ दृष्टनष्टं जगत्पश्यन् कथं तत्रानुरज्यति ॥ ७१ ॥ स्वस्वप्नमापरोक्ष्येण दृष्ट्वा पश्यन् स्वजागरम् ॥ चिंतयेदप्रमत्तः सन्नुभावनुदिनं मुहुः ॥ ७२ ॥ चिरं तयोः सर्वसाम्यमनुसंधायजागरे ॥ सत्यत्वबुद्धिं संत्यज्य नानुरज्याति पूर्ववत् ॥ ७३ ॥ इंद्रजालमिदं द्वैतमचिंत्यरचनात्वतः ॥ इत्यविस्मरतो हानिः का वा प्रारब्धभोगतः ॥ ७४ ॥ निर्बंधस्तत्त्वाविद्याया इंद्रजालत्वसंस्मृतौ ॥ प्रारब्धस्याग्रहो भोगे जीवस्य सुखदुःखयोः ॥ ७५ ॥ विद्यारब्धे विरुध्येते न भिन्नविषयत्वतः ॥ जानद्भिर-

ती मौज पाहतो. त्याप्रमाणें ज्ञान्यालाही या जगाची मौज वाटते. ॥ ७६ ॥ हें प्रारब्ध कर्म जगाला सत्यत्व आणून जर सुखदुःखें जीवाकडून भोगवील, तर मात्र तें तत्त्वज्ञानास विरोधी होईल. पण तशी कांहीं गोष्ट नाही. म्हणून विषयांचा भोग होण्यास तो सत्यच असला पाहिजे असा नियम नाहीं. ॥ ७७ ॥ स्वप्नामधील कल्पित विषयांचा जसा पूर्णपणें भोग होतो तसाच जागृतीमधील खोट्या विषयांचाही भोग होतो असें म्हणण्यास कोणती हरकत आहे? ॥ ७८ ॥ तसेंच जर या तत्त्वविद्येपासून जगाचा मुळींच लोप होईल तर ती प्रारब्ध कर्माशीं विरोधी होईल. परंतु तिजपासून तसें होत नाहीं. अमुक वस्तु खोटी आहे असें समजल्यानें तिचा ह्मणजे अगदींच नाश होतो असें नाहीं. ॥ ७९ ॥ लोकांमध्यें पदार्थांचा नाश न होतां तो पदार्थ खोटा आहे असें ज्ञान होण्याचा संभव आहे त्याप्रमाणें विषयभोगाचा नाश न होतां त्याचा खोटेपणा मनांत ठसण्यास कोणचाही अडथळा दिसत नाहीं. ॥ १८० ॥ याजवर असा एक पूर्वपक्ष आहे कीं, " यत्रत्वस्य जगत् स्वात्मा" या श्रुतीचा अर्थ असा आहे कीं, ज्या मोक्षावस्थेच्याठायीं सर्व जग आपण होतों, तेथें कोणी कोणतें रूप पहावें? कोणी कोणता गंध हुंगावा? कोणीं कोणचा शब्द बोलावा? इत्यादिवरून ॥ ८१ ॥ ज्ञान उत्पन्न झालें म्हणजे द्वैताचा नाश होतो असें ठरतें. मग विद्वानाला भोग आहेत असें तुह्मी कसें ह्मणतां? तर याजवर उत्तर असें कीं, ॥ ८२ ॥ जी श्रुति सुषुप्तीला लागू आहे आणि मुक्तीलाही लागू आहे असा सूत्राचा स्पष्ट अभिप्राय आहे ह्मणून येथें सुषुप्तिपरच समजावी. ॥ ८३ ॥ या श्रुतीचा अर्थ सुषुप्तीकडे जर न लावला तर आजपर्यंत जे याज्ञवल्क्यादिक मोठमोठे तत्त्वज्ञ होऊन गेले, त्यांना आचार्यत्व देतां आलें नसतें. कारण, त्यांना द्वैत दिसत होतें असें जर मानलें तर ते अज्ञानी ठरतात. आणि तें त्यांना दिसतच नव्हतें असें जर मानलें तर त्यांच्या तों-

---

प्यैन्द्रजालविनोदो दृश्यते खलु ॥ ७६ ॥ जगत्सत्यत्वमापाद्य प्रारब्धं भोजयेद्यदि ॥ सदाविरोधि विद्याया भोगमात्रान्न सत्यता ॥ ७७ ॥ अनूनो जायते भोगः कल्पितैः स्वप्नवस्तुभिः ॥ जाग्रद्वस्तुभिरप्येवमसत्यैर्भोग इष्यताम् ॥ ७८ ॥ यदि विद्याऽपन्हुवीत जगत्प्रारब्धघातिनी ॥ तदा स्यान्न तु मायात्वबोधेन तदापन्हवः ॥ ७९ ॥ अनपन्हुत्य लोकास्तदिंद्रजालमिदं त्विति ॥ जानंत्येवानपन्हुत्य भोगं मायात्वधीस्तथा ॥ १८० ॥ यत्र स्वस्य जगत्स्वात्मा पश्येत्कस्तत्र केन किम् ॥ किञ्जिघ्रेत् किं वदेद्वेति श्रुतौ तु बहु घोषितम् ॥ ८१ ॥ तेन द्वैतमपन्हुत्य विद्योदेति न चान्यथा ॥ तथा च विदुषो भोगः कथं स्यादिति चेच्छृणु ॥ ८२ ॥ सुषुप्तिविषया मुक्तिविषया वा श्रुतिस्त्विति ॥ उक्तं स्वाप्ययसंपत्योरिति सूत्रे ह्यतिस्फुटम् ॥ ८३ ॥ अन्यथा याज्ञवल्क्यादेराचा-

डांतून शिष्यादिकांस पढविण्याकरितां शब्दच निघाले नसते. ॥ ८४ ॥ याजवर कोणी ह्मणे-ल कीं, निर्विकल्प समाधीमध्यें द्वैताचें दर्शन मुळींच नाहीं ह्मणून तिलाच अपरोक्ष विद्या ह्म-णणें योग्य आहे. तर त्याजवर आमचें उत्तर असें कीं, समाधि जर अपरोक्ष विद्या झाली तर निद्रा ही अपरोक्ष विद्या असें कां न म्हणावें ? ॥ ८५ ॥ आतां तुह्मी म्हणाल कीं, नि-द्रेंत आत्मज्ञान नसतें ह्मणून ती अपरोक्ष विद्या नव्हे तर आत्मज्ञानालाच विद्या म्हणा, द्वैत-विस्मृत्ति कशाला पाहिजे ? ॥ ८६ ॥ द्वैतविस्मृति आणि आत्मज्ञान हीं दोन्ही मिळून अपरो-क्ष विद्या होते असें जर म्हणाल, तर घटादिक जड पदार्थांस अर्धी विद्या आहे असें ह्मटलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर घटादिकांस ती अर्धी विद्या जितकी दृढ आहे तितकी योग्यांना दे-खील नाहीं. ॥ ८७ ॥ कारण, त्यांचा समाधि मशकध्वनिसारखीं थोडींशीं विघ्नें आलीं कीं बिघडतो. तसा घटादिकांचा नाहीं. ॥ ८८ ॥ तेव्हां आत्मज्ञान हीच अपरोक्ष विद्या आहे. तिला द्वैतविस्मृतीची गरज नाहीं, असें कबूल करणें भागच आहे. दुसरा मार्ग नाहीं. आतां चित्तनिरोध केल्यावांचून ज्ञान होतच नाहीं असें असेल तर तो खुशाल करावा ॥ ८९ ॥ तो आह्मास इष्टच आहे. कारण ज्यापासून जगाचें मिथ्यात्वज्ञान चांगलें होतें तें आम्हास आव-श्य आहे. याकरितां " किमिच्छन् " या श्रुतीचा अर्थ इतकाच कीं, ज्ञान्याची इच्छा अ-ज्ञान्याच्या इच्छेप्रमाणें प्रबल नसते. ॥ १९० ॥ शास्त्रांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, विषयेच्छा असणें हें अज्ञान्याचें लक्षण. आणि दुसरीकडे असें म्हटलें आहे कीं, ज्ञान्याच्याठायीं त्या असल्या तरी चिंता नाहीं. ह्या दोन विरुद्ध वाक्यांची व्यवस्था कशी करावी असा कोणी प्रश्न करील तर पहिल्या पक्षीं दृढ इच्छा आणि दुसऱ्या वाक्यांत इच्छा-भास असा अर्थ केला असतां दोहोंची एकवाक्यता होते. ॥ ९१ ॥ जसें जगन्मिथ्यात्वज्ञाना-नें, इच्छिण्याचे विषयच नाहींसे झाले असा " किमिच्छन् " पदाचा भाव काढला, त्याप्रमाणें

---

र्यत्वं न संभवेत् ॥ द्वैतदृष्टावविद्वत्ता द्वैतादृष्टौ न वाग्वदेत् ॥८४ निर्विकल्पसमाधौ तु द्वैतादर्शनहेतुतः ॥ सैवापरोक्ष विद्येति चे-त्सुषुप्तिस्तथा न किम् ॥ ८५ ॥ आत्मतत्त्वं न जानाति सुप्तौ य-दि तदा त्वया ॥ आत्मधीरेव विद्येति वाच्यं न द्वैतविस्मृतिः ॥ ८६ ॥ उभयं मिलितं विद्या यदि तर्हि घटादयः ॥ अर्धविद्या-भाजिनः स्युः सकलद्वैतविस्मृतेः ॥ ८७ ॥ मशकध्वनिमुख्यानां विक्षेपाणां बहुत्वतः ॥ तव विद्या तथा न स्याद्घटादीनां यथा दृढा ॥ ८८ ॥ आत्मधीरेव विद्येति यदि तर्हि सुखी भव ॥ दुष्ट-चित्तं निरुंध्याचेन्निरुंद्धि त्वं यथासुखम् ॥८९॥ तदिष्टमेष्टव्यमाया-मयत्वस्य समीक्षणात् ॥ इच्छन्नप्यज्ञवन्नेच्छेत्किमिच्छन्निति हि श्रुतम् ॥१९०॥ रागोलिंगमबोधस्य सन्तु रागादयो बुधे ॥ इति शास्त्रद्वयं सार्थमेवं सत्याविरोधतः ॥९१॥ जगन्मिथ्यात्ववत्स्वात्मा-

आत्मा असंग आहे म्हणून भोक्ता कोणीच नाहीं. हाच अभिप्राय " कस्य कामाय " या पदाचा आहे. ॥ ९२ ॥ पतिजायादि सर्व विषय आपल्या भोगाकरितां मनुष्य इच्छितो. त्या विषयाकरितां इच्छित नाहीं. असें श्रुतींत पुष्कळ सांगितलें आहे. ॥ ९३ ॥ आतां हा भोक्ता कोण आहे याचा विचार करूं. हा भोक्ता कूटस्थ, चिदाभास, किंवा दोन्ही मिळून ? ह्यांपैकीं एक असला पाहिजे. आतां कूटस्थ जर भोक्ता म्हणावा, तर तो असंग असल्यामुळें त्यास भोक्तृत्व संभवत नाहीं. ॥ ९४ ॥ कारण सुख-दुःखाचा अभिमानरूप जो विकार होतो तोच भोग, आणि कूटस्थ तर अविकारी आहे, मग त्यास भोक्तृत्व कसें येईल ॥ ९५ ॥ चिदाभास हा विकार पावणाऱ्या बुद्धीमध्यें प्रतिबिंबित होतो. म्हणून तोही भ्रांतिरूप विकारी आहे. आतां त्यास जर भोक्तृत्व लावावें तर, अधिष्ठानावांचून केवळ भ्रांति मुळींच संभवत नाहीं. म्हणून केवळ चिदाभासही भोक्ता म्हणतां येत नाहीं. ॥ ९६ ॥ याकरितां या दोन्हींलाही भोक्तृत्व न लावितां त्या उभयतांच्या सांगडीस लावावें हें बरें. आणि लोकांत भोक्ता भोक्ता जो म्हणतात तो हाच. तशा भोक्त्या आत्म्याचा उपक्रम करून श्रुतींत कूटस्थास शेवटीं सत्यत्व दिलें आहे. ॥ ९७ ॥ श्रुतीमध्यें याज्ञवल्क्यास आत्मा कोण असा जनक राजानें प्रश्न केला असतां त्याणें विज्ञानमय कोशापासून उपक्रम करून शेवटीं असंग कूटस्थच आत्मा आहे असें सांगितलें. ॥ ९८ ॥ " कोऽयमात्मा " इत्यादिक श्रुतीमध्यें आत्म्याचा विचार केला आहे. तेथें उभयात्मक भोक्ता धरूनच शेवटीं कूटस्थाची सिद्धि केली आहे. ॥ ९९ ॥ याप्रमाणें भोक्तेपणा मिथ्या असून तें सत्य असें कां वाटतें याचें कारण हेंच कीं, हा उभयात्मक भोक्ता कूटस्थाचें सत्यत्व आपणावर घेऊन आपला भोक्तेपणा खरा आहे

---

संगत्वस्य समीक्षणात् ॥ कस्य कामायेति वचो भोक्तृभावविवक्षया ॥९२॥ पतिजायादिकं सर्वं तत्तद्भोगाय नेच्छति ॥ किंत्वात्मभोगार्थमिति श्रुतावुद्घोषितं बहु ॥ ९३ ॥ किं कूटस्थचिदाभासोऽथ वा किं वोभयात्मकः ॥ भोक्ता तत्र न कूटस्थोऽसंगत्वाद्भोक्तृतां व्रजेत् ॥९४॥ सुखदुःखाभिमानाख्यो विकारो भोग उच्यते ॥ कूटस्थश्च विकारी चेत्येतन्न व्याहतं कथम् ॥ ९५ ॥ विकारी बुध्यधीनत्वादाभासे विकृतावपि ॥ निरधिष्ठानविभ्रांतिः केवला न हि तिष्ठति ॥ ९६ ॥ उभयात्मक एवातो लोके भोक्ता निगद्यते॥ तादृगात्मानमारभ्य कूटस्थः शेषितः श्रुतौ ॥ ९७ ॥ आत्मा कतम इत्युक्ते याज्ञवल्क्यो विबोधयन् ॥ विज्ञानमयमारभ्यासंगं तं पर्यशेषयत् ॥९८॥ कोऽयमात्मेत्येवमादौ सर्वत्रात्मविचारतः ॥ उभयात्मकमारभ्य कूटस्थः शेष्यते श्रुतौ ॥ ९९ ॥ कूटस्थसत्यतां स्वस्मिन्नध्यस्यात्माऽविवेकतः ॥ तात्त्विकीं भोक्तृतां मत्वा न

असें मानून त्याला तो सोडूं इच्छित नाहीं. ॥ २०० ॥ अशा प्रकारचा भोक्ता पतिजायादि विषयांची जी इच्छा करितो ती केवळ आपल्या सुखाकरितां, अशी जी प्रसिद्धि आहे, तिचा च अनुवाद श्रुतीनें केला. ॥ १ ॥ असा अनुवाद करण्याचें कारण हेंच कीं, मनुष्याची विषयांवरील प्रीति जाऊन स्वतःवर बसावी. कारण पतिजायादि सर्व आपल्या सुखाचीं साधनें आहेत. ॥ २ ॥ याविषयीं पुराणांत एक वचन आहे तें असें कीं, " हे देवा, अविचाऱ्यांची जशी विषयावर सदा प्रीति असते, तशीच तुजवर माझी सदा प्रीति असो. अशी एका भक्तानें प्रार्थना केली आहे. ॥ ३ ॥ या न्यायानें विरक्त मुमुक्षु पुरुष सर्व भोगण्याचे विषयांपासून आपली प्रीति ओढून घेऊन आपल्यावर आणून ठेवितो, आणि आत्म्यास जाणण्याची इच्छा करितो. ॥ ४ ॥ जसा संसारी मनुष्य स्रक्, चंदन, वधू, वस्त्र, सुवर्णादिकांच्याठायीं दक्ष असतो तसा मुमुक्षु भोक्त्याचेठायीं ( आत्म्याविषयीं ) दक्ष असतो. ॥ ५ ॥ व ज्याप्रमाणें सभा जिंकण्याच्या इच्छेनें पंडित लोक काव्य नाटक तर्कादि शास्त्रांचा निरंतर अभ्यास करितात त्याप्रमाणें मुमुक्षूनें स्वतःविषयीं विचार करावा. ॥ ६ ॥ तसेंच ज्याप्रमाणें कर्मठ पुरुष स्वर्गादिकांची वांच्छा धरून जपयज्ञउपासनादि कर्में मोठ्या श्रद्धेनें करितो, त्याप्रमाणें मनामध्यें मुमुक्षा धारण करून साधकानें स्वतःवर श्रद्धा ठेवावी. ॥ ७ ॥ तसेंच योगी हा अणिमादिक सिद्धींची इच्छा करून जसा हटानें चित्तनिग्रह करितो त्याप्रमाणें साधकानें मुमुक्षा धारण करून स्वतःचें विवेचन करावें. ॥ ८ ॥ त्या पंडितादिकांची आपापल्या विषयांमध्यें अभ्यासबलानें जशी अधिकाधिक गति होते, त्याप्रमाणें साधकाचाही अभ्यासबलानें, देहादिकापासून मी निराळा आहें, असा विवेक अधिकाधिक स्पष्ट होत जातो.

---

कदाचिज्जिहासति ॥ २०० ॥ भोक्ता स्वस्यैव भोगाय पतिजायादिमिच्छति ॥ एष लौकिकवृत्तांतः श्रुत्या सम्यगनूदितः ॥१॥ भोग्यानां भोक्तृशेषत्वान्मा भोग्येष्वनुरज्यताम् ॥ भोक्तर्येव प्रधानेऽतोऽनुरागं तं विधित्सति ॥ २ ॥ या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी ॥ त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्माऽपसर्पतु ॥ ३ ॥ इतिन्यायेन सर्वस्माद्भोग्यजाताद्विरक्तधीः ॥ उपसंहृत्य तां प्रीतिं भोक्तर्येनं बुभुत्सते ॥ ४ ॥ स्रक्चंदनवधूवस्त्रसुवर्णादिषु पामरः ॥ अप्रमत्तो यथा तद्वन्न प्रमाद्यति भोक्तरि ॥५॥ काव्यनाटकतर्कादिमभ्यस्यति निरंतरम् ॥ विजिगीषुर्यथा तद्वन्मुमुक्षुः स्वं विचारयेत् ॥६॥ जपयागोपासनादि कुरुते श्रद्धया यथा ॥ स्वर्गादिवांछया तद्वच्छ्रद्दध्यात्स्वे मुमुक्षया ॥७॥ चित्तैकाग्र्ये यथा योगी महायासेन साधयेत् ॥ अणिमादिप्रेप्सयैवं विविच्यात् स्वं मुमुक्षया ॥८॥ कौशलानि विवर्धन्ते तेषामभ्यासपाटवात् ॥ यथा तद्वद्विवेकोऽस्याप्य-

॥ ९ ॥ या विवेकाचा परिणाम शेवटीं असा होतो कीं, भोक्त्याचें खरें स्वरूप जागृदादि तिन्ही अवस्थांमध्यें अन्वयव्यतिरेकांहींकरून निवडल्यानें, साक्षी हा असंग आहे असा निश्चय होतो. ॥ ११० ॥ ते अन्वयव्यतिरेक असे जाग्रत्स्वप्न सुषुप्ति यांपैकीं ज्या ज्या दशेंत जें जें साक्षीस दिसतें तें तें त्या त्या दशेपुरतेंच. ह्मणजे जागृतींतील स्थूल सृष्टि जागृतींतच. स्वप्नांतील सूक्ष्म सृष्टि स्वप्नांतच. आणि सुषुप्तींतील अज्ञान सुषुप्तींतच. असा अनुभव सर्व लोकांस आहे. ॥ ११ ॥ याविषयीं श्रुतीचेंही प्रमाण आहे. " स यत्तत्रेक्षते " इत्यादिक श्रुतीचा अर्थ असा आहे कीं, त्या त्या अवस्थेंत साक्षीच्या दृष्टीस जें जें पुण्य व पाप पडतें, त्यापासून तो अगदीं निराळा असतो. ॥ १२ ॥ दुसरें प्रमाण. जाग्रत्स्वप्नसुषुप्तीचेठायीं असणारा प्रपंच, ज्या ब्रह्माच्या योगानें प्रकाशित होतो, तें ब्रह्म मी असें ज्ञान झालें असतां, प्राणी सर्व बन्धांपासून तत्काल मुक्त होतो ॥ १३ ॥ तिसरें. तिन्ही अवस्थांमध्यें एकच आत्मा आहे असें समजावें. तीनही अवस्थांपासून निराळा असणारा जो साक्षी त्यास पुनर्जन्म नाहीं. ॥ १४ ॥ चवथें. त्या तिन्ही अवस्थेंत भोग, भोक्ता आणि भोग्य या त्रिपुटीपासून निराळा चैतन्यरूपी साक्षी सदाशिव मी आहे. ॥ १५ ॥ याप्रमाणें आत्मतत्त्वाचें विवेचन केलें असतां, ज्याला विज्ञानमय अशी संज्ञा आहे असा जो चिदाभास तो विकारी असल्यामुळें भोक्तृत्व त्यालाच लागू होतें. ॥ १६ ॥ हा चिदाभास खोटा आहे असें श्रुतिप्रमाणावरून व अनुभवानें सिद्ध होतें. कारण, जग हें इंद्रजालाप्रमाणें मिथ्या आहे, असें पूर्वींच सांगितलें आहे. आणि चिदाभासही जगापैकींच आहे, ह्मणून तोही मिथ्या म्हटला पाहिजे. ॥ १७ ॥ या चिदाभासाचा लय झालेला सुषुप्त्यादि अवस्थांमध्यें अनुभवास येतो. अशा विचारानें आ-

---

भ्यासाद्विशदायते ॥ ९ ॥ विविंचता भोक्तृतत्त्वं जाग्रदादिष्वसंगता ॥ अन्वयव्यतिरेकाभ्यां साक्षिण्यध्यवसीयते ॥ ११० ॥ यत्र यद्दृश्यते द्रष्ट्रा जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु ॥ तत्रैव तन्नेतरत्रेत्यनुभूतिर्हि संमता ॥ ११ ॥ स यत्तत्रेक्षेत किंचित्तेनानन्वागतो भवेत् ॥ दृष्ट्वैव पुण्यं पापं चेत्येवं श्रुतिषु डिंडिमः॥ १२ ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिप्रपंचं यत्प्रकाशते ॥ तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥ १३ ॥ एक एवात्मा मंतव्यो जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु ॥ स्थानत्रयव्यतीतस्य पुनर्जन्म न विद्यते ॥ १४ ॥ त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत् ॥ तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः ॥ १५ ॥ एवं विवेचिते तत्त्वे विज्ञानमयशब्दितः ॥ चिदाभासो विकारी यो भोक्तृत्वं तस्य शिष्यते ॥ १६ ॥ मायिकोऽयं चिदाभासः श्रुतेरनुभवादपि ॥ इंद्रजालं जगत्प्रोक्तं तदंतःपात्ययं यतः ॥ १७ ॥ विलयोऽप्यस्य सुप्त्यादौ

पला खोटेपणा मुमुक्षु वारंवार समजून घेतो. ॥ १८ ॥ याप्रमाणें, आपला खोटेपणा समजून घेऊन आपला खचित नाश होणार आहे असें जाणून पुनः भोगाची इच्छा करीत नाहीं. ठीकच आहे, मरणास टेंकलेला मनुष्य विवाहाची इच्छा कधीं तरी करील काय? ॥ १९ ॥ मग मी भोक्ता ह्मणून पूर्वी जसा व्यवहार करीत होता तसा पुनः करण्याला, नाक कापलेल्या मनुष्याप्रमाणें तो लाजतो. आणि मनांत खंत बाळंगून प्रारब्ध निमूटपणें भोगतो. ॥२२०॥ जेव्हां आपलेंच भोक्तृत्व खरें मानण्यास याला लाज वाटते, तेव्हां साक्षीला भोक्तृत्व तो लावणार नाहीं हें कशास सांगितलें पाहिजे.? ॥ २१ ॥ असा अभिप्राय मनांत आणून "कस्य कामाय" या श्रुतींतील पदानें भोक्त्याचें निःशंकपणें निराकरण केलें. असें निराकरण झाल्यावर अर्थातच, शरीरांतील ज्वर ( ताप ) याला लागत नाहीं. तें कसें तें पुढें दाखवितों. ॥२२॥ स्थूल–सूक्ष्म–आणि कारण अशीं तीन शरीरें पूर्वी सांगितलींच आहेत. जेथें शरीर आहे तेथें ज्वर असलाच पाहिजे. ह्मणून या तीन शरीरांत या तीन प्रकारचे ज्वर आहेत ते हे कीं:— ॥ २३ ॥ वात पित्त कफापासून होणारे कोट्यवधि रोग, आणि दुर्गंधित्व–कुरूपत्व–अंगाचा दाह, हातांपायांस दुखापत, हे स्थूल शरीरांतील ज्वर होत. ॥ २४ ॥ कामक्रोधादिक असुरी संपत्ति व शमदमादि दैवी संपत्ति, हे सूक्ष्म देहांतील ज्वर आहेत. पहिल्याच्या प्राप्तीनें आणि दुसऱ्याचे अप्राप्तीनें संताप होतो. म्हणून शमदमादि देखील ज्वरच म्हटलें पाहिजेत. ॥२५॥ आतां कारण शरीरांतील ज्वर मात्र विचारावांचून समजणें कठिण आहेत. छांदोग्य श्रुतींत इंद्रानें आपल्या गुरूस असें म्हटलें आहे कीं, " निद्रेमध्यें मला आपलेंही ज्ञान नाहीं, आणि जगाचेंही ज्ञान नाहीं, अशीही पुढें येणाऱ्या दुःखास कारणीभूत अवस्था मला फार दुःख देत

---

साक्षिणा ह्यनुभूयते ॥ एतादृशं स्वस्वभावं विविनक्ति पुनः पुनः ॥ १८ ॥ विविच्य नाशं निश्चित्य पुनर्भोगं न वांछति ॥ मुमूर्षुः शायितो भूमौ विवाहं कोऽभिवांछति ॥ १९ ॥ जिन्हेति व्यवहर्तुं च भोक्ताऽहमिति पूर्ववत् ॥ छिन्ननास इव न्हीतः क्लिश्यन्नारब्धमश्नुते ॥ २२० ॥ यदा स्वस्यापि भोक्तृत्वं मंतुं जिन्हेत्ययं तदा ॥ साक्षिण्यारोपयेदेतादिति कैव कथा वृथा ॥ २१ ॥ इत्यभिप्रेत्य भोक्तारमक्षिपत्यविशंकया ॥ कस्य कामायेति ततः शरीरानुज्वरो न हि ॥ २२ ॥ स्थूलं सूक्ष्मं कारणं च शरीरं त्रिविधं स्मृतम् ॥ अवश्यं त्रिविधोऽस्त्येव तत्र तत्रोचितो ज्वरः ॥ ॥ २३ ॥ वातपित्तश्लेष्मजन्यव्याधयः कोटिशस्तनौ ॥ दुर्गंधित्वकुरूपत्वदाहभंगादयस्तथा ॥ २४ ॥ कामक्रोधादयः शांतिदांत्याद्या लिंगदेहगाः ॥ ज्वरा द्वयेऽपि बाधंते प्राप्त्याऽप्राप्त्या नरं क्रमात् ॥ २५ ॥ स्वं परं च न वेत्त्यात्मा विनष्ट इव कारणे ॥

आहे." यावरून अज्ञान हा कारण शरीरांतील एक ज्वरच ह्मटला पाहिजे. ॥ २६ ॥ या तीन शरीरांचे ठायीं हे ज्वर इतके स्वाभाविक आहेत कीं, त्यांचा वियोग झाला असतां तीं शरीरेंच नाहींशीं होतात. ॥२७॥ यांस दृष्टांत तंतूच्या वियोगानें पट, लोंकरीच्या वियोगानें कांबळें, आणि मृत्तिकेच्या वियोगानें घट, हे जसे नाहींसे होतात; त्याप्रमाणें त्या त्या ज्वराचा वियोग झाला असतां तो तो देह नाहींसा होतो. ॥ २८ ॥ खुद्द चिदाभासांतच पाहिलें असतां कोणाचाच ज्वर नाहीं. कारण, प्रकाश हाच त्याचा स्वभाव आहे. ॥ २९ ॥ आतां चिदाभासांत जर ज्वराचा संबंध नाहीं, तर साक्षीमध्यें तो नाहीं हें बोलावयासच नको. असें असून अविद्येमुळें मीच तीं शरीरें असें तो मानतो, ॥ २३० ॥ हा चिदाभास साक्षीचा खरेपणा, भ्रमानें आपल्यासहित तीन शरीरांस लावून तें सर्व आपलेंच स्वरूप असें मानतो. ३१ अशा भ्रांतीच्या वेळेस केवळ शरीराला संताप होत असून तो मला होतो, असें कुटुंबी मनुष्याप्रमाणें तो मानतो. ॥ ३२ ॥ ह्मणजे, पुत्रदारादिकांस कांहीं रोगादिक होऊन संताप झाला असतां घरचा मुख्य यजमान तें दुःख मलाच होतें असें मानतो, त्याप्रमाणें, या चिदाभालाही सा वाटतें. ॥ ३३ ॥ परंतु विवेकदशा आली ह्मणजे तो चिदाभास देहात्म्याचें विवेचन करून, भ्रांति टाकून देऊन, आपण खोटा आहे अशा बुद्धीनें, आपला देखील अनादर करून खरा जो साक्षी, त्याचें चिंतन करितो मग तो शरीराचा संताप आपल्यावर कां घेईल ? ॥ ३४ ॥ भ्रांतिज्ञानापासून संताप होतो आणि तत्त्व समजलें असतां तो संताप नाहींसा होतो. यास दृष्टांत—दोरीचेठायीं " हा सर्प " असें जें मिथ्या ज्ञान तेंच मनुष्याच्या पळण्यास कारण

---

आगामिदुःखबीजं चेत्येतदिंद्रेण दर्शितम् ॥ २६ ॥ एते ज्वराः शरीरेषु त्रिषु स्वभाविका मताः ॥ वियोगे तु ज्वरैस्तानि शरीराण्येव नासते ॥ २७ ॥ तंतोर्वियुज्येत पटो वालेभ्यः कम्बलो यथा ॥ मृदो घटस्तथा देहो ज्वरेभ्योऽपीति दृश्यताम् ॥ २८ ॥ चिदाभासे स्वतः कोऽपि ज्वरो नास्ति यतश्चितः ॥ प्रकाशैकस्वभावत्वमेव दृष्टं न चेतरत् ॥ २९ ॥ चिदाभासेऽप्यसंभाव्या ज्वराः साक्षिणि का कथा ॥ एवमप्येकतां मेने चिदाभासो ह्यविद्यया ॥ २३० ॥ साक्षिसत्यत्वमध्यस्य स्वेनोपेते वपुस्त्रये ॥ तत्सर्वं वास्तवं स्वस्य स्वरूपमिति मन्यते ॥ ३१ ॥ एतस्मिन् भ्रांतिकालेऽयं शरीरेषु ज्वरस्त्वथ ॥ स्वयमेव ज्वरामीति मन्यते हि कुटुंबिवत् ॥ ३२ ॥ पुत्रदारेषु तप्यत्सु तपामीति वृथा यथा ॥ मन्यते पुरुषस्तद्वदाभासोऽप्यभिमन्यते ॥ ३३ ॥ विविच्य भ्रांतिमुज्झित्वा स्वमप्यगणयन्सदा ॥ चिंतयन्साक्षिणं कस्माच्छरीरमनुसंज्वरेत् ॥३४॥ अयथावस्तुसर्पादिज्ञानं हेतुः पलायने ॥ रज्जु-

आहे. आणि " ही दोरी " असें जेव्हां त्यास समजतें, तेव्हां मी उगाच कीरे भ्यालों असें ह्मणून तो खेद करितो. ॥ ३५ ॥ जसा एकादा पुरुष मिथ्यारोपाच्या पापाच्या प्रायश्चित्तार्थ, ज्यावर मिथ्यारोप केला, त्याची क्षमा मागतो, त्याप्रमाणें चिदाभासही साक्षीवर कर्तृत्वभोक्तृत्वाचा आरोप आणल्याबद्दल त्याचीच क्षमा मागून त्याला शरण जातो. ॥ ३६ ॥ अथवा जसा एकादा पाप करणारा मनुष्य पूर्वी पुष्कळदां पाप केल्याबद्दल त्याच्या प्रायश्चित्तार्थ, पुष्कळदां स्नानजपादि करितो. त्याप्रमाणें चिदाभास हा केवळ साक्षीपरायण होऊन, वारंवार त्याचेंच ध्यान करितो, ॥ ३७ ॥ मिथ्यारोपाबद्दल साक्षीचें ध्यान करितो इतकेंच नव्हे, तर जशी एकादी वेश्या गुप्त ठिकाणीं कुष्ठ झालें असतां, विलास करण्यास लाजतें, त्याप्रमाणें त्याला स्वतःच्या प्रख्यातीची लाज वाटतें. ॥ ३८ ॥ तसेंच ज्याप्रमाणें मुसलमानांनीं बाटविलेला ब्राह्मण, एकदां प्रायश्चित्त घेऊन पुनः त्याचे मंडळींत जात नाहीं, त्याप्रमाणें शरीराच्या अभिमानानें एकदां बाटलेला हा चिदाभास, पुन्हां त्यांचा अभिमान धरीत नाहीं. ॥ ३९ ॥ राजाचा वारस राजपुत्र, जसा आपणास राज्यपदवी मिळावी या इच्छेनें राजासारखेंच आचरण करितो; तसाच हा चिदाभासही साक्षीप्रमाणें शांत असण्याविषयीं प्रयत्न करितो. ॥ २४० ॥ " ब्रह्मवित् ब्रह्मैव भवति " ही श्रुति ध्यानीं घेऊन तो ब्रह्माचेंच चिंतन करितो, दुसरें करीत नाहीं. ॥ ४१ ॥ ज्यांना देव व्हावें अशी इच्छा आहे, ते जसे गंगेंत किंवा अग्नींत प्रवेश करितात, त्याप्रमाणें चिदाभासही साक्षित्वेंकरून असण्याची पक्की खात्री असल्यानें, तो आपल्या नाशाची इच्छा करितो. ॥४२॥ ज्याप्रमाणें अग्निप्रवेश केलेल्या मनुष्याचा मनुष्यपणा, त्याचा देह जळेपर्यंत नाहींसा होत नाहीं;

---

ज्ञानेऽहिधीध्वस्तौ कृतमप्यनुशोचति ॥ ३५ ॥ मिथ्याभियोगदोषस्य प्रायश्चित्तप्रसिद्धये ॥ क्षमापयन्निवात्मानं साक्षिणं शरणं गतः ॥ ३६ ॥ आवृत्तपापनुत्त्यर्थं स्नानाद्यावर्त्यते यथा ॥ आवर्तयन्निव ध्यानं सदा साक्षिपरायणः॥ ३७ ॥ उपस्थकुष्ठिनी वेश्या विलासेषु विलज्जते ॥ जानतोऽग्रे तथाऽऽभासः स्वप्रख्यातौ विलज्जते ॥ ३८ ॥ गृहीतो ब्राह्मणो म्लेच्छैः प्रायश्चित्तं चरन् पुनः॥ म्लेच्छैः संकीर्यते नैव तथाऽऽभासः शरीरकैः ॥ ३९ ॥ यौवराज्ये स्थितो राजपुत्रः साम्राज्यवांछया ॥ राजानुकारी भवति तथा साक्ष्यनुकार्ययम् ॥ २४० ॥ यो ब्रह्म वेद ब्रह्मैव भवत्येव इति श्रुतिः ॥ श्रुत्वा तदेकचित्तः सन् ब्रह्म वेत्ति न चेतरत् ॥ ॥ ४१ ॥ देवत्वकामा ह्यग्न्यादौ प्रविशंति यथा तथा ॥ साक्षित्वेनावशेषाय स्वविनाशं स वांछति ॥ ४२ ॥ यावत्स्वदेहदाहं स नरत्वं नैव मुञ्चति ॥ तावदारब्धदेहं स्यान्नाभासत्वविमोच-

त्याप्रमाणें, प्रारब्धकर्माचा क्षय होऊन देहपात होईपर्यंत जीवत्वव्यवहार जात नाहीं. ॥ ४३ ॥ ज्याप्रमाणें " हा सर्प नव्हे ही दोरी आहे " असें ज्ञान झाल्यावर देखील, पूर्वीच्या भीतीपासून उत्पन्न झालेले कंपादिक, अगदीं बंद होण्यास कांहीं वेळ लागतो, त्याप्रमाणें भोगादिक हीं हळुहळूं बंद होतात. आणि ज्याप्रमाणें ती दोरी पुन्हां अंधारांत टाकली असतां, पुनः सर्पासारखी भासते, तसें ज्ञान जाहल्यावर देखील चिदाभासास मी मनुष्य अशी विपरीत प्रतीति केव्हां केव्हां होते. ॥४४॥४५॥ तथापि तेवढ्या दोषामुळें तत्त्वज्ञानास धोका मुळींच नाहीं. कारण, जीवन्मुक्ति हें कांहीं व्रत नव्हे. तर ती केवळ वस्तूची खरी स्थिति आहे. ॥ ४६ ॥ पूर्वी जो दशमाचा दृष्टांत दिला आहे, तेथेंही ही गोष्ट अनुभवास येते. तो दशम " मी दशम आहें " असें समजतांच रडणें मात्र सोडून देतो. परंतु त्या दुःखानें कपाळ आपटून घेऊन, जी त्याणें जखम करून घेतली ती तात्काळ बरी होत नाहीं. ती बरी होण्यास कांहीं दिवस पाहिजेत. ॥ ४७ ॥ आतां त्या व्रणाचें दुःख त्याला कांहीं दिवस भोगावें लागेल खरें; तथापि " मी दहावा सांपडलों " या ज्ञानानें जो त्याला हर्ष झाला त्या खालीं तें सर्व दुःख गडप होतें. त्याप्रमाणें मुक्तिलाभ झाला असतां प्रारब्धानें होणारें दुःख त्या हर्षाखालीं कांहींच वाटत नाहीं. ॥ ४८ ॥ जीवन्मुक्ति ज्याअर्थी व्रत म्हणतां येत नाहीं, त्या अर्थी भ्रम झाला कीं, पुनः पुनः विवेक करावा. जसा रस सेवन करणारा एकाच दिवशीं वरचेवर खाऊन क्षुधा घालवितो. ॥ ४९ ॥ त्या दशमाचे कपाळाची खोंक जशी औषधानेंच बरी होते; त्याप्रमाणें भोगानेंच प्रारब्धाचा क्षय होतो. ॥ २५० ॥ एथपर्यंत " किमिच्छन् " इत्यादिक वरील श्रुतीच्या उत्तरार्धानें शोकनिवृत्ति, जी चिदाभासाची सहावी अवस्था, ती आह्मीं सांगितली. आतां सातवी अवस्था सांगतों. ॥ ५१ ॥ तृप्ति दोन प्रकारची.

---

नम् ॥ ४३ ॥ रज्जुज्ञानेऽपि कंपादिः शनैरेवोपशाम्यति ॥ पुनर्मंदांधकारे सा रज्जुः क्षिप्तोरगी भवेत् ॥ ४४ ॥ एवमारब्धभोगोऽपि शनैः शाम्यति नो हठात् ॥ भोगकाले कदाचित्तु मर्त्योऽहमिति भासते ॥ ४५ ॥ नैतावताऽपराधेन तत्त्वज्ञानं विनश्यति ॥ जीवन्मुक्तिव्रतं नेदं किन्तु वस्तुस्थितिः खलु ॥ ४६ ॥ दशमोऽपि शिरस्ताडं रुदन्बुद्ध्वा न रोदिति॥ शिरोव्रणस्तु मासेन शनैः शाम्याति नो तदा ॥ ४७ ॥ दशमामृतिलाभेन जातो हर्षो व्रणव्यथाम् ॥ तिरोधत्ते मुक्तिलाभस्तथा प्रारब्धदुःखिताम् ॥४८॥ व्रताभावाद्यदाऽध्यासस्तदा भूयो विविच्यताम् ॥ रससेवी दिने भुंक्ते भूयो भूयो यथा तथा ॥ ४९ ॥ शमयत्यौषधेनायं दशमः स्वं व्रणं यथा ॥ भोगेन शमयित्वैतत्प्रारब्धं मुच्यते तथा ॥२५०॥ किमिच्छन्निति वाक्योक्तः शोकमोक्ष उदीरितः ॥ आभासस्य ह्यवस्थैषा षष्ठी तृप्तिस्तु सप्तमी ॥५१॥ सांकुशा विषयैस्तृप्तिरियं

विषयलाभापासून जी तृप्ति होते तिला नाश आहे. म्हणजे तेथें आशेचा अंकूर पुन: राहतो म्हणून तिला आह्मी सांकुश असें नांव ठेवितों-परंतु जीवन्मुक्ताची तृप्ति तशी नाहीं. ती एकदां झाली म्हणजे तिचा नाशच होत नाहीं, म्हणून तिला निरंकुश अशी संज्ञा आहे. आत्मज्ञांनानें मनुष्यास असें वाटतें कीं, मीं करावयाचें तें केलें, आणि मिळवायाचें मिळविलें. ॥ ॥ ५२ ॥ ज्ञात्याला तत्त्वज्ञान होण्यापूर्वी ऐहिक ह्मणजे या लोकीं सुखप्राप्ति आणि दु:खनिवृत्तीकारितां कृषि वाणिज्य इत्यादिक, व आमुष्मिक ह्मणजे स्वर्गलोकप्राप्तीकरितां यज्ञ व उपासनादिक, व मोक्षसाधन जें ज्ञान त्याच्या प्राप्तीकरतां श्रवण मनन निदिध्यासनादिक; या प्रकारेंकरून बहुप्रकारचें कर्म कर्तव्य होतें. आणि आतां तर त्यास संसारसुखाची इच्छा नाहीं म्हणून व ब्रह्मानंद साक्षात्काराची सिद्धि झाली आहे, म्हणून तें सर्व त्यानें केल्यासारखेंच आहे आतां त्याला कांहीं कर्तव्य उरलें नाहीं. ॥ ५३ ॥ याप्रमाणें पूर्वीची स्थिति आठवून आपलें कृतकृत्यत्व नित्य मनांत आणून तो नित्य तृप्त राहतो. ॥ ५४ ॥ तो आपली धन्यता याप्रमाणें मानतो. अज्ञानी लोक दु:खी होत्साते पुत्रादिकांची अपेक्षा करून, संसार करणार तर करीत नां बापडे. मी परमानंदानें पूर्ण असल्यामुळें मला कोणतीच इच्छा नाहीं. मग मी संसार कशास करूं ॥ ५५ ॥ ज्यांना परलोकची इच्छा असेल ते यज्ञदानादिक कर्में खुशाल करोत. मी सर्वव्यापक असल्यामुळें मी नाहीं असा लोकच नाहीं; मग तीं कर्में घेऊन करावयाचीं काय ? ॥ ५६ ॥ जे अधिकारी असतील त्यांणीं वेदशास्त्रें खुशाल पढावीं व पढवावींत. मी मुळींच अक्रिय झालों मग मला अधिकार कुठला ? ॥ ५७ ॥ निद्रा, भिक्षा, स्नान, शौच इत्यादिक कर्में मी इच्छितही नाहीं व करीतही नाहीं. जवळच्या पाहणारांना मी कर्में करितोंसें वाटेल, तर वाटेना बापडे. त्यांस तसें वाटल्यानें मला काय होणार ? ॥ ५८ ॥ ज्याप्रमाणें गुंजांच्या राशींस दुसऱ्यांनी अग्नि ह्मटल्यानें ती जाळूं शकत नाहीं, त्याप्रमाणें मी

---

तृप्तिर्निरंकुशा ॥ कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव तृप्यति ॥५२॥ ऐहिकामुष्मिकव्रातसिद्ध्यै मुक्तेश्च सिद्धये ॥ बहु कृत्यं पुराऽस्याभूत्तत्सर्वमधुना कृतम् ॥ ५३ ॥ तदेतत्कृतकृत्यत्वं प्रतियोगिपुरःसरम् ॥ अनुसंदधदेवायमेवं तृप्यति नित्यशः ॥ ५४ ॥ दुःखिनोऽज्ञाः संसरंतु कामं पुत्राद्यपेक्षया ॥ परमानंदपूर्णोऽहं संसरामि किमिच्छया ॥ ५५ ॥ अनुतिष्ठन्तु कर्माणि परलोकयियासवः ॥ सर्वलोकात्मकः कस्मादनुतिष्ठामि किं कथम् ॥ ५६ ॥ व्याचक्षतां ते शास्त्राणि वेदानध्यापयंतु वा ॥ येऽत्राधिकारिणो मे तु नाधिकारोऽक्रियत्वतः ॥ ५७ ॥ निद्राभिक्षे स्नानशौचे नेच्छामि न करोति च ॥ द्रष्टारश्चेत्कल्पयंति किं मे स्यादन्यकल्पनात् ॥५८॥ गुंजापुंजादि दह्येत नान्यारोपितवन्हिना॥नान्यारोपितसंसारधर्मा-

संसार करितों असें दुसऱ्यांनीं म्हटलें तरी त्याचा स्पर्श मला लागत नाहीं. ॥ ५९ ॥ ज्यांना ब्रह्मतत्त्व समजलें नाहीं ते खुशाल श्रवण करोत. मला तें तत्त्व पक्कें समजल्यावर मीं तें कां करावें ? तसेंच आत्मस्वरूपाविषयीं ज्यांचे मनांत वारंवार संशय येतात, त्यांनीं मनन करावें. माझें ज्ञान निःसंशय झाल्यावर मला त्याचें काय प्रयोजन ? ॥ २६० ॥ ज्याला देहात्मबुद्धि वारंवार होते त्यानें निदिध्यास करावा मला तसा विपर्यय मुळींच होत नाहीं, मग निदिध्यासाची खटपट तरी कशाला ? ॥ ६१ ॥ आतां मी मनुष्य असा केव्हां केव्हां व्यवहार घडतो, परंतु तो विपर्यासामुळें नव्हे. त्याचें कारण अनेक जन्माचा संस्कारच होय. ॥६२॥ प्रारब्धकर्माचा क्षय झाला ह्मणजे हा व्यवहार आपोआप नाहींसा होतो. परंतु त्या कर्माचा क्षय न होतां आह्मीं शेंकडों वर्षें ध्यान केलें तरी तें व्यर्थ आहे. ॥ ६३ ॥ आतां, व्यवहाराचा अडथळा झाल्यामुळें तो कमी व्हावा अशी ज्याला इच्छा असेल त्यानें खुशाल ध्यान करावें. पण मला जर त्याचा मुळींच अडथळा वाटत नाहीं, तर त्याची मला काय गरज आहे ? ॥ ६४ ॥ मनांत मध्यें मध्यें विक्षेप येतो, तो न यावा ह्मणून समाधि लावावयाचा. तो विक्षेपच जर माझा गेला तर तो समाधि तरी कशाला पाहिजे. कारण, विक्षेप आणि समाधि हे दोन्ही मनाचेच धर्म आहेत. आणि मला तर तें मन मुळींच नाहीं, मग विक्षेप कोठून असणार ? ॥६५॥ आतां अनुभव येण्याकरितां समाधि करावा असें जर म्हणावें तर मीच अनुभवरूप आहें. मग मला दुसरा आणखी अनुभव तो कोठून व्हावा ? जें करावयाचें तें मीं केलें. आणि मिळवावयाचें तें मिळविलें, असा माझा पक्का निश्चय झाला आहे. ॥६६॥ माझा व्यवहार प्रारब्धानुरूप कसा तरी चालो, मग तो लौकिकी असो किंवा शास्त्रीय असो, कसाही असो; मी स्वतः अकर्ता असून मला कर्माचा मुळींच लेप नाहीं. ॥ ६७ ॥ किंवा मी जरी कृतकृत्य झालों; तरी लो-

---

नेवमहं भजे ॥ ५९ ॥ शृण्वंत्वज्ञाततत्त्वास्ते जानन्कस्माच्छृणोम्यहम् ॥ मन्यंतां संशयापन्ना न मन्येऽहमसंशयः ॥ २६० ॥ विपर्यस्तो निदिध्यासेत्किं ध्यानमविपर्ययात् ॥ देहात्मत्वविपर्यासं न कदाचिद्भजाम्यहम् ॥ ६१ ॥ अहं मनुष्य इत्यादिव्यवहारो विनाऽप्यमुम् ॥ विपर्यासं चिराभ्यस्तवासनातोऽवकल्पते ॥६२॥ प्रारब्धकर्मणि क्षीणे व्यवहारो निवर्तते ॥ कर्माक्षये त्वसौ नैव शाम्येद्ध्यानसहस्रतः ॥ ६३ ॥ विरलत्वं व्यवहृतेरिष्टं चेद्ध्यानमस्तु ते ॥ अबाधिकां व्यवहृतिं पश्यन् ध्यायाम्यहं कुतः ॥६४॥ विक्षेपो नास्ति यस्मान्मे न समाधिस्ततो मम ॥ विक्षेपो वा समाधिर्वा मनसः स्याद्विकारिणः ॥ ६५ ॥ नित्यानुभवरूपस्य को मे वाऽनुभवः पृथक् ॥ कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव निश्चयः ॥ ६६ ॥ व्यवहारो लौकिको वा शास्त्रीयो वाऽन्यथाऽपि वा ॥ ममाकर्तुरलेपस्य यथाऽऽरब्धं प्रवर्ततान् ॥ ६७ ॥ अथवा कृतकृ-

कांनीं मला पाहून चांगल्या रीतीनें आचरण करावें, या हेतूनें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मी वागेन त्यांत तरी माझा काय तोटा होणार ? ॥ ६८ ॥ हें माझें शरीर देवाची पूजा करो, स्नान करो; शौचभिक्षादि कर्मै करो; ही माझी वाणी प्रणवाचा जप करो; किंवा उपनिषदांचें अध्ययन करो. ॥६९॥ तशीच माझी बुद्धि विष्णूचें ध्यान करो; किंवा ब्रह्मानंदीं लीन होवो; मी तर सर्वांचा साक्षी आहें. मी कांहीं करीत नाहीं व करवीतही नाहीं. ॥ २७० ॥ याप्रमाणें कर्मठ व ज्ञानी यांचे विषय पूर्वापर समुद्राप्रमाणें एकमेकांपासून अगदीं भिन्न असल्यामुळें, त्या दोघांच्या कलहास कारणच उरलें नाहीं. ॥ ७१ ॥ कर्मठाचा विषय देह, वाणी आणि बुद्धि या तिहींमध्यें काय तो आहे. साक्षीकडे त्याचा कांहीं संबंध नाहीं. आणि ज्ञान्याचा विषय साक्षीचें अलेपत्व हाच होय. त्यांना देहादिकांकडे जाण्याची गरज नाहीं. ॥ ७२ ॥ असें असून परस्परांविषयीं गैर समजूत होऊन बहिऱ्याप्रमाणें ते व्यर्थ कलह करितात. शहाणा जो आहे तो त्या कलहांत शिरत नाहीं. उगीच पाहून त्याचे वेडेपणास हंसतो. ॥७३॥ ज्या साक्षीचें ज्ञान कर्मठ पुरुषास मुळींच नाहीं तो साक्षी ब्रह्म आहे असें तत्त्ववेत्ता समजत असेल, तर त्यांत कर्मठाचें काय गांठोडें जातें ? ॥ ७४ ॥ तसेंच ज्ञान्यानें जीं देह आणि बुद्धि इत्यादि हीं सर्व खोटीं ह्मणून मुळींच सोडून दिलीं, त्यांच्या साहाय्यानें कर्मठ पुरुष कर्म करील, तर त्यांत ज्ञान्याचें तरी काय जातें ? ॥ ७५ ॥ आतां ज्ञान्याला कर्माचें प्रयोजनच नाहीं; तर त्याची कर्माविषयीं वृत्ति कां असावी ? असें कोणी पुसेल तर त्याला आह्मी उलट पुसतों कीं,त्याचेठायीं त्याला निवृत्ति तरी कां असावी? ज्ञानाकरितां निवृत्ति पाहिजे असें तो ह्मणेल तर जिज्ञासेकरितां प्रवृत्तिही पाहिजे असें आह्मी ह्मणतों. ॥ ७६ ॥ ज्ञान झाल्यावर जिज्ञासा कशी राहील

---

त्योऽपि लोकानुग्रहकाम्यया ॥ शास्त्रीयेणैव मार्गेण वर्तेऽहं का मम क्षतिः ॥ ६८ ॥ देवार्चनस्नानशौचभिक्षादौ वर्ततां वपुः ॥ तारं जपतु वाक् तद्वत्पठत्वाम्नायमस्तकम् ॥६९॥ विष्णुं ध्यायतु धीर्यद्वा ब्रह्मानंदे विलीयताम् ॥ साक्ष्यहं किंचिदप्यत्र न कुर्वे नापि कारये ॥२७०॥ एवं च कलहः कुत्र संभवेत्कर्मिणो मम ॥ विभिन्नविषयत्वेन पूर्वापरसमुद्रवत् ॥७१॥ वपुर्वाग्धीषु निर्बंधः कर्मिणो न तु साक्षिणि ॥ ज्ञानिनः साक्ष्यलेपत्वे निर्बंधो नेतरत्र हि ॥ ७२ ॥ एवं चान्योन्यवृत्तांतानभिज्ञौ बधिराविव ॥ विवदेतां बुद्धिमंतो हसंत्येव विलोक्य तौ ॥७३॥ यं कर्मी न विजानाति साक्षिणं तस्य तत्त्ववित् ॥ ब्रह्मत्वं बुध्यतां तत्र कर्मिणः किं विहीयते॥७४॥ देहवाग्बुद्धयस्त्यक्ता ज्ञानिनाऽनृतबुद्धितः ॥ कर्मी प्रवर्तयत्वाभिर्ज्ञानिनो हीयतेऽत्र किम् ॥७५॥ प्रवृत्तिर्नोपयुक्ता चेन्निवृत्तिः कोपयुज्यते ॥ बोधहेतुर्निवृत्तिश्चेद्बुभुत्सायां तथेतरा ॥ ७६ ॥ बुद्धश्चेन्न बुभुत्सेत नाप्यसौ बुध्यते पुनः ॥ अबाधादनुवर्तेत बोधो न त्व-

असें तो ह्मणेल तर एकदां ज्ञान झाल्यावर पुनः ज्ञान कसचें असें आम्हीही विचारितों. ज्ञान स्थिर राहण्याला, तें निःसंशय झाल्यावर, दुसऱ्या साधनाची जरूर नाहीं. ॥ ७७ ॥ या ज्ञानाची बाधा करण्यास अविद्याही समर्थ नाहीं, व तिचें कार्य जें जगत् तेंही समर्थ नाहीं. कारण पूर्वींच तत्त्वबोधानें त्या दोन्हींचाही समग्र नाश झालेला आहे. ॥ ७८ ॥ आतां हें बाधित द्वैत डोळ्यांना दिसलें तर दिसेना बापडें. तेणेंकरून ज्ञानाला मुळींच धक्का नाहीं. जिवंत उंदीर जर मांजराला मारण्यास समर्थ नाहीं, तर मेलेला उंदीर त्याला कसा मारील ? ॥ ७९ ॥ जो पाशुपतास्त्राला देखील दाद देत नाहीं, त्याच्या अंगाला निष्फळ बाणांनीं काय होणार ? ॥२८०॥ पूर्वी अभ्यासकाळीं आपल्यापासून उत्पन्न झालेल्या नानाप्रकारच्या कार्यांहींकरून विस्तार पावलेल्या अविद्येबरोबर लढाई करून बोधाला जय मिळून तो सुदृढ झाल्यावर त्याला तिजपासून कसची बाधा होणार आहे ? ॥ ८१ ॥ आतां अज्ञान व त्याचीं कार्यें हीं केवळ प्रेतें होऊन पडलीं राहोत. त्यांपासून आतां मुळींच भीति नाहीं. इतकेंच नव्हे, तर बोधराजाच्या कीर्तीचीं तीं स्मारक कृत्येंच ह्मटलीं पाहिजेत. ॥ ८२ ॥ अशा प्रकारचा शूर बोधराजा ज्याच्या हृदयमंदिरीं नेहमीं वास करितो, त्याला शारीर अथवा मानसिक कर्मांच्या प्रवृत्तीनें किंवा निवृत्तीनें काय होणार आहे ? ॥ ८३ ॥ कर्माविषयीं प्रवृत्ति असावी असा आग्रह ज्ञानहीन पुरुषालाच योग्य आहे. कारण, तशा लोकांनीं स्वर्गमोक्षाकरितां यत्न केलाच पाहिजे. ॥ ८४ ॥ अशा ज्ञानहीन पुरुषामध्यें जेव्हां एखाद्या तत्त्ववेत्या पुरुषाला रहावें लागतें, तेव्हां तो आपल्या कायीक, वाचिक व मानसिक सर्व क्रिया त्यांना अनुसरून करितो. ॥ ८५ ॥ आणि जेव्हां ममुक्षूंमध्यें त्याला रहावें लागतें, तेव्हां त्यास ज्ञान व्हावें म्हणून त्याच्या क्रियेस दूषण

---

न्यसाधनात् ॥ ७७ ॥ नाविद्या नापि तत्कार्यं बोधं बाधितुमर्हति ॥ पुरैव तत्त्वबोधेन बाधिते ते उभे यतः ॥ ७८ ॥ बाधितं दृश्यतामक्षैस्तेन बाधो न शक्यते ॥ जीवन्नाखुर्न मार्जारं हंति हन्यत्कथं मृतः ॥ ७९ ॥ अपिपाशुपतास्त्रेण विद्धश्चेन्न ममार यः॥ निष्फलेषु विनुन्नांगो नंक्ष्यतीत्यत्र का प्रमा ॥ २८० ॥ आदावविद्यया चित्रैः स्वकार्यैर्जृंभमाणया ॥ युद्ध्वा बोधोऽजयत्सोऽद्य सुदृढो बाध्यता कथम् ॥ ८१ ॥ तिष्ठंत्वज्ञानतत्कार्यशवबोधेन मारिताः ॥ न भीतिर्बोधसम्राजः कीर्तिः प्रत्युत तस्य तैः ॥ ८२ ॥ य एवमतिशूरेण बोधेन न वियुज्यते ॥ प्रवृत्त्या वा निवृत्त्या वा देहादिगतयाऽस्य किम् ॥ ८३ ॥ प्रवृत्तावाग्रहो न्याय्यो बोधहीनस्य सर्वथा ॥ स्वर्गाय वाऽपवर्गाय यतितव्यं यतो नृभिः ॥८४॥ विद्वांश्चेत्तादृशां मध्ये तिष्ठेत्तदनुरोधतः ॥ कायेन मनसा वाचा करोत्येवाखिलाः क्रियाः ॥ ८५ ॥ एष मध्ये बुभुत्सूनां यदा ति-

देऊन आपणही क्रिया टाकितो. ॥ ८६ ॥ ज्ञान्याचें आचरण अज्ञान्याच्या आचरणास अनुसरून असणें हेंच योग्य. कारण, बाप हा तान्ह्या मुलाला अनुसरून वागतो. तसा हा अज्ञजनास बापासारखा आहे. ॥ ८७ ॥ लहान मुलानें बापाला शिव्या दिल्या किंवा मारलें तरी त्याला त्यापासून दुःख होत नाहीं व रागही येत नाहीं; उलटें त्याला त्याचें कौतुकच वाटतें. ॥ ८८ ॥ त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्याची मूढांनीं स्तुति केली किंवा निंदा केली तरी तो त्याची उलट निंदा किंवा स्तुति न करितां जेणेंकरून त्यांस ज्ञान होईल असेंच वर्तन ठेवितो. ॥ ८९ ॥ जेणेंकरून अज्ञान्याला बोध होईल तसेंच आचरण ज्ञान्यानें ठेवावें. कारण, ज्ञान झाल्यावर ह्या लोकीं अज्ञजनांस उपदेश करण्यावांचून दुसरें कर्तव्यच नाहीं. ॥ २९० ॥ याप्रमाणें आपली कृतकृत्यता व प्राप्तप्राप्यता स्मरून निरंतर मनांत तृप्त असतो. तो असें म्हणतो. ॥ ९१ ॥ **आर्या**—मी धन्य धन्य झालों, आत्मा प्रत्यक्ष जाणिला म्यां कीं ॥ ब्रह्मानंद कसा हा, भासे मज सम दुजा न या लोकीं ॥ १ ॥ ॥ ९२ ॥ **आ०**—मी धन्य धन्य मोठा, संसारिक दुःख मज दिसत नाहीं ॥ अज्ञान पळुनि गेलें, त्याचा गंधहि न राहिला कांहीं ॥ २ ॥ ॥ ९३ ॥ **आ०**—मी धन्य धन्य मोठा, कांहीं कर्तव्य नाहिं मज उरलें ॥ प्राप्तव्य पदरिं आलें, सद्गुरुचे चरण घट्ट मीं धरिले ॥ ३ ॥ ॥ ९४ ॥ **आ०**—मी धन्य धन्य मोठा, माझ्या तृप्तीस नाहिंहो उपमा ॥ कोठवरी वर्णावी, आतां मी पावलों स्वसुखधामा ॥ ४ ॥

---

ष्टेत्तदा पुनः ॥ बोधायैषां क्रियाः सर्वा दूषयंस्त्यजतु स्वयम् ॥ ॥ ८६ ॥ अविद्वदनुसारेण वृत्तिर्बुद्धस्य युज्यते ॥ स्तनंधयानुसारेण वर्तते तत्पिता यतः ॥ ८७ ॥ अधिक्षिप्तस्ताडितो वा बालेन स्वपिता तदा ॥ न क्लिश्नाति न कुप्येत बालं प्रत्युत लालयेत् ॥ ८८ ॥ निंदितः स्तूयमानो वा विद्वानज्ञैर्न निंदति ॥ न स्तौति किंतु तेषां स्याद्यथा बोधस्तथाऽऽचरेत् ॥ ८९ ॥ येनायं नटनेनात्र बुध्यते कार्यमेव तत् ॥ अज्ञप्रबोधान्नैवान्यत्कार्यमस्त्यत्र तद्विदः ॥२९०॥ कृतकृत्यतया तृप्तः प्राप्तप्राप्यतया पुनः॥ तृप्यन्नेवं स्वमनसा मन्यतेऽसौ निरंतरम् ॥ ९१ ॥ धन्योऽहं धन्योऽहं नित्यं स्वात्मानमंजसा वेद्मि ॥ धन्योऽहं धन्योऽहं ब्रह्मानंदो विभाति मे स्पष्टम् ॥ ९२ ॥ धन्योऽहं धन्योऽहं दुःखं सांसारिकं न वीक्षेऽद्य ॥ धन्योऽहं धन्योऽहं स्वस्याज्ञानं पलायितं क्वापि ॥९३॥ धन्योऽहं धन्योऽहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ॥ धन्योऽहं धन्योऽहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम् ॥ ९४ ॥ धन्योऽहं धन्योऽहं तृप्तेर्मे कोपमा भवेल्लोके ॥ धन्योऽहं धन्योऽहं ध-

॥ ९५ ॥ आ०–बहु जन्मिं पुण्य केलें, त्याचें फळ पक्क आजिं मज मिळलें ॥ सद्गुरुराज-कृपेनें, माझें आनंदरूप मज कळलें ॥ ५ ॥ ॥ ९६ ॥ आ०–सच्छास्त्र सद्गुरूचा, वर्णूं मी या मुखें किती महिमा ॥ ज्ञान अमोलिक किति हें, आनंदाब्धीस या नसे सीमा ॥ ६ ॥ ॥ ९७ ॥ आ०–हा तृप्तिदीप हातीं, घेउनि जो नर अहर्निशीं पाही ॥ ब्रह्मानंदसमुद्रीं, नित्यचि तो मग्न होउनी राही ॥ ७ ॥ ॥ ९८ ॥

तृप्तिदीप समाप्त.

---

न्यो धन्यः पुनः पुनर्धन्यः ॥ ९५ ॥ अहो पुण्यमहो पुण्यं फलितं फलितं दृढम् ॥ अस्य पुण्यस्य संपत्तेरहो वयमहो वयम् ॥ ९६ ॥ अहो शास्त्रमहो शास्त्रमहो गुरुरहो गुरुः ॥ अहो ज्ञानमहो ज्ञानमहो सुखमहो सुखम् ॥ ९७ ॥ तृप्तिदीपमिमं नित्यं येऽनुसंधते बुधाः ॥ ब्रह्मानंदे निमज्जंतस्ते तृप्यंति निरंतरम् ॥ ९८ ॥

इति तृप्तिदीपः

# सार्थपंचदश्याम्

## कूटस्थदीपः ।

### अष्टमं प्रकरणम् ।

या प्रकरणांत कूटस्थाचें आणि जीवाचें स्वरूप पुढील सूर्याचा दृष्टांत देऊन स्पष्ट करून दाखविलें आहे.

ज्याप्रमाणें भिंतिवर आकाशांतील सूर्याचा एक प्रकाश पडला असून त्यावरच दुसरा आरशामधील प्रतिबिंबित सूर्याचा प्रकाश पडावा, त्याप्रमाणें हा देहही दोन प्रकारच्या ज्ञानांनीं प्रकाशीत झाला आहे. पूर्वीं ब्रह्मज्ञानाचे योगानें प्रकाशित असून त्याजवर आणखी एक जीवाचा प्रकाश पडून तो विशेष स्पष्ट होतो. या दृष्टांतांत खऱ्या व खोट्या सूर्याचे दोन प्रकाश दर्शवून एक ब्रह्माचें सामान्य ज्ञान आणि दुसरें जीवाचें विशेष ज्ञान अशीं दोन ज्ञानें दर्शविलीं. येथें देहस्थानीं भिंत, कूटस्थ स्थानीं आकाशांतील सूर्य, जीवस्थानीं आरशांतील सूर्य, आणि बुद्धिस्थानीं आरसा अशीं दृष्टांताची योजना समजावी. ॥ १ ॥ अशा प्रकारच्या निरनिराळ्या आरशांचीं किरणें भिंतीवर पडलीं असतां मध्यंतरीं, किंवा तीं सर्व किरणें आरसे काढून टाकून नाहींशीं केलीं असतां सर्वत्र आकाशांतील सूर्याचा सामान्य प्रकाश स्पष्ट दिसतो. ॥ २ ॥ ज्याप्रमाणें वरील दृष्टांतांत विशेष प्रकाशापासून सामान्य प्रकाश निराळा स्पष्ट भासतो, त्याप्रमाणें चिदाभासयुक्त ज्या निरनिराळ्या बुद्धीच्या वृत्ती उठतात त्यांच्या मध्यंतरीं किंवा त्यांच्या अभावीं कूटस्थ ज्ञानाचा प्रकाश स्पष्ट भासतो, तो वाचकांनीं सूक्ष्म दृष्टीनें ध्यानांत आणावा. ॥३॥ ही देहांतील गोष्ट झाली. आतां देहाबाहेरही हीं दोन प्रकारचीं ज्ञानें तशींच अनुभवास येतात. ज्या वेळीं आह्मास घट समजतो त्या वेळीं केवळ घटापुरत्याच व्यापून असणाऱ्या बुद्धींतील चिदाभासास फक्त घटाचें मात्र ज्ञान होतें. हें चिदाभासीज्ञान समजावें, आणि तो घट मीं जाणला ही गोष्ट ज्या ज्ञानानें समजते तें ब्रह्मज्ञान असें जाणावें. पहिलें विशेष आणि दुसरें सामान्य आहे. ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञानानें जर घट समजतो तर आणखी बुद्धि ती कशाला पाहिजे? असा कोणाचा प्रश्न असेल तर त्याचें समाधान हें

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ कूटस्थदीपः ॥ खादित्यदीपिते कुड्ये दर्पणादित्यदीप्तिवत् ॥ कूटस्थभासितो देहो धीस्थजीवेन भासते ॥ १ ॥ अनेकदर्पणादित्यदीप्तीनां बहुसंधिषु ॥ इतरा व्यज्यते तासामभावेऽपि प्रकाशते ॥ २ ॥ चिदाभासविशिष्टानां तथाऽनेकधियामसौ ॥ संधिं धियामभावं च भासयन् प्रविविच्यताम् ॥३॥ घटैकाकारधीस्था चिद्घटमेवावभासयेत् ॥ घटस्य ज्ञातता ब्रह्मचैतन्येनावभासते ॥ ४ ॥ अज्ञातत्वेन ज्ञातोऽयं घटो बुद्ध्युदया-

कीं, बुद्धीवांचून घटाचें समजणें न समजणें हे भेद मुळींच संभवणार नाहींत. बुद्धि उत्पन्न होण्यापूर्वी या घटाचें ज्ञान ब्रह्मास होतें तें न समजून होतें; आणि तेंच बुद्धीचा उदय झाल्यावर ब्रह्माला त्या घटाचें ज्ञान समजून झालें, एवढाच कायतो भेद. ॥ ५ ॥ एकाच घटाला ज्ञातत्व आणि अज्ञातत्व हीं दोन्हीही कशीं संभवतात, हें ध्यानांत येण्यास ज्ञान व अज्ञान या दोहींचें स्वरूप चांगलें समजलें पाहिजे. ज्या बुद्धिवृत्तीच्या शेवटीं चिदाभास असतो अशी जी, शेवटीं पोलाद असलेल्या भाल्यासारखी वृत्ति, तेंच ज्ञान आणि ज्यांत स्फूर्ति मुळींच नाहीं, तें अज्ञान. ह्या दोहोंनीं पाळीपाळीनें घट व्याप्त होतो. ॥ ६ ॥ येथें घटाची ज्ञातता ब्रह्माला कशी समजली अशी कोणीं शंका घ्यावयास नको. अज्ञात कुंभ जसा ब्रह्माला तसा ज्ञात कुंभही ब्रह्मालाच समजतो असें ह्मणण्यास कोणती नड आहे? कारण घटाचें ज्ञातत्व उत्पन्न होतांच चिदाभासाचा क्षय होतो. तेव्हां चिदाभासास त्या घटाची ज्ञातता कशी समजेल? ॥ ७ ॥घटाची अज्ञातता जशी अज्ञानानें उत्पन्न होते तशी घटाची ज्ञातता उत्पन्न होण्यास केवळ बुद्धीचेंच साधन बस आहे. त्यांत आणखी चिदाभास कशाला पाहिजे अशी शंका घेऊं नये. कारण नुस्ति बुद्धि आणि माति या दोहोंमध्यें जाडयत्वाचे संबधानें कांहींच भेद नाहीं. ह्मणून ज्ञातता उत्पन्न होण्यास चिदाभासाची अवश्यकता आहे. ॥ ८ ॥ जसा केवळ मातीनें सारविलेला घट ज्ञात म्हणजे जाणिला असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें चिदाभासरहित केवळ बुद्धीनें व्यापिलेला घट जाणला असें म्हणतां येणार नाहीं. ॥ ९ ॥ याकरितां चिदाभासरूप फलाची जी उत्पत्ति तेंच कुंभाचें ज्ञातत्व. तें ज्ञातत्व उत्पन्न करणें हें कांहीं ब्रह्माचें काम नव्हे, कारण घट स्फुरण होण्यापूर्वीही ब्रह्म होतेंच. ॥ १० ॥ घटादीक पदार्थांचें ज्ञान होतांना ज्या ज्ञानाचा उपयोग होतो तेंच ज्ञान आमच्या वेदांत शास्त्रांत चिदाभास शब्दानें प्रसिद्ध आहे असें सुरेश्वराचार्यांचें वार्तिक आहे. ॥ ११ ॥ या वार्तिकांत जसें चिदाभासालाच घट ज्ञानाचें प्रमाणफलत्व दिलें आहे, व शंकराचार्यांच्या उपदेशसाहस्री नाम-

---

त्पुरा ॥ ब्रह्मणैवोपरिष्टात्तु ज्ञातत्वेनेत्यसौ भिदा ॥ ५ ॥ चिदाभासांतधीवृत्तिज्ञानं लोहांतकुंतवत् ॥ जाड्यमज्ञानमेताभ्यां व्याप्तः कुंभो द्विधोच्यते ॥ ६ ॥ अज्ञातो ब्रह्मणा भास्यो ज्ञातः कुंभस्तथा न किम् ॥ ज्ञातत्वजननेनैव चिदाभासपरिक्षयः ॥ ७ ॥ आभासहीनया बुद्ध्या ज्ञातत्वं नैव जन्यते ॥ तादृग्बुद्धेर्विशेषः को मृदादेः स्याद्विकारिणः ॥ ८ ॥ ज्ञात इत्युच्यते कुंभो मृदा लिप्तो न कुत्र चित् ॥ धीमात्रव्याप्तकुंभस्य ज्ञातत्वं नेष्यते तथा ॥ ९ ॥ ज्ञातत्वं नाम कुंभेऽतश्चिदाभासफलोदयः ॥ न फलं ब्रह्मचैतन्यं मानात्प्रागपि सत्त्वतः ॥ १० ॥ परागर्थप्रमेयेषु या फलत्वेन संमता ॥ संवित्सैवेह मेयोऽर्थो वेदांतोक्तिप्रमाणतः ॥११॥ इति वार्तिककारेण चित्साद्दश्यं विवक्षितम् ॥ ब्रह्मचित्फलयोर्भे-

क ग्रंथांतही ब्रह्म आणि चिदाभास यांचा भेद तसाच वर्णिला आहे. ॥ १२ ॥ याकरितां चिदाभास उत्पन्न होतांच घटाचें ज्ञातत्व उत्पन्न होतें म्हणजे घट समजतो. आणि तें ज्ञातत्व पूर्वीच्या अज्ञातत्वाप्रमाणें ब्रह्मालाच समजतें. ॥ १३ ॥ म्हणजे धीवृत्ति, चिदाभास आणि घट या तिहींचा समुदाय ब्रह्माला समजतो. आणि चिदाभासाचें काम केवळ घट स्फुरण करणें असें असल्यामुळें त्याला घट मात्र समजतो. ॥ १४ ॥ एवंच असें सिद्ध झालें कीं, घटज्ञान होतांना त्याजवर दोन प्रकारच्या ज्ञानाचे व्यापार घडतात. हें जें आह्मीं घटाची ज्ञातता समजणारें ब्रह्मज्ञान सांगितलें त्याला नैय्यायिक अनुव्यवसायाख्य ह्मणतात. ॥ १५ ॥ दोनही ज्ञानें साधारण व्यवहारांतील भाषणावरूनही समजून येतात. जेव्हां एकाद्याच्या मुखांतून हा घट असा उद्गार निघतो तेव्हां तो चिदाभास ज्ञानामुळें निघाला असें समजावें, आणि जेव्हां हा घट मला समजला असें तो ह्मणतो तेव्हां तें ब्रह्मज्ञानाचें लक्षण समजावें. ॥ १६ ॥ एथवर देहाबाहेर ब्रह्मज्ञान आणि चिदाभासज्ञान या दोहोंमधील भेद दाखविला. आतां तसाच भेद देहाचे आंतही कूटस्थ आणि चिदाभास या दोहोंचें विवेचन करून दाखवूं ॥ १७॥ ज्याप्रमाणें तापलेल्या लोखंडांत अग्नि ओतप्रोत व्यापून असतो त्याप्रमाणें अहं वृत्तींत व दुसऱ्या कामक्रोधादिक वृत्तींमध्यें चिदाभासही व्यापून असतो ॥ १८ ॥ आणि तें तापलेलें लोखंड जसें आपल्याला मात्र भासवितें तशा त्या आभासासहवर्तमान वृत्तीही आपल्यालाच भासवितात. ॥ १९ ॥ या सर्व वृत्ति क्रमानें एका मागून एक अशा उत्पन्न होतात. व सुषुप्ति, मूर्च्छा समाधि या अवस्थांमध्यें त्या सर्व लीन होतात. ॥ २० ॥ या ज्या एका मागून एक वृत्ति निघतात त्यांमधील संधी आणि त्या लीन झाल्यावर त्यांचा अभाव ज्या निर्विकार चैतन्याचे

---

दः सहस्र्यां विश्रुतो यतः ॥ १२ ॥ आभास उदितस्तस्माज्ज्ञातत्वं जनयेद्घटे ॥ तत्पुनर्ब्रह्मणाभास्यमज्ञातत्ववदेव हि ॥ १३ ॥ धीवृत्त्याभासकुंभानां समूहो भास्यते चिता ॥ कुंभमात्रफलत्वात्स एक आभासतः स्फुरेत् ॥ १४ ॥ चैतन्यं द्विगुणं कुंभे ज्ञातत्वेन स्फुरत्यतः ॥ अन्येऽनुव्यवसायाख्यामाहुरेतद्यथोदितम् ॥ १५ ॥ घटोऽयमित्यसावुक्तिराभासस्य प्रसादतः ॥ विज्ञातो घटइत्युक्तिर्ब्रह्मानुग्रहतो भवेत् ॥ १६ ॥ आभासब्रह्मणी देहाद्बहिर्यद्वद्विवेचिते ॥ तद्वदाभासकूटस्थौ विविच्येतां वपुष्यपि ॥ १७ ॥ अहंवृत्तौ चिदाभासः कामक्रोधादिकासुच ॥ संव्याप्य वर्तते तप्ते लोहे वन्हिर्यथा तथा ॥ १८ ॥ स्वमात्रं भासयेत्तप्तं लोहं नान्यत्कदाचन ॥ एवमाभाससहिता वृत्तयः स्वस्वभासिकाः ॥ १९ ॥ क्रमाद्विच्छिद्य विच्छिद्य जायन्ते वृत्तयोऽखिलाः ॥ सर्वा अपि विलीयंते सुप्तिमूर्च्छासमाधिषु ॥ २० ॥ संधयोऽखिलवृत्तीनामभावाश्चावभासिताः ॥ निर्विकारेण येनासौ कूटस्थ

योगानें समजतात, त्याला कूटस्थ असें ह्मणतात. ॥ २१ ॥ ज्याप्रमाणें बाहेर घटाचेठायीं एक घट मात्र समजविणारें चिदाभासज्ञान आणि दुसरें घटाची ज्ञातता समजविणारें ब्रह्मज्ञान अशीं दोन ज्ञानें आहेत, त्याप्रमाणें शरीरांचे आंतल्या बाजूसही दोन चैतन्यें आहेत; ह्मणजे एक कूटस्थज्ञान आणि दुसरें चिदाभासज्ञान. त्यामुळें मधील संधीपेक्षां वृत्ती अधिक स्पष्ट भासतात. ॥२२॥ आतां घटाचेठायीं एकदां अज्ञातता आणि एकदां ज्ञातता या जशा संभवतात तशा वृत्तीचेठायीं मात्र त्या संभवत नाहींत. कारण, त्या स्वप्रकाशक असल्यामुळें तेथें ज्ञानव्याप्तीची गरजच नाहीं. आणि जेथें ज्ञानव्याप्तीची गरज नाहीं तेथें अज्ञानाचाही संभव नाहीं. ॥ २३ ॥ हीं जीं देहाच्या आंतील दोन चैतन्यें सांगितलीं तीं दोनही जरी स्वप्रकाशक असलीं तरी त्यांपैकीं एकास जन्मनाश आहेत असा अनुभव असल्यामुळें तें कूटस्थ नव्हे, आणि दुसरें अविकारी असें प्रत्यक्ष समजल्यामुळें तें कूटस्थ होय. ॥ २४ ॥ हें सांगणें आमचे पदरचें नव्हे. अंतःकरण तद्वृत्ति साक्षी चैतन्य विग्रह इत्यादि वचनांहींकरून पूर्वाचार्यांनीं कूटस्थाचा निवाडा असाच केला आहे. ॥ २५ ॥ ज्याप्रमाणें मुख, आरसा व त्यांत पडलेलें प्रतिबिंब या तीन वस्तु जगांत दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें कूटस्थ, चिदाभास आणि बुद्धि या तीन वस्तु देहांत समजाव्या. अशा रीतीनें वर्णन चिदाभासाचेंही केलें आहे. ॥ २६ ॥ आतां असा एक पूर्व पक्ष आहे कीं, जसें घटद्वारा घटावच्छिन्न आकाशास जाणें येणें संभवतें, तसा बुद्ध्यवच्छिन्नकूटस्थालाही लोकांतरीं जाणें येणें संभवतें. मग आगखी चिदाभासाची निराळी कल्पना कशाला पाहिजे. ॥ २७ ॥ याजवर आमचें असें उत्तर आहे कीं, केवळ परिच्छेदानेंच हा असंग कूटस्थ जीव होऊं शकत नाहीं. कारण, तसें जर होईल तर काष्ठपाषाणांहीं करून आच्छादिलेला कूटस्थ सर्वत्र असल्यामुळें सर्व जड पदार्थांत असलेल्या कूटस्थास जीव ह्मणावें लागेल. ॥ २८ ॥ तर आतां याजवरही अशी एक कोटी आहे

---

इति चोच्यते ॥ २१ ॥ घटे द्विगुणचैतन्यं यथा बाह्ये तथांऽतरे ॥ वृत्तिष्वपि ततस्तत्र वैशद्यं संधितोऽधिकम् ॥ २२ ॥ ज्ञातताज्ञातते न स्तो घटवद्वृत्तिषु क्वचित् ॥ स्वस्य स्वेनागृहीतत्वात् ताभिश्चाज्ञाननाशनात् ॥ २३ ॥ द्विगुणीकृतचैतन्ये जन्मनाशानुभूतितः ॥ अकूटस्थं तदन्यत्तु कूटस्थमविकारतः ॥ २४ ॥ अंतःकरणतद्वृत्तिसाक्षीत्यादावनेकधा ॥ कूटस्थ एव सर्वत्र पूर्वाचार्यैर्विनिश्चितः ॥ २५ ॥ आत्माभासाश्च याश्चैवं मुखाभासाश्रया यथा ॥ गम्यंते शास्त्रयुक्तिभ्यामित्याभासश्च वर्णितः ॥ २६ ॥ बुद्ध्यवच्छिन्नकूटस्थो लोकांतरगमागमौ ॥ कर्तुं शक्तो घटाकाश इवाभासेन किं वद ॥ २७ ॥ शृण्वसंगः परिच्छेदमात्राज्जीवो भवेन्न हि ॥ अन्यथा घटकुड्याद्यैरवच्छिन्नस्य जीवता ॥ २८ ॥ न कुड्यसदृशी बुद्धिः स्वच्छत्वादिति चेत्तथा ॥ अस्तु नाम प-

कीं, बुद्धि ही लकलकीत आहे. पण भिंत तशी नाहीं. ह्मणून भिंत आणि बुद्धि एकच म्हणणें बरोबर नाहीं. याजवर आमचें असें उत्तर कीं, स्वच्छत्वाच्या संबंधानें त्या दोहोंमध्यें जरी भेद आहे, तरी परिच्छेदाच्या संबंधानें तीं दोन्हीही एकच आहेत. ॥ २९ ॥ यास दृष्टांत धान्य मोजण्याचीं दोन मापें आहेत. एक लांकडाचें व दुसरें कांशाचें. या दोन्ही मापांनीं तंदुलादिक धान्यें मोजलीं असतां या मापामुळें धान्यांत मुळींच फरक नाहीं. ॥ ३० ॥ तर कांशाच्या मापानें मापांत जरी फेर पडला नाहीं तरी तें लकलकीत असल्यामुळें त्यांत प्रतिबिंब पडतें एवढा भेद आहे. त्याप्रमाणें बुद्धीमध्येंही ती स्वच्छ असल्यामुळें चिदाभासही तिजबरोबर असलाच पाहिजे. ॥ ३१ ॥ प्रतिबिंब आणि आभास हे दोन्ही एकच आहेत. कारण, आभास ह्मणजे नसून कांहीं वेळ भासणें, आणि प्रतिबिंब ह्मणजे जें बिंबलक्षणरहित असून बिंबासारखें भासतें. ॥ ३२ ॥ हें लक्षण चिदाभासास बरोबर लागू पडतें. चिदाभास ससंग आणि विकारी असल्यामुळें बिंब जें ब्रह्म त्याच्या लक्षणाचा एथें अभाव झाला आणि चिदाभास स्फुरणरूप असल्यामुळें तें त्याचें बिंबाप्रमाणें भासणें होय. ॥ ३३ ॥ येथवर चिदाभास अवश्य आहे इतकें सिद्ध झालें. आतां कोणी ह्मणेल बुद्धीच्या कल्पनेवर त्याची कल्पना जर अवलंबून आहे तर बुद्धीपासून चिदाभास निराळा घेण्याचें कारण नाहीं; तर त्यास आह्मीं असें म्हणतों कीं, इतक्यावरच कां थांबावें ? त्या दृष्टीनें पाहिलें असतां देहापासूनही बुद्धि निराळी नाहीं असें ह्मणावें लागेल. ॥ ३४ ॥ यावर प्रतिवाद्याचें उत्तर येवढेंच कीं, देह नष्ट झाला तरी बुद्धि मागें राहते असें शास्त्रांत प्रमाण आहे. तर त्यावर आमचेंही तसेंच उत्तर आहे कीं, जसें त्याविषयीं शास्त्रांत प्रमाण आहे, तसें बुद्धीपासून चिदाभास निराळा आहे अशाविषयींही प्रवेश श्रुतींत प्रमाण आहे. ॥ ३५ ॥ हा जो चिदाभासाचा प्रवेश श्रुतीमध्यें सांगितला आहे तो बुद्धिसहित प्रवेश अशी कोणीं शंका घेण्याचें कारण नाहीं, कारण ऐतरेय श्रुतींत बुद्धीपासून

---

रिच्छेदे किं स्वाच्छयेन भवेत्तव ॥ २९ ॥ प्रस्थेन दारुजन्येन कांस्यजन्येन वा न हि ॥ विक्रेतुस्तंडुलादीनां परिमाणं विशिष्यते ॥ ३० ॥ परिमाणाविशेषेऽपि प्रतिबिंबो विशिष्यते ॥ कांस्ये यदि तदा बुद्धावप्याभासो भवेद्बलात् ॥ ३१ ॥ ईषद्भासनमाभासः प्रतिबिंबस्तथाविधः ॥ बिंबलक्षणहीनः सन् बिंबवद्भासते स हि ॥ ३२ ॥ ससंगत्वविकाराभ्यां बिंबलक्षणहीनता ॥ स्फूर्तिरूपत्वमेतस्य बिंबवद्भासनं विदुः ॥ ३३ ॥ नहि धीभावभावित्वादाभासोऽस्ति धियः पृथक् ॥ इति चेदल्पमेवोक्तं धीरप्येवं स्वदेहतः ॥ ३४ ॥ देहे मृतेऽपि बुद्धिश्चेच्छास्त्रादस्ति तथा सति ॥ बुद्धेरन्यश्चिदाभासः प्रवेशश्रुतिषु श्रुतः ॥ ३५ ॥ धीयुक्तस्य प्रवेशश्चेन्नैतरेये धियः पृथक् ॥ आत्मा प्रवेशं संकल्प्य प्र-

निराळा असा जो आत्मा तो प्रवेश करता झाला असे स्पष्ट सांगितलें आहे ॥ ३६ ॥ त्या प्रवेश श्रुतीचा अर्थ असा आहे कीं, देहेंद्रियांसहवर्तमान हें जडजात मजवांचून कसें टिकेल, असा विचार मनांत आणून हा जीवात्मा कपालत्रयाचा मध्यभाग चिरून आंत प्रविष्ट होऊन संसार करितो. ॥ ३७ ॥ आतां परमात्मा असंग असून त्याणें प्रवेश कसा केला अशी कोणाची शंका असेल, तर त्यास आह्मी असें विचारतों कीं, त्याणें सृष्टि तरी कशी केली? त्याणें सृष्टि मायेचे योगानें केली, तर प्रवेश तसाच केला असें ह्मणण्यास कोणती हरकत आहे? दोन्ही गोष्टींस मायिकत्व आणि नाश हीं समानच आहेत ॥ ३८ ॥ औपाधिक रूपाला नाश आहे एतद्विषयीं श्रुतीमध्यें याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयीस स्पष्ट सांगितलें आहे. तें असें कीं, परमात्मा या पंचभूतात्मक शरीरापासून निघून जाऊन त्याबरोबर नाश पावतो ॥ ३९ ॥ त्याप्रमाणेंच हा आत्मा अविनाशी आहे. त्याचा देहादिकाशीं मुळींच संसर्ग नाहीं असें कूटस्थाचें वर्णन श्रुतीमध्यें केलें आहे ॥ ४० ॥ तर मम " जीवापेतं वावकिल " श्रुतीवरून शरीर मेलें तरी जीव मरत नाहीं असें दिसतें. तेव्हां आमच्या बोलण्यास विरोध येतो असें कोणी ह्मणेल तर त्यास श्रुतीचा भाव समजला नाहीं असें स्पष्ट दिसतें. कारण, श्रुतीचा अर्थ जीवाचा अत्यंत नाश होतोच असें नाहीं; तर त्याचा अर्थ असा कीं, जीव हें शरीर सोडून लोकांतरास जातो म्हणजे शरीराबरोबरच याचा नाश होत नाहीं ॥ ४१ ॥ यावर अशी एक शंका आहे कीं, जीव जर विनाशी आहे तर अहंब्रह्म असें तादात्म्यज्ञान त्याला कसें होईल. कारण विनाशी आणि अविनाशी यांमध्यें विरोध आहे. तर याचें समाधान हेंच कीं, दोहोंपैकीं एकाची बाधा झाली असतांही सामानाधिकरण्य होऊं शकतें ॥ ४२ ॥ बाधा सामानाधिकरण्यानें वाक्यार्थ कसा होतो एतद्विषयीं वार्तिककारांनीं दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. एक मनुष्य मार्गानें जात असतां त्याच्यापुढें एक पुरुष उभा होता, तो खुंट आहे असें त्यास वाटलें. पुढें जवळ येऊन जों पाहतो तों त्याची स्थाणु–बुद्धि जाऊन पुरुषबुद्धि झाली. त्याचप्रमाणें मी

---

विष्ट इति गीयते ॥ ३६ ॥ कथं न्विदं साक्षदेहं मदृते स्यादितीरणात् ॥ विदार्य मूर्धसीमानं प्रविष्टःसंसरत्ययम् ॥ ३७ ॥ कथं प्रविष्टोऽसंगश्चेत्सृष्टिर्वाऽस्य कथं वद ॥ मायिकत्वं तयोस्तुल्यं विनाशश्च समस्तयोः ॥ ३८ ॥ समुत्थायैष भूतेभ्यस्तान्येवानुविनश्यति ॥ विस्पष्टमिति मैत्रेय्यै याज्ञवल्क्य उवाच हि ॥ ३९ ॥ अविनाश्ययमात्मेति कूटस्थः प्रविवेचितः ॥ मात्रासंसर्ग इत्येवमसंगत्वस्य कीर्तनात् ॥ ४० ॥ जीवापेतं वाव किल शरीरं म्रियते न सः ॥ इत्यत्र न विमोक्षोर्थः किंतु लोकांतरे गतिः ॥ ४१ नाहं ब्रह्मेति बुध्येत स विनाशीति चेन्न तत् ॥ सामानाधिकरण्यस्य बाधायामपि संभवात् ॥ ४२ ॥ योऽयं स्थाणुः पुमानेष पुंधिया स्थाणुधीरिव ॥ ब्रह्मास्मीति धिया शेषाप्यहंबुद्धिर्निव-

ब्रह्म असें ज्ञान होतांच मी जीव हें ज्ञान नष्ट होतें ॥ ४३ ॥ नैष्कर्म्य सिद्धिनामक ग्रंथामध्यें आचार्यांनीं सामानाधिकरण्यामध्यें बाधेचा संभव आहे, असें स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून ब्रह्मास्मि या वाक्यालाही तो नियम लागू करण्यास कोणचीच हरकत दिसत नाहीं ॥ ४४ ॥ श्रुतीमध्यें " सर्व ब्रह्म " या वाक्यानें ब्रह्म आणि जग या दोहोंचें सामानाधिकरण्य म्हणजे ऐक्य होतें. तसेंच अहंब्रह्म या वाक्यानें जीव आणि ब्रह्म यांचें ऐक्य होतें ॥ ४५ ॥ विवरण नामक ग्रंथामध्यें आचार्यांनीं सामानाधिकरण्यामध्यें बाधा करण्याची गरज नाहीं असें म्हटलें आहे, तें केवळ अहं शब्दाचा अर्थ कूटस्थ असें समजून म्हटलें आहे ॥ ४६ ॥ म्हणजे बुद्ध्यादिकांपासून विवेचन केलेला जो त्वंपदवाच्य कूटस्थ त्याला ब्रह्माचीं सत्यत्वादि लक्षणें लागतात म्हणून कूटस्थच ब्रह्म आहे असें विवरणांत व दुसऱ्या ग्रंथांत ठरविलें आहे. ॥४७॥ देहेंद्रियादियुक्त जो चिदाभास तो ज्या अधिष्ठान चैतन्यावर आह्माला भ्रमानें दिसतो, त्या चैतन्याला कूटस्थ असें आह्मीं नांव ठेविलें. ॥ ४८ ॥ आणि ज्या अधिष्ठानावर भ्रमानें सर्व जग दिसत आहे त्या अधिष्ठानास वेदांतांत ब्रह्म असें नांव ठेविलें आहे ॥ ४९ ॥ ह्या ब्रह्मचैतन्यावर सर्व जगाचा आरोप जर आहे तर त्या जगाचा एक अंश जो जीवाभास त्याचाही आरोप असलाच पाहिजे. ॥ ५० ॥ जग आणि जीव या दोन उपाधींमध्यें भेद असला तरी त्यांचें अधिष्ठान जें ब्रह्मचैतन्य तें एकच आहे. ॥ ५१ ॥ भ्रमामध्यें कांहीं अधिष्ठानाचे व कांहीं आरोप्याचे असे दोहोंचेही धर्म भासले पाहिजेत. हें भ्रमाचें लक्षण चिदाभास बरोबर लागू पडतें तें कसें ? तर कर्तृत्वादि बुद्धिधर्म आणि स्फुरणरूप आत्म्याचा धर्म

---

र्यते ॥ ४३ ॥ नैष्कर्म्यसिद्धावप्येवमाचार्यैः स्पष्टमीरितम् ॥ सामानाधिकरण्यस्य बाधार्थत्वमतोऽस्तु तत् ॥ ४४ ॥ सर्वं ब्रह्मेति जगता सामानाधिकरण्यवत् ॥ अहं ब्रह्मेति जीवेन सामानाधिकृतिर्भवेत् ॥ ४५ ॥ सामानाधिकरण्यस्य बाधार्थत्वं निराकृतम् ॥ प्रयत्नतो विवरणे कूटस्थस्य विवक्षया ॥ ४६ ॥ शोधितस्त्वंपदार्थो यः कूटस्थो ब्रह्मरूपताम् ॥ तस्य वक्तुं विवरणे तथोक्तमितरत्र च ॥ ४७ ॥ देहेंद्रियादि युक्तस्य जीवाभास भ्रमस्य-यम ॥ अधिष्ठानचितिः सैषा कूटस्थात्र विवक्षिता ॥ ४८ ॥ जगद्भ्रमस्य सर्वस्य यदधिष्ठानमीरितम् ॥ त्रय्यंतेषु तदत्र स्याद्ब्रह्मशब्दविवक्षितम् ॥ ४९ ॥ एतस्मिन्नेव चैतन्ये जगदारोप्यते यदा ॥ तदा तदेकदेशस्य जीवाभासस्य का कथा ॥ ५० ॥ जगत्तदेकदेशाख्यसमारोप्यस्य भेदतः ॥ तत्त्वंपदार्थौ भिन्नौ स्तो वस्तुतस्त्वेकता चितेः ॥ ५१ ॥ कर्तृत्वादीन्बुद्धिधर्मान् स्फूर्त्याख्यां चात्मरूपताम् ॥ दधद्विभाति पुरत आभासोऽतो भ्रमो

हे दोन्ही त्याचेमध्यें आहेत. ह्मणून चिदाभास हा भ्रम आहे. ॥ ५२ ॥ या भ्रमाला कारण हेंच कीं, बुद्धि ह्मणजे काय ? चिदाभास कशाला ह्मणावें ? आत्म्याचें स्वरूप कोणतें ? आणि त्यामध्यें जग कसें झालें ? या प्रश्नांचा उलगडा न होणें तोच मोह; आणि यालाच संसार असें ह्मणतात. ॥ ५३ ॥ वर सांगितलेलें जें बुद्ध्यादिकांचें स्वरूप त्याचें विवेचन ज्याणें उत्तम केलें तोच तत्त्ववेत्ता आणि तोच मुक्त असा वेदांताचा ठराव आहे. ॥ ५४ ॥ असें असून बंधमोक्ष कोणाला ? इत्यादिक तार्किक लोक पुष्कळ तर्क करितात. ते इतके आह्माला पोरकट वाटतात कीं, त्यांचीं उत्तरें देत बसणें हें केवळ व्यर्थ वेळ घालविणें आहे. त्यांचें तोंड हर्षमिश्राचार्यांनीं आपल्या खंडनग्रंथांत चांगलें बंद करून टाकिलें आहे. ॥ ५५ ॥ हें कूटस्थ विवेचन शैव पुराणांत केलेलें दृष्टीस पडतें. तेथें असें ह्मटलें आहे कीं, हा कूटस्थ सर्वकाळीं सारखा आहे. मनाच्या वृत्ती असतांना तो त्या वृत्तींचा साक्षी होऊन असतो. वृत्ती उत्पन्न होण्यापूर्वीं त्यांच्या प्रागभावाचा साक्षी होऊन असतो. मुमुक्षु-दशेंत जिज्ञासेचा साक्षी होऊन असतो. आणि अज्ञान-दशेंत मी नेणता आहें या अज्ञानाचा साक्षी होऊन राहतो. ॥ ५६ ॥ तो साक्षी सच्चिदानंदरूप आहे. त्याची सिद्धता अशी.—जें असत्याचें अधिष्ठान असतें तें सत्य. हा साक्षी असत्य जगाचें अधिष्ठान आहे म्हणून तो सद्रूप आहे. जो जडास भासविणारा तो चिद्रूप साक्षी. जडास भासवितो म्हणून तो चिद्रूप आहे. ज्याजवर सदां सर्वदां प्रेम जडलेलें असतें तो आनंदरूप. साक्षीवर नेहमीं आमचें प्रेम आहे म्हणून तो आनंदरूप. आणि ज्याच्या योगानें सर्व पदार्थांची सिद्धि होऊन ज्याचा सर्व पदार्थांशीं संबंध असतो तो पूर्ण. आमचा साक्षीही तसाच आहे म्हणून तोही पूर्ण आहे. ( याप्रमाणें आत्मा हा सच्चिदानंद परिपूर्ण शिवरूपी आहे हें सिद्ध झालें. ) ॥ ५७ ॥ ॥ ५८ ॥ याप्रमाणें शैव पुराणामध्यें जीवेश कल्पनारहित स्वयंप्रकाश शिवस्वरूपी कूटस्थाचें विवेचन केलें आहे.॥५९॥

---

भवेत् ॥५२॥ का बुद्धिः कोऽयमाभासः को वात्माऽत्र जगत्कथम्॥ इत्यनिर्णयतो मोहः सोऽयं संसार इष्यते ॥ ५३ ॥ बुध्यादीनां स्वरूपं यो विविनक्ति स तत्त्ववित्॥ स एव मुक्त इत्येव वेदांतेषु विनिश्चयः ॥ ५४ ॥ एवं च सति बंधः स्यात्कस्येत्यादिकुतर्कजाः ॥ विडंबना दृढं खंड्याः खंडनोक्तिप्रकारतः ॥ ५५ ॥ वृत्तेः साक्षितया वृत्तिप्रागभावस्य च स्थितः ॥ बुभुत्सायां तथाऽज्ञोऽस्मीत्याभासाज्ञानवस्तुनः ॥ ५६ ॥ असत्यालंबनत्वेन सत्यः सर्वजडस्य तु ॥ साधकत्वेन चिद्रूपः सदा प्रेमास्पदत्वतः ॥ ५७ ॥ आनंदरूपः सर्वार्थसाधकत्वेन हेतुना॥ सर्वसंबंधवत्त्वेन संपूर्णः शिवसंज्ञितः ॥ ५८ ॥ इति शैवपुराणेषु कूटस्थः प्रविवेचितः ॥ जीवेशत्वादिरहितः केवलः स्वप्रभः शिवः॥ ५९॥

माया ही प्रतिबिंबाच्या योगानें जीव आणि ईश या दोघांना करिते, असें श्रुतींत सांगितलें आहे. त्यावरून ते दोघेही मायिक ठरतात. त्यामध्यें आणि देहादिकांमध्यें अंतर म्हणून इतकेंच कीं, ते स्वच्छ आहेत आणि देहादिक मळीण आहेत. कीं जसें कांचेचा घट आणि मातीचा घट. ॥ ६० ॥ ज्याप्रमाणें मन आणि देह हीं दोन्ही अन्नापासून झालेलीं असून मन स्वच्छ आहे आणि देह मलीन आहे, त्याप्रमाणें जीव आणि ईश हें मायिक असूनही इतर पदार्थांपेक्षां ते स्वच्छ आहेत. ॥ ६१ ॥ त्यांत चैतन्यही आमच्या अनुभवास येतें म्हणून तें चिद्रूप आहे, हें कसें म्हणून कोणीं विचारूं नये. कारण, पाहिजे ती कल्पना करण्यास समर्थ अशी जी माया तिला कोणती गोष्ट अशक्य आहे ॥६२॥ किंबहुना आमची निद्रा देखील स्वप्नाचेठायीं चेतनरूप जीवेश उत्पन्न करील मग ती महामाया त्यांस करिते यांत आश्चर्य तें काय? ॥६३॥ त्या ईशाचेठायीं सर्वज्ञत्वादि धर्मांची कल्पनाही ती मायाच करिते. कारण जिणें धर्मीची कल्पना केली तिला धर्मांचे कल्पनेचे श्रम कितीसे होणार? ॥ ६४ ॥ एथें कूटस्थ हा कल्पित आहे अशी फाजील शंका कोणीं घेऊं नये. कारण, त्याविषयीं श्रुतीमध्यें प्रमाण कोठेंही आढळत नाहीं. ॥ ६५ ॥ कूटस्थ हीच खरी वस्तु असा वेदांतांत जिकडे तिकडे डांगोरा वाजत आहे. त्यावांचून दुसऱ्या कोणत्याही पदार्थास सत्यता देणें ह्मटलें ह्मणजे वेदांतास अगदीं खपत नाहीं. ॥ ६६ आम्हीं एथें केवळ श्रुत्यर्थ स्पष्ट करून दाखविण्याचें काम पत्करलें आहे. आमच्या पदरच्या तर्कानें आम्ही कांहींच बोलत नाहीं ह्मणून तार्किकांच्या शंकेस जागाच राहिली नाहीं. ॥ ६७ ॥ याकरितां कुतर्क टाकून देऊन मुमुक्षूनें श्रुतीचाच आश्रय करावा. आतां श्रुती तर असें सांगते कीं, माया ही जीव आणि ईश यांना करिते. ॥ ६८ ॥

---

मायाभासेन जीवेशौ करोतीति श्रुतत्वतः ॥ मायिकावेव जीवेशौ स्वच्छौ तौ काचकुंभवत् ॥ ६० ॥ अन्नजन्यं मनो देहात्स्वच्छं यद्वत्तथैव तौ ॥ मायिकावपि सर्वस्मादन्यस्मात्स्वच्छतां गतौ ॥ ६१ ॥ चिद्रूपत्वं च संभाव्यं चित्त्वेनैव प्रकाशनात् ॥ सर्वकल्पनशक्ताया मायाया दुष्करं न हि ॥ ६२ ॥अस्मन्निद्राऽपि जीवेशौ चेतनौ स्वप्नगौ सृजेत् ॥ महामाया सृजत्येताविंत्याश्चर्यं किमत्र ते ॥ ६३ ॥ सर्वज्ञत्वादिकं चेशे कल्पयित्वा प्रदर्शयेत् ॥ धर्मिणं कल्पयेद्याऽस्याः को भारो धर्मकल्पने ॥ ६४ ॥ कूटस्थेऽप्यतिशंका स्यादिति चेन्माऽतिशंक्यताम् ॥ कूटस्थमायिकत्वे तु प्रमाणं न हि विद्यते ॥ ६५ ॥ वस्तुत्वं घोषयंत्यस्य वेदांताः सकला अपि ॥ सपत्नरूपं वस्त्वन्यन्न सहंतेऽत्र किंचन ॥ ६६ ॥ श्रुत्यर्थं विशदीकुर्मो न तर्काद्वच्मि किंचन ॥ तेन तार्किकशंकानामत्र कोऽवसरो वद ॥ ६७ ॥ तस्मात्कुतर्कं संत्यज्य मुमुक्षुः श्रुतिमाश्रयेत् ॥ श्रुतौ तु माया जीवेशौ करोतीति प्रदर्शितम् ॥ ६८ ॥

आरंभीं ईक्षण आणि शेवटीं प्रवेश आहे जिच्या अशी सृष्टि ईश्वरानें केली, आणि आरंभीं जाग्रदवस्था आणि अंतीं मोक्ष असा संसार जीवानें केला आहे. ॥ ६९ ॥ आणि कूटस्थ अगदीं असंग आहे. त्यांत कमजास्तपणा कधींही होत नाहीं. तर मनुष्यानें याचा विचार चांगला मनामध्यें करावा ॥ ७० ॥ कूटस्थास जन्ममरणादि भाव नाहींत याविषयीं श्रुतिप्रमाण असें आहे कीं, त्यास निरोध नाहीं; उत्पत्ति नाहीं; तो बद्धही नाहीं; साधकही नाहीं; तो मुमुक्षुही नव्हे; मुक्तही नव्हे; असें जें समजणें तोच परमार्थ. ॥ ७१ ॥ जीव ईश आणि जग यांचें जें श्रुतीनें प्रतिपादन केलें आहे, तें केवळ आत्म्याचा बोध व्हावा म्हणून. कारण, तो वाणी व मनास अगम्य असल्यामुळें जीवादिकांस घेऊन त्यांचें वर्णन केल्याशिवाय त्याचा यथार्थ बोध व्हावयाचा नाहींच. ॥ ७२ ॥ आतां श्रुतीमध्यें जें निरनिराळें सांगणें आढळतें, तें केवळ निरनिराळ्या विद्यार्थ्यास त्याच्या त्याच्या समजुतीप्रमाणें निरनिराळी प्रक्रिया सांगितली आहे. ती आपापल्या ठिकाणीं चांगलीच आहे असें आचार्यांनीं म्हटलें आहे. ॥ ७३ ॥ सर्व श्रुतींचें तात्पर्य न समजल्यामुळें मूढास भ्रांति होते; परंतु विचारी मनुष्याची गोष्ट तशी नाहीं. तो तें तात्पर्य चांगलें जाणून आनंदाच्या डोहांत बुडी देऊन बसतो ॥ ७४ ॥ त्या विचारी मनुष्याचा निश्चय असा बाणून गेलेला असतो कीं, हा मायारूप मेघ जगद्रूप पाण्याचा पाहिजे तितका वर्षाव करो.. त्यापासून या ब्रह्माकाशाला लाभ किंवा हानि मुळींच नाहीं. ॥ ७५ ॥ आतां याची फलश्रुती सांगून हें प्रकरण आटपतों. जो मनुष्य या कूटस्थ दीपाचें निरंतर अनुसंधान करितो तो स्वतः कूटस्थच बनून जाऊन निरंतर प्रकाशतो. ॥ ७६ ॥

कूटस्थदीप समाप्त.

---

ईक्षणादिप्रवेशांता सृष्टिरीशकृता भवेत् ॥ जाग्रदादिविमोक्षांतः संसारो जीवकर्तृकः ॥ ६९ ॥ असंग एव कूटस्थः सर्वदा नास्य कश्चन ॥ भवत्यतिशयस्तेन मनस्येवं विचार्यताम् ॥७० ॥ ननिरोधो चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः ॥ न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥ ७१ ॥ अवाङ्मनसगम्यं तं श्रुतिर्बोधयितुं सदा ॥ जीवमीशं जगद्वापि समाश्रित्य प्रबोधयेत् ॥ ७२ ॥ यया यया भवेत्पुंसां व्युत्पत्तिः प्रत्यगात्मनि ॥ सा सैव प्रक्रियेह स्यात् साध्वीत्याचार्यभाषितम् ॥ ७३ ॥ श्रुतितात्पर्यमखिलमबुध्द्वा भ्राम्यते जडः ॥ विवेकी त्वखिलं बुध्द्वा तिष्ठत्यानंदवारिधौ ॥ ७४ ॥ मायामेघो जगन्नीरं वर्षत्वेष यथा तथा ॥ चिदाकाशस्य नो हानिर्न वा लाभ इति स्थितिः ॥ ७५ ॥ इमं कूटस्थदीपं योऽनुसंधत्ते निरंतरम् ॥ स्वयं कूटस्थरूपेण दीप्यतेऽसौ निरंतरम् ॥ ७६ ॥

इति कूटस्थदीपः

# सार्थपंचदश्याम्

## ध्यानदीपः ।

### नवमप्रकरणम् ।

गुरु.– एथपर्यंत मागलि सर्व प्रकरणांत ज्ञान ह्मणजे काय, तें महावाक्यापासून कसें प्राप्त होतें व त्यापासून मुक्तीची सिद्धि कशी होते, याजविषयीं बरेंच प्रतिपादन केलें. आतां या प्रकरणीं मुमुक्षूस बुद्धिमांद्यादि प्रतिबंधामुळें ज्ञान न झाल्यास त्याणें तें होण्याविषयीं कोणचें साधन करावें, हें आह्मीं सांगणार. तें साधन खालीं लिहिलेल्या गुरुशिष्यांच्या संवादावरून लक्षांत येईल.

शिष्य.–तें कृपा करून सांगाल तर मी फार आभारी होईन.

गु०–ह्मणतात. ज्याप्रमाणें संवादि भ्रमानेंच प्रवृत्त झालेल्या पुरुषास इष्टार्थलाभ होतो, त्याप्रमाणें तत्त्वाची उपासना केली असतां जीवास ज्ञान होऊन मोक्षप्राप्ति होते. शि०–असें कोठें सांगितलें आहे. १ गु०–उत्तर तापनीय उपनिषदामध्यें उपासना अनेक प्रकारच्या सांगितल्या आहेत. शि०–संवादिभ्रम ह्मणजे काय? हें मला कृपा करून सांगा. गु०–त्याचें लक्षण आचार्यांचें वार्तिकांत चांगलें सांगितलें आहे तेंच मी तुला सांगतों. कल्पना कर कीं, एक दीपाची प्रभा आणि एक मण्याची प्रभा अशा दोन प्रभा दूर पडलेल्या पाहून दोन पुरुष ते मणीच आहेत·असें समजून घ्यावयास गेले. एथें दोघांचेंही मिथ्याज्ञान सारखेंच आहे. तथापि मणी असें समजून मण्याकडे धांवणाऱ्या पुरुषांस मात्र मणी मिळतो. व दुसऱ्यास मिळत नाहीं. ह्मणून दोघांच्या फलप्राप्तीमध्यें अंतर पडतें. ॥ २ ॥ शि०—हें आह्माला स्पष्ट करून सांगा. गु०–एका मंदिराच्या एका खिडकींत दिवा असून त्याची प्रभा बाहेर पडली आहे. तसेंच दुसऱ्या खिडकींत मणी असून त्याचीही प्रभा बाहेर पडली आहे. ॥ ३ ॥ ह्या दोन्हींही प्रभा दुरून दोघां पुरुषांनीं पाहिल्या आणि ते दोन्ही मणीच आहेत असें समजून दोघे दोहोंकडे धांवले तर एथें दोघांसही जाहलेली जी मण्याची कल्पना ती मिथ्याज्ञानच आहे. परंतु दीपप्रभेकडे ॥ ४ ॥ धांवणाऱ्या पुरुषास मणी मिळत नाहीं. आणि मणीप्रभेकडे

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ ध्यानदीपः ॥ संवादिभ्रमवद्ब्रह्मतत्त्वोपास्त्याऽपि मुच्यते ॥ उत्तरे तापनीयेऽतः श्रुतोपास्तिरनेकधा ॥१॥ मणिप्रदीपप्रभयोर्मणिबुद्ध्याऽभिधावतोः ॥ मिथ्याज्ञानाविशेषेऽपि विशेषोऽर्थक्रियां प्रति ॥ २ ॥ दीपोऽपवरकस्यांतर्वर्तते तत्प्रभा बहिः ॥ दृश्यते द्वार्यथान्यत्र तद्वद्दृष्टा मणेः प्रभा ॥ ३ ॥ दूरे प्रभाद्वयं दृष्ट्वा मणिबुध्याऽभिधावतोः ॥ प्रभायां मणिबुद्धिस्तु मिथ्याज्ञानं द्वयोरपि ॥ ४ ॥ न लभ्यते मणिर्दीपप्रभां प्रत्यभि-

धांवणाराला तो मिळतो एवढेंच काय तें अंतर ॥ ५ ॥ एथें दीपप्रभेवर जी मण्याची कल्पना झाली त्यास विसंवादि भ्रम म्हणतात. आणि मणिप्रभेवर जी मण्याची कल्पना ती संवादिभ्रम होय. ॥ ६ ॥ हें प्रत्यक्ष ज्ञानाचें उदाहरण झालें. आतां अनुमान आणि आगम ह्या दोन्ही प्रमाणांविषयींचीं उदाहरणें ऐकू. दूर वाफ उठलेली पाहून तो धूर असें समजून तेथें अग्नि शोधायाला गेलेल्या मनुष्यास दैववशात् अग्नि मिळाला तर तो संवादिभ्रमच ॥ ७ ॥ तसेंच गोदावरीचें पाणी गंगोदक असें समजून आपली शुद्धि व्हावी असें समजून त्याच्या संप्रोक्षणानें शुद्धि पावतो. ॥ ८ ॥ आणि संनिपात ज्वर झालेला मनुष्य भ्रांतीनें नारायणाचें स्मरण करून मरण पावला असतां स्वर्गास जातो. हाही संवादिभ्रमच आहे. ॥ ९ ॥ याप्रमाणें प्रत्यक्ष, अनुमान आणि आगम विषयीं संवादि भ्रमाचीं उदाहरणें कोट्यवधी आहेत. ॥ १० ॥ हा संवादिभ्रम सर्व उपासनांस लागू आहे. येरव्हीं मृत्तिका काष्ठ पाषाण या देवता कशा होतील व स्त्रियादिकांची अग्नित्व बुद्धीनें उपासना कशी घडेल ? ॥ ११ ॥ या संवादिभ्रमाचें थोडक्यांत लक्षण सांगतों. विपरीत ज्ञानापासून काकतालीय न्यायानें जी ईप्सित फलप्राप्ति होते त्यास संवादिभ्रम असें म्हणतात. ॥ १२ ॥ शि०—हें संवादिभ्रमाचें लक्षण मला समजलें. पण हें मोक्षप्राप्तीस कसें साधन होतें ? गुरु०—हा जो वर संवादिभ्रम सांगितला तो जरी स्वतः भ्रम आहे तरी त्यापासून इष्टफलसिद्धि होते. याप्रमाणें ब्रह्मतत्त्वाची उपासनाही मोक्षरूप फल देते. ॥ १३ ॥ शि०–आपण म्हणतां कीं ब्रह्मतत्त्वाची उपासना करावी. ती काय ब्रह्म जाणून करावी कीं न जाणून करावी ? जाणून

---

धावता ॥ प्रभायां धावताऽवश्यं लभ्येतैव मणिर्मणेः ॥ ५ ॥ दीपप्रभामणिभ्रांतिर्विसंवादिभ्रमः स्मृतः ॥ मणिप्रभामणिभ्रांतिः संवादिभ्रम उच्यते ॥ ६ ॥ बाष्पं धूमतया बुद्ध्वा तत्रांगारानुमानतः ॥ वन्हिर्यदृच्छया लब्धः स संवादिभ्रमो मतः ॥७॥ गोदावर्युदकं गंगोदकं मत्वा विशुद्धये ॥ संप्रोक्ष्य शुद्धिमाप्नोति स संवादिभ्रमो मतः ॥८॥ ज्वरेणाप्तः सन्निपातं भ्रांत्या नारायणं स्मरन् ॥ मृतः स्वर्गमवाप्नोति स संवादिभ्रमो मतः ॥ ९ ॥ प्रत्यक्षस्यानुमानस्य तथा शास्त्रस्य गोचरे ॥ उक्तन्यायेन संवादिभ्रमाः संति हि कोटिशः ॥ १० ॥ अन्यथा मृत्तिकादारुशिलाः स्युर्देवताः कथम् ॥ अग्नित्वादिधियोपास्याः कथं वा योषिदादयः ॥ ११ ॥ अयथावस्तुविज्ञानात्फलं लभ्यत ईप्सितम् ॥ काकतालीयतः सोऽयं संवादिभ्रम उच्यते ॥ १२ ॥ स्वयंभ्रमोऽपि संवादी यथा सम्यक्फलप्रदः ॥ ब्रह्मतत्त्वोपासनाऽपि तथा मुक्तिफलप्रदा ॥१३॥ वेदांतेभ्यो ब्रह्मतत्त्वमखंडैकरसात्मकम् ॥ परोक्षमवगम्यैतदहमस्मि-

जर म्हणाल तर ज्ञान झाल्यावर उपासनेची गरज नाहीं, न जाणून जर म्हणाल तर उपासना कशी होईल ? गु०–ब्रह्माचें जरी प्रत्यक्ष ज्ञान नाहीं तरी गुरुमुखापासून ब्रह्म अखंडैकरसात्मक आहे व तें तूं आहेस असा उपदेश श्रवण करून उत्पन्न होणाऱ्या परोक्ष ज्ञानानें ब्रह्माहमस्मि अशी उपासना करितां येते. ॥ १४ ॥ शि०–ज्या ब्रह्मतत्त्वाची उपासना करावयाची तद्विषयक जें परोक्ष ज्ञान त्याचें स्वरूप मला सांगा. गु०–विष्णु आदिमूर्तींचें प्रतिपादन ज्या शास्त्रांत केलें आहे, त्यापासून उत्पन्न झालेल्या ज्ञानाप्रमाणें या उपासनेंतही प्रत्यग्व्यक्तीचा जरी उल्लेख नाहीं तरी केवळ ब्रह्म आहे असें जें सामान्य ज्ञान तेंच येथें परोक्ष ज्ञान समजावें. ॥ १५ ॥ शि०–तुम्हीं जो विष्णुमूर्तीचा दृष्टांत दिलात तें परोक्ष ज्ञान कसें होतें ? गु०–शास्त्रावरून विष्णूच्या मूर्तीचें चतुर्भुजत्वादिरूप प्रत्यक्ष नेत्रांस दिसत नाहीं, तेव्हां तें परोक्ष ज्ञानच म्हटलें पाहिजे. ॥ १६ ॥ शि०–तर मग ते विष्णुमूर्तीचें ज्ञान भ्रांति कशावरून नव्हे ? कारण, तें प्रत्यक्ष झालें नाहीं. गु०–केवळ तें परोक्ष आहे एवढ्याच दोषामुळें तें भ्रांतिज्ञान होत नाहीं. भ्रांतिज्ञानास विषयाची असत्यता पाहिजे. पण येथें तर ज्यावर आम्हीं पूर्ण विश्वास ठेवितों अशा शास्त्रानें ती मूर्ति प्रत्यक्ष पाहून आम्हांस तसें वर्णन दिलें तेव्हां ती भ्रांति म्हणतां येत नाहीं. ॥ १७ ॥ एथेंही शास्त्रावरून सच्चिदानंदरूप ब्रह्माचें भान होऊनही प्रत्यक् साक्षीचें प्रत्यक्ष ज्ञान नसल्यामुळें तें ब्रह्म प्रत्यक्ष होत नाहीं. ॥ १८ ॥ परंतु शास्त्राच्या सांगण्यावरून सच्चिदानंदरूपाचा निश्चय झाल्यामुळें तें परोक्ष ज्ञान तत्त्वज्ञानच समजलें पाहिजे. तो भ्रम नव्हे. ॥ १९ ॥ शि०–" सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म " इत्यादि वाक्यांपासून झालेलें ज्ञान जसें परोक्ष होतें तसें महावाक्यापासून अपरोक्षही होतें. मग तुमची उपासना कशाला पाहिजे ? ॥२०॥ गुरु–जरी शास्त्राचे ठायीं महावाक्यांनीं ब्रह्माचें प्रत्यक्ष ज्ञान होण्याजोगें वर्णन केलें आहे, तरी त्याचा अर्थ मूढास समजत नाहीं. कारण कीं, देहादिकाला मी म्हणणें अशी जी भ्रांति ती सतत असल्यामुळें पुरुषास मी ब्रह्म आहें असें ज्ञान मंदबुद्धीमुळें होत नाहीं. ॥ २१ ॥ शि०–बुद्धिमांद्यामुळें ज्याला अपरोक्ष ज्ञान होत नाहीं

---

स्मीत्युपासते ॥ १४ ॥ प्रत्यग्व्यक्तिमनुल्लिख्य शास्त्राद्विष्ण्वादिमूर्तिवत् ॥ अस्ति ब्रह्मेतिसामान्यज्ञानमत्र परोक्षधीः ॥ १५ ॥ चतुर्भुजाद्यवगतावपि मूर्तिमनुल्लिखन् ॥ अक्षैः परोक्षज्ञान्येव न तदा विष्णुमीक्षते ॥ १६ ॥ परोक्षत्वापराधेन भवेन्नातत्ववेदनम् ॥ प्रमाणेनैव शास्त्रेण सत्त्वमूर्तेर्विभासनात् ॥ १७ ॥ सच्चिदानंदरूपस्य शास्त्राज्ज्ञानेऽप्यनुल्लिखन् ॥ प्रत्यंचं साक्षिणं तत्तु ब्रह्मसाक्षान्न वीक्षते ॥ १८ ॥ शास्त्रोक्तेनैव मार्गेण सच्चिदानंदनिश्चयात् ॥ परोक्षमपि तज्ज्ञानं तत्त्वज्ञानं न तु भ्रमः ॥ १९ ॥ ब्रह्म यद्यपि शास्त्रेषु प्रत्यक्त्वेनैव वर्णितम् ॥ महावाक्यैस्तथाऽप्येतद्दुर्बोधमविचारिणः ॥ २० ॥ देहाद्यात्मत्वविभ्रांतौ जाग्रत्यां न हठात्पुमान् ॥ ब्रह्मात्मत्वेन विज्ञातुं क्षमते मंदधीत्वतः ॥ २१ ॥ ब्रह्म-

त्याला परोक्ष ज्ञान तरी कसें होईल ? गुरु—शास्त्रावर जर मनुष्याची श्रद्धा असेल तर तेवढ्यानें त्यास ब्रह्माचें परोक्ष ज्ञान होतें. कारण, प्रत्यक्ष देहादिकांचा भ्रम जसा अपरोक्ष ज्ञानाच्या आड येतो तसा परोक्ष ज्ञानाच्या आड येत नाहीं. ॥ २२ ॥ प्रतिमेचे ठायीं प्रत्यक्ष जी शिला बुद्धि ती परोक्ष ईश बुद्धीस आड येत नाहीं. विष्णूचे प्रतिमेंत विष्णुत्वाविषयीं संशय नाहीं. ॥ २३ ॥ शिष्य—कित्येकांना त्याविषयीं शंका येते. गुरु—ज्यांना श्रद्धा नाहीं त्यांना संशय येत असेल, परंतु तो आह्मी जमेंत धरीत नाहीं. कारण, सर्व वैदिक विषयांमध्यें श्रद्धालु पुरुषच अधिकारी आहेत. ॥ २४ ॥ आप्ताच्या सकृदुपदेशानें जर परोक्षज्ञान होतें तर विष्णुमूर्तीच्या शास्त्रोक्त उपदेशापासून परोक्ष ज्ञान कां न व्हावें. याविषयीं फारसा विचार नलगे. ॥ २५ ॥ शि०—मग शास्त्रानें तरी त्याचा विचार कां केला ? गु०—ज्या कर्माचें किंवा उपासनेचें अनुष्ठान करावयाचें तें वेदाच्या अनेक शाखांमध्यें निरनिराळ्या रीतीनें सांगितलें आहे. त्याची एकवाक्यता शास्त्रविचारावांचून मनुष्यास होणें कठिण आहे. म्हणून तो विचार अवश्य आहे. याकरितां तसा शास्त्रानें विचार केला. ॥ २६ ॥ एरव्हीं जो श्रद्धालु पुरुष आहे त्याला विचाराची गरज नाहीं. कारण, जैमिन्यादिक आचार्यांनीं कल्पसूत्रांहीं करून जो उपासनेचा निर्णय केला आहे तेवढा त्याच्या अनुष्ठानास बस आहे. ॥ २७ ॥ शि०—उपासना करणारास विचारावांचून तिचा प्रकार समजण्यास मार्ग कोणता ? गु०—उपासनेचें अनुष्ठान वसिष्ठादि ऋषिप्रणीत ग्रंथामध्यें चांगलें सांगितलें आहे. तो प्रकार गुरुमुखापासून ऐकून घेऊन मंद बुद्धीच्या लोकांनीं उपासना करावी. ॥ २८ ॥ शि०—तर हल्लींचेही ग्रंथकार उपासनेचा विचार कां करितात ? गु०—ते केवळ आपल्या संतोषाकरितां करितात. वेदवाक्यांचा निर्णय करावा असें ज्याच्या मनांत आहे त्याणें हवी तर त्यांची मीमांसा करावी. पण अनुष्ठान जर ह्मणशील तर तें केवळ गुरूच्या उपदेशमात्रानेंच होतें. ॥ २९ ॥ पण ब्र-

---

मात्रं सुविज्ञेयं श्रद्धालोः शास्त्रदर्शिनः ॥ अपरोक्षद्वैतबुद्धिः परोक्षाद्वैतबुद्ध्यनुत् ॥ २२ ॥ अपरोक्षशिलाबुद्धिर्न परोक्षेशतां नुदेत् ॥ प्रतिमादिषु विष्णुत्वे को वा विप्रतिपद्यते ॥ २३ ॥ अश्रद्धालोरविश्वासो नोदाहरणमर्हति ॥ श्रद्धालोरेव सर्वत्र वैदिकेष्वधिकारतः ॥ २४ ॥ सकृदाप्तोपदेशेन परोक्षज्ञानमुद्भवेत् ॥ विष्णुमूर्त्युपदेशो हि न मीमांसामपेक्षते ॥ २५ ॥ कर्मोपास्ती विचार्येते अनुष्ठेयाविनिर्णयात् ॥ बहुशाखाविप्रकीर्णं निर्णेतुं कः प्रभुर्नरः ॥ २६ ॥ निर्णीतोऽर्थः कल्पसूत्रैर्ग्रथितस्तावताऽस्ति कः ॥ विचारमंतरेणापि शक्तोऽनुष्ठातुमंजसा ॥ २७ ॥ उपास्तीनामनुष्ठानमार्षग्रंथेषु वर्णितम् ॥ विचाराक्षममर्त्याश्च तच्छ्रुत्वोपासते गुरोः ॥ २८ ॥ वेदवाक्यानि निर्णेतुमिच्छन्मीमांसतां जनः ॥ आप्तोपदेशमात्रेण ह्यनुष्ठानं हि संभवेत् ॥ २९ ॥ ब्रह्मसाक्षात्कृतिस्त्वेवं

ह्मसाक्षात्काराची गोष्ट तशी नाहीं. तो होण्यास विचार मनुष्यांनीं केलाच पाहिजे. केवळ गुरूच्या उपदेशमात्रेंकरूनच तो होईल असें कधीं कोणीं समजूं नये. ॥ ३० ॥ याचें कारण असें आहे कीं, परोक्ष ज्ञानाला प्रतिबंध काय तो अश्रद्धेचा अविचार हा त्याच्या आड मुळींच येत नाहीं. पण अपरोक्ष–ज्ञानाला प्रतिबंध करणारा अविचारच आहे. ॥ ३१ ॥ शि०—विचार करूनही अपरोक्ष ज्ञान झालें नाहीं तर कसें करावें. गु०—तसें ज्ञान होईपर्यंत पुनः पुनः विचारच करावा. दुसरा मार्ग नाहीं. ॥ ३२ ॥ शि०—पुनः पुनः मरेपर्यंतही विचार करून साक्षात्कार झाला नाहीं तर कसें करावें ? गु०—कांहीं प्रतिबंध असतात ते ह्या जन्मीं नष्ट न झाले तर पुढील जन्मीं त्यांचा नाश होऊन आत्मप्राप्ति होईलच. ॥ ३३ ॥ शि०—असें कोठें सांगितलें आहे ? गु०—" इहवाऽमुत्रवाविद्या " असें व्यासाचें सूत्र आहे; तसेंच " शृण्वंतोऽप्यत्र बहवो यन्न विद्युः " असें श्रुतिप्रमाणही आहे. ॥ ३४ ॥ शि०—असा साक्षात्कार कोणाला झाला ? श्रुतीमध्यें वामदेवाची कथा तूं ऐकिलीच असेल. त्याला पूर्वाभ्यासामुळें गर्भांतच असतांना साक्षात्कार झाला, कीं जसें आज पाठ केलेलें उद्यां आठवतें. ॥ ३५ ॥ पुष्कळदां एकच श्लोक पाठ करूनही जर त्याच दिवशीं तो न आला तरी दुसरे दिवशीं तो आपोआप आठवतो. ॥ ३६ ॥ ज्याप्रमाणें कृषि, गर्भ इत्यादिक पक्व होण्यास काळ लागतो त्याप्रमाणें आत्मविचारही हळू हळूच पक्व होतो. ॥ ३७ ॥ शि०—पुनः पुनः विचार करूनही ज्ञान होत नाहीं असें कोठें सांगितलें आहे. गु०—तत्त्वज्ञानास अडथळा करणारे तीन प्रकारचे प्रतिबंध आचार्यांनीं आपल्या वार्तिकांत चांगल्या रीतीनें सांगितलें आहेत. ॥३८॥ तेथें ज्ञा-

---

विचारेण विना नृणाम् ॥ आप्तोपदेशमात्रेण न संभवति कुत्रचित् ॥ ३० ॥ परोक्षज्ञानमश्रद्धा प्रतिबध्नाति नेतरत् ॥ अविचारोऽपरोक्षस्य ज्ञानस्य प्रतिबंधकः ॥ ३१ ॥ विचार्याप्यापरोक्षेण ब्रह्मात्मानं न वेत्ति चेत् ॥ आपरोक्ष्यावसानत्वाद्भूयो भूयो विचारयेत् ॥ ३२ ॥ विचारयन्नामरणं नैवात्मानं लभेत चेत् ॥ जन्मांतरे लभेतैव प्रतिबंधक्षये सति ॥ ३३ ॥ इह वाऽमुत्र वा विद्येत्येवं सूत्रकृतोदितम् ॥ शृण्वंतोऽप्यत्र बहवो यन्न विद्युरिति श्रुतिः ॥ ३४ ॥ गर्भएव शयानः सन् वामदेवोऽवबुद्धवान् ॥ पूर्वाभ्यस्तविचारेण यद्वदध्ययनादिषु ॥ ३५ ॥ बहुवारमधीतेऽपि तदा नायाति चेत्पुनः ॥ दिनांतरेऽनधीत्यैव पूर्वाधीतं स्मरेत्पुमान् ॥ ३६ ॥ कालेन परिपच्यंते कृषिगर्भादयो यथा ॥ तद्वदात्मविचारोऽपि शनैः कालेन पच्यते ॥ ३७ ॥ पुनः पुनर्विचारेऽपि त्रिविधप्रतिबंधतः ॥ न वेत्ति तत्त्वमित्येतद्वार्तिके सम्यगीरितम् ॥ ३८ ॥ कुतस्तज्ज्ञानमिति चेत्तद्धि बंधपरिक्षयात् ॥ असावपि च

नाची प्राप्ति कशानें होतें अशा शिष्यप्रश्नावर गुरूंनीं उत्तर दिलें आहे कीं, बाबारे ज्ञान होण्यास तीन प्रतिबंध आहेत. एक भावी, दुसरा भूत, तिसरा वर्तमान ॥ ३९ ॥ मनुष्य वेद पढला तरी मुक्त होत नाहीं. जशाचा तसा कोरडा राहतो. ज्याप्रमाणें धन पुरलेली जागा सुमजल्यामुळें त्याला तो ठेवा सांपडत नाहीं ॥ ४० ॥ भूत प्रतिबंधाचें उदाहरण तेथें असें दिलें आहे कीं, कोणी एक मनुष्याची आपल्या ह्मैशीवर फार प्रीति होती. पुढें त्यानें संन्यास घेतला. वेदांत श्रवणाचे वेळीं ती ह्मैस वरचेवर त्याचे डोळ्यांपुढें उभी राहत असे. त्यामुळें तत्त्वविचारास अडथळा येऊन त्याची समजूत चांगली पडेना. ॥ ४१ ॥ ह्मणून गुरूनीं त्याच्या त्या ह्मैशीवरील प्रीतीलाच अनुसरून त्या ह्मैशीमध्यें व्यापून असणारेंच तूं ब्रह्म आहेस असा उपदेश केल्यानें त्यास तो उपदेश चांगला ठसला. ही गोष्ट लोकांत प्रसिद्ध आहे. ॥ ४२ ॥ आतां वर्तमान प्रतिबंध विषयासक्ति, बुद्धिमांद्य, श्रुतिविरुद्ध कुतर्क आणि विपरीत भावनेविषयीं दुराग्रह हीं वर्तमान प्रतिबंधाचीं उदाहरणें समजावी. ॥ ४३ ॥ शि०—ह्या वर्तमान प्रतिबंधाचे निवारणास उपाय कोणते ? गुरु–त्यास उपाय दुसरे नाहींत. शमदमादिक साधनांचा अभ्यास आणि श्रवण, मनन, निदिध्यासन यांची योजना यथायोग्य रीतीनें केली असतां त्या प्रतिबंधाचा क्षय होऊन ब्रह्मप्राप्ति होते ॥ ४४ ॥ शिष्य–आतां भावी प्रतिबंधाचें एक उदाहरण द्यावें. गुरु–वामदेव आणि भरत यांची कथा तूं ऐकलीच असशील. पहिल्याला साक्षात्कार होण्यास एक जन्म घ्यावा लागला, आणि दुसऱ्यास तीन जन्म घ्यावे लागले. यांचें कारण असें कीं, हा भावी प्रतिबंध जन्मांतर दिल्यावांचून राहत नाहीं. कारण, तो प्रारब्धशेष आहे; त्या अर्थीं तें भोगलेंच पाहिजे. ॥ ४५ ॥ शिष्य–असें आणखी कोणच्या तरी प्रसिद्ध ग्रंथांत सांगितलें आहे काय गुरुः–असें गीतेंतच सांगितलें आहे. गीतेंत योगभ्रष्टास मुक्त होण्यास पुढील जन्म घ्यावे लागतात असें जें सांगितलें तो भावी प्रतिबंधच स-

---

भूतो वा भावी वा वर्ततेऽथवा ॥ ३९ ॥ अधीतवेदवेदार्थोऽप्यत एव न मुच्यते ॥ हिरण्यनिधिदृष्टांतादिदमेव हि दर्शितम् ॥४०॥ अतीतेनापि महिषीस्नेहेन प्रतिबंधतः ॥ भिक्षुस्तत्त्वं न वेदेति गाथा लोके प्रगीयते ॥ ४१ ॥ अनुसृत्य गुरुः स्नेहं महिष्यां तत्त्वमुक्तवान् ॥ ततो यथावद्वेदैष प्रतिबंधस्य संक्षयात् ॥ ४२ ॥ प्रतिबंधो वर्तमानो विषयासक्तिलक्षणः ॥ प्रज्ञामांद्यं कुतर्कश्च विपर्ययदुराग्रहः ॥ ४३ ॥ शमाद्यैः श्रवणाद्यैश्च तत्र तत्रोचितैः क्षयम् ॥ नीतेऽस्मिन्प्रतिबंधेऽतः स्वस्य ब्रह्मत्वमश्नुते ॥ ४४ ॥ आगामिप्रतिबंधश्च वामदेवे समीरितः ॥ एकेन जन्मना क्षीणो भरतस्य त्रिजन्मभिः ॥ ४५ ॥ योगभ्रष्टस्य गीतायामतीते बहुजन्मीन ॥ प्रतिबंधक्षयः प्रोक्तो न विचारोऽप्यनर्थकः

मजला पाहिजे. ॥ ४६ ॥ शिष्य—मग एकून या जन्मीं केलेला विचार निष्फलच ह्मणा. गुरु—छी ! विचार केलेला कधीं फुकट जाईल काय ? ह्याचा विचार या गीतेंतील श्लोकावरून तुला चांगला समजेल. " प्राप्य पुण्यकृतां लोकान् " या श्लोकापासून " ततो याति परां गतिम् " या श्लोकान्तापर्यंत तुला त्याचा अभिप्रायच सांगतों ह्मणजे झालें. योगभ्रष्ट पुरुष आत्मतत्त्व विचाराचे बळानें पुण्यलोकांस जाऊन तेथें यावद्भोग सुख अनुभवून पुनः या लोकीं शुचिर्भूत व तेजस्वी आईबापांच्या पोटीं जन्मास येतो किंवा ब्रह्मतत्त्व विचारानें स्वतः विरक्त होऊन योग्यांच्या घरींच जन्म घेतो. हें जन्म फार दुर्लभ आहे. कारण, तेथें पूर्वदेही संबंधी जो बुद्धीस योगाचा संस्कार असतो तो जशाचा तसाच उठून तो पुढें तसाच प्रयत्न करीत जातो. याचें कारण असें कीं, तो योगभ्रष्ट पूर्व संस्काराच्या स्वाधीन होऊन शेवटीं ब्रह्मप्राप्ति होईपर्यंत तसाच चालतो. ॥ ४७ ॥ ४८ ॥ ४९ ॥ ५० ॥ आणखी एक दांडगा प्रतिबंध आहे तो तुला सांगतों. योग करतां करतां ब्रह्मलोकप्राप्तीची इच्छा झाली ह्मणजे तत्त्वविचार कितीही केला तरी त्यास साक्षात्कार होत नाहीं. ॥ ५१ ॥ शिष्य—मग त्याला साक्षात्काराची मुळींच आशा नाहीं कीं काय ? गुरु—त्याला साक्षात्कार मुळींच होत नाहीं असें नाहीं. तरी तेवढ्या इच्छेमुळें मोठ्या गोत्यांत पडला. कारण, " वेदांतविज्ञानसुनिश्चितार्था " या श्रुतीप्रमाणें त्यास ब्रह्मलोकप्राप्ति झाल्यानंतर कल्पांतीं ब्रह्मदेवाबरोबरच मुक्ति व्हावयाची. ॥ ५२ ॥ परंतु हे जे तीन प्रतिबंध सांगितले ते तत्त्वविचारास आड येणारे आहेत. पण हा तत्त्वविचारही कित्येकांना प्रारब्धवशात् करितां येत नाहीं. यास " श्रवणायापिबहुभिः " या श्रुतीचें प्रमाण आहे. ॥ ५३ ॥ शि०—मग अशा पुरुषांस मुक्ति कशी मिळावी ? गु०—म्हणूनच आज तुला ब्रह्माची उपासना सांगत आहों. ज्याची बुद्धि अत्यंत मंद असल्यामुळें किंवा गुरुशास्त्रादिक सामग्री अनुकूल नसल्यामुळें ज्यास तत्त्वविचार करणें मुष्कील आहे त्यानें अहोरात्र ब्र-

---

४६ प्राप्य पुण्यकृतां लोकानात्मतत्त्वविचारतः ॥ शुचीनां श्रीमतां गेहे साभिलाषोऽभिजायते ॥ ४७ ॥ अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ॥ निस्पृहो ब्रह्मतत्त्वस्य विचारात्तद्धि दुर्लभम् ॥ ४८ ॥ तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ॥ यतते च ततो भूयस्तस्मादेतद्धि दुर्लभम् ॥ ४९ ॥ पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ॥ अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ५० ॥ ब्रह्मलोकाभिवांछायां सम्यक् सत्यां निरुद्ध्य ताम् ॥ विचारयेद्य आत्मानं न तु साक्षात्करोत्ययम् ॥ ५१ ॥ वेदांतविज्ञानसुनिश्चितार्था इति शास्त्रतः ॥ ब्रह्मलोके स कल्पांते ब्रह्मणा सह मुच्यते ॥ ५२ ॥ केषांचित्स विचारोऽपि कर्मणा प्रतिबध्यते ॥ श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्य इति श्रुतेः ॥ ५३ ॥ अत्यंतबुद्धिमांद्याद्वा सामग्र्या वाऽप्यसंभवात् ॥ यो विचारं न लभ-

ह्याची उपासना करावी. ॥ ५४ ॥ शि०—होय, पण निर्गुण ब्रह्माची उपासना कशी करावी? गु०—जशी सगुणाची करावी तशीच निर्गुणाची करावी. उपासना ह्मणजे प्रत्ययाची आवृत्ति ती जशी सगुणावर चालते तशी निर्गुणाविषयींही होते. ॥ ५५ ॥ शि०—होय, पण वाणी आणि मनाला अगम्य अशा ब्रह्माची उपासना कशी करावी ? गु०—असें ब्रह्म जाणावें तरी कसें तें सांग. ॥ ५६ ॥ शि०—जाणण्यास कोणती नड आहे. तें वाणीस व मनास अगोचर आहे असें समजणें हेंच त्याला जाणणें. गु०—अशा प्रकारचें ब्रह्म आहे असें समजण्यास जसें येतें तशीच त्याची उपासनाही करण्यास कोणची नड आहे ? ॥ ५७ ॥ शि०—ब्रह्म जर उपासनेस विषय होईल तर त्याला सगुणत्व येतें, तसें ज्ञानास विषय झाल्यानेंही सगुणत्व येईल. शि०—लक्षणा वृत्ति ह्मणोन जी वाक्यार्थ करण्याची रीत आहे तिला अनुसरून जाणल्यास त्यास सगुणत्व येत नाहीं. गु०—मग तशा लक्षणानें लक्षित जें ब्रह्म त्याची उपासना केली असतांही सगुणत्व येत नाहीं. ॥ ५८ ॥ शि०— तर मग " तदेवं ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदं उपासते " या श्रुतीनें उपासनेचा निषेध कां केला ? गु०—अरे उपासनेचा जसा श्रुतीनें निषेध केला आहे, तसा ज्ञानाचाही निषेध श्रुतीनें केला आहे. ॥ ५९ ॥ " अन्यदेव तद्विदितादथोविदितादधीति " ही श्रुति तुला माहीत आहेच. शि०—त्या श्रुतींत जाणलेलेंही नव्हे आणि न जाणलेलेंही नव्हे असें ब्रह्म सांगितलें तसेंच तें जाणलें म्हणजे झालें. गु०—मग उपासनाही तशीच करावी. ॥ ६० ॥ शि०—ब्रह्माची वेद्यता कांहीं खरी नव्हे. गु०—मग ब्रह्माची उपास्यता तरी कुठें आह्मीं खरी म्हणतों. शि०—ज्ञान होण्यास वृत्तीची व्याप्ति लागते. गु०—उपासनेला ही शब्दबलानें वृत्तीची व्याप्ति लागते. ॥ ६१ ॥ शि०—गुरु महाराज, उपासनेविषयीं आपला इतका आग्रह कां ? गु०—तुझा तरी तिजविषयीं इतका द्वेष कां ? शि०—तिजविषयीं प्रमाण कोठें दिसत नाहीं हो. गु०—हत्‌तिच्या. प्रमाणाला काय तोटा. पु-

---

ते ब्रह्मोपासीत सोऽनिशम् ॥ ५४ ॥ निर्गुणब्रह्मतत्त्वस्य न ह्युपास्तेरसंभवः ॥ सगुणब्रह्मणीवात्र प्रत्ययावृत्तिसंभवात् ॥ ५५ ॥ अवाङ्मनसगम्यं तन्नोपास्यमिति चेत्तदा ॥ अवाङ्मनसगम्यस्य वेदनं न च संभवेत् ॥ ५६ ॥ वागाद्यगोचराकारमित्येवं यदि वेत्यसौ ॥ वागाद्यगोचराकारमित्युपासीत नो कुतः ॥ ५७ ॥ सगुणत्वमुपास्यत्वाद्यदि वेद्यत्वतोऽपि तत् ॥ वेद्यं चेल्लक्षणावृत्त्या लक्षितं समुपास्यताम् ॥ ५८ ॥ ब्रह्म विद्धि तदेव त्वं न त्विदं यदुपासते ॥ इति श्रुतेरुपास्यत्वं निषिद्धं ब्रह्मणो यदि ॥ ५९ ॥ विदितादन्यदेवेति श्रुतेर्वेद्यत्वमस्य न ॥ यथा श्रुत्यैव वेद्यं चेत्तथा श्रुत्याऽप्युपास्यताम् ॥ ६० ॥ अवास्तवी वेद्यता चेदुपास्यत्वं तथा न किम् ॥ वृत्तिव्याप्तिर्वेद्यता चेदुपास्यत्वेऽपि तत्समम् ॥६१॥ ॥ का ते भक्तिरुपास्तौ चेत्कस्ते द्वेषस्तदीरय ॥ मानाभावो न

प्कळ श्रुतींचीं प्रमाणें आहेत. ॥ ६२ ॥ उत्तरतापनीय उपनिषदांत, शैब्य प्रश्नोपनिषदांत, तसेंच काठक मांडुक्य इत्यादिक उपनिषदांमध्यें निर्गुण उपासना सांगितली आहे. ॥ ६३ ॥ शि०—उपासना कशी करावी ? गु०—पंचीकरण ग्रंथांत सांगितली आहे. शि० मग हें ज्ञानाला साधन तर ? त्यापासून साक्षात् कांहीं मुक्ति होत नाहीं. गु०—तसें आमचें तरी कोठें म्हणणें आहे. उपासना ही ज्ञानालाच साधन आहे. ॥ ६४ ॥ शि०—जगामध्यें ही उपासना कोणीच करीत नाहींत. गु०—न करीतना बापडे. कोणी ती न केल्यामुळें उपासनेला दोष येतो काय ? ॥ ६५ ॥ मनुष्याची सद्यःफलाकडे नेहमीं दृष्टि असते. तूं म्हणतोस निर्गुण उपासना करीत नाहींत. पण सगुण उपासना तरी सर्व कुठें करितात ? तिचेंही फल मिळण्याला पुष्कळ काळ लागतो. म्हणून सद्यःफलदायी वशीकरणादिकांचे मंत्र जपणारेही मूढ आहेतच. इतकेंच नव्हे, यांतहीं नियम पाळण्याचा श्रम ज्यांस वाटतो ते त्याहीपेक्षां सद्यःफलदायी जीं कृष्यादि कर्में त्यांचा आश्रय घेतात. म्हणून कोणचेंही कृत्य लोक करीत नाहींत येवढ्याच कारणानें तें त्याज्य होतें असें नाहीं. ॥ ६६ ॥ सांसारिक फलाची ज्यांस इच्छा आहे ते निर्गुण उपासनेचें अनुष्ठान करीत नाहींत म्हणून मुमुक्षूंनींही त्याचा त्याग करावा कीं काय ? ही मूर्खांची गोष्ट असो. तूर्त आह्मी आमच्या विषयाकडे वळूं. वेदांच्या सर्व शाखांमध्यें विधेय आणि निषेध्य असे जे ब्रह्मावर आरोपित गुण त्या सर्वांचा एकत्र उपसंहार करून एथें निर्गुण उपासना सांगतों. ॥ ६७ ॥ ते गुण व्यासांनीं आपल्या सूत्रांत संग्रह केले आहेत. त्यांपैकीं आनंदादिक विधेय गुण " आनंदादयः प्रधानस्य " या सूत्रांत सांगितले आहेत. ॥६८॥ आणि त्याचे अस्थूलादिक निषेध गुण. " अक्षरधियां त्ववरोधः सामान्यतद्भावाभ्यामौपसदनवदुक्तं " या सूत्रांत एकत्र केले आहेत. ॥६९॥ शि०—निर्गुण ब्रह्मविद्येचेठायीं गुणांचा उपसंहार कसा केला ? गु०—वर जें आह्मीं तुला सांगितलें तें कांहीं आमचे पदरचें नव्हे. व्या-

---

वाच्योऽस्यां बहुश्रुतिषु दर्शनात् ॥ ६२ ॥ उत्तरस्मिंस्तापनीये शैब्यप्रश्नेऽथ काठके ॥ मांडुक्यादौ च सर्वत्र निर्गुणोपास्तिरीरिता ॥ ६३ ॥ अनुष्ठानप्रकारोऽस्याः पंचीकरण ईरितः ॥ ज्ञानसाधनमेतच्चेन्नेति केनात्र वारितम् ॥ ६४ ॥ नानुतिष्ठति कोऽप्येतदिति चेन्माऽनुतिष्ठतु ॥ पुरुषस्यापराधेन किमुपास्तिः प्रदुष्यति ॥ ६५ ॥ इतोऽप्यतिशयं मत्वा मंत्रान्वश्यादिकारिणः ॥ मूढा जपंतु तेभ्योऽतिमूढाः कृषिमुपासताम् ॥ ६६ ॥ तिष्ठंतु मूढाः प्रकृता निर्गुणोपास्तिरीर्यते ॥ विधैक्यात्सर्वशाखास्थान् गुणानतोपसंहरेत् ॥ ६७ ॥ आनंदादेर्विधेयस्य गुणसंघस्य संहृतिः ॥ आनंदादय इत्यस्मिन् सूत्रे व्यासेन वर्णिता ॥ ६८ ॥ अस्थूलादेर्निषेध्यस्य गुणसंघस्य संहृतिः ॥ तथा व्यासेन सूत्रेऽस्मिन्नुक्ताऽक्षरधियां त्विति ॥ ६९ ॥ निर्गुणब्रह्मतत्त्वस्य विद्यायां गुणसं-

सांनीं जे गुण आपल्या सूत्रांत दर्शविले तेच तुला आह्मीं एथें सांगितले. तेव्हां वरील प्रश्न आम्हाला करूं नको. पाहिजे तर त्यांना जाऊन विचार ॥ ७० ॥ शि०—आपला अभिप्राय मला समजला. व्यासावर हवाला देण्याचें कारण मला हें दिसतें कीं, ‘ हिरण्यश्मश्रु ’ इत्यादि गुणविशिष्ट ज्या सूर्यादि मूर्ति त्यांचें वर्णन तेथें नाहीं. तेव्हां ती निर्गुण उपासनाच असावी. गु०—असें एकून तूं समजतोसना ? बरेंच झालें. ॥ ७१ ॥ शि०—पण ते गुण ब्रह्मतत्त्वाला दाखवून देणारे आहेत. त्यांचा त्यांत कांहीं प्रवेश होत नाहीं. ते गुण त्यास लागू पडल्यावांचून त्याची उपासना कशी करावी ? गु०—उपासनेला ते गुण लागलेच पाहिजेत असें कांहीं नाहीं. त्या गुणांनीं लक्षित जें ब्रह्म त्याची उपासना खचित करितां येते ॥ ७२ ॥ शि०—तिचा प्रकार कसा तो सांगावा. गु०—आनंदादिक विधेय गुण आणि अस्थूलादिक निषेध्य गुण यांहीं या श्रुतींत आत्मा दर्शविला आहे. तो अखंडैकरस मी आहे असें समजून मुमुक्षु उपासना करितात. ॥ ७३ ॥ शि०—तर मग ज्ञान आणि उपासना यांमध्यें भेद कोणचा ? गु०—ज्ञान हें वस्तुतंत्र आहे आणि उपासना ही कर्तृतंत्र आहे. ह्मणजे जशाची तशी स्थिति जाणणें यास ज्ञान ह्मणतात. आणि उपासना ही ती करणाराच्या भावनेवर अवलंबून आहे. ॥ ७४ ॥ ज्ञान हें विचारापासून होतें. आणखी एक याची अशी मौज आहे कीं, तें एकदां झाल्यावर तें जावें असें जरी मनुष्याच्या मनांत आलें तरी तें जात नाहीं. तें उत्पन्न होतांचा संसाराविषयींची सत्यबुद्धि तत्काल नाहींशी होते. ॥ ७५ ॥ एवढ्या तत्त्वज्ञानानें मनुष्य कृतकृत्य होऊन निरंतर तृप्त असतो. मग जीवन्मुक्त होऊन प्रारब्धक्षयाची वाट पहात बसतो. ॥ ७६ ॥ शि०—हा ज्ञानाचा प्रकार झाला. ज्ञानास जसा विचार पाहिजे तसा उपासनेलाहि नको काय ? गु०—उपासनेस त्याची गरज नाहीं. गुरूपदेशावर श्रद्धालु मुमुक्षूनें घटपटादिक वृत्तींचें विघ्न मध्यें न येऊं देतां एकसारखें विचार न करितां ब्रह्मचिंतन करावें. ॥७७॥ शि०—

---

त्द्दतिः ॥ न युज्येतेत्युपालंभो व्यासं प्रत्येव मां न तु ॥ ७० ॥ हिरण्यश्मश्रुसूर्यादिमूर्तीनामनुदात्द्दतेः ॥ अविरुद्धं निर्गुणत्वमिति चेत्तुष्यतां त्वया ॥ ७१ ॥ गुणानां लक्षकत्वेन न तत्त्वेऽतःप्रवेशनम् ॥ इति चेदस्त्वेवमेव ब्रह्म तत्त्वमुपास्यताम् ॥ ७२ ॥ आनंदादिभिरस्थूलादिभिश्चात्माऽत्र लक्षितः ॥ अखंडैकरसः सोऽहमस्मीत्येवमुपासते ॥ ७३ ॥ बोधोपास्त्योर्विशेषः क इति चेदुच्यते शृणु ॥ वस्तुतंत्रो भवेद्बोधः कर्तृतंत्रमुपासनम् ॥ ७४ ॥ विचाराज्जायते बोधोऽनिच्छा यं न निवर्तयेत् ॥ स्वोत्पत्तिमात्रात्संसारे दहत्यखिलसत्यताम् ॥ ७५ ॥ तावता कृतकृत्यः सन्नित्यतृप्तिमुपागतः ॥ जीवन्मुक्तिमनुप्राप्य प्रारब्धक्षयमीक्षते ॥ ७६ ॥ आप्तोपदेशं विश्वस्य श्रद्धालुरविचारयन् ॥ चिंतयेत् प्रत्ययैरन्यैरनंतरितवृत्तिभिः ॥७७॥ यावच्चिंत्यस्वरूपत्वाभिमानः स्वस्य जाय-

असें ब्रह्मचिंतन किती दिवसपर्यंत करावें ? गु०—देहाविषयींची अहंबुद्धि जाऊन चिंतनीय ब्रह्माविषयीं अहंबुद्धि उत्पन्न होईपर्यंत तसेंच चिंतन केलें पाहिजे. आणि ती स्थिति मरणकालपर्यंत तशीच राखावी. ॥ ७८ ॥ याच्या उदाहरणार्थ छांदोग्य श्रुतींत एक कथा आहे–कोणी एक ब्रह्मचारी संवर्गविद्या या नांवाची प्राणोपासना करीत होता. त्यानें भिक्षेकरितां राजाकडे जाऊन भिक्षेच्या वेळेस " महात्मनश्चतुरो देव एकः " हा मंत्र ह्मणून आपल्या चित्तांतील संवर्गरूप प्रगट केलें. ॥ ७९ ॥ शि०—आपण ह्मटलें कीं, तत्त्वज्ञान झाल्यावर तें जावें असें कोणीं इच्छिलें तरी तें जात नाहीं. हा नियम उपासनेस लागू आहे कीं नाहीं ? गु०—तो उपासनेस लागू नाहीं. ह्मणूनच ती कर्तृतंत्र असें आह्मीं ह्मटलें. कारण मनुष्याच्या इच्छेनें उपासना करणें, न करणें, किंवा अन्यथा करणें शक्य आहे ह्मणून तो प्रत्यय नेहमी तसाच ठसवावा. ॥ ८० ॥ ज्याप्रमाणें वेदाचें अध्ययन करणारा किंवा जप करणारा सदां सर्वदां त्यांतच गढून जाऊन स्वप्नांत सुद्धां आपला अभ्यास करितो, त्याप्रमाणें ब्रह्मोपासकानेंही त्यांतच सदां सर्वदां असावें. ॥ ८१ ॥ शि०—स्वप्नांत देखील ती भावना कशी होते ? गु०—दुसऱ्या विरोधी विषयाचें चिंतन मध्यें न आणतां एक सारखी त्याचीच भावना केली ह्मणजे ती भावना स्वप्नांत देखील राहते. ह्याचा अनुभव सर्वत्रांना आहे. ८२ ॥ शि०—निरंतर भावनेस प्रारब्ध आड येत नाहीं काय ? गु०—ज्या मनुष्यास मोक्षाची आस्था अत्यंत आहे, त्यास प्रारब्धाचा भोग न सुटतांही ब्रह्मचिंतन करणें शक्य आहे यांत संशय नाहीं. यास दृष्टांत व्यसनी पुरुषाचा. ॥ ८३ ॥ ज्या व्यभिचारिणीचें चित्त परपुरुषावर जडलें, ती घरचा काम धंदा करीत असूनही तें परसंगरसायन आंतून एकसारखी चाखीत असते. ॥८४॥ शि०—मग तिचें घरचें काम कसें होतें ? गु०—त्या आस्वादनांत घरचें काम कांहीं रहात नाहीं; पण सरासरी चालतें. ॥ ८५ ॥ आतां कुलीन स्त्री जशी घरच्या कामांत लक्ष ठेवून

---

ते ॥ तावद्विचिंत्यपश्चाच्च तथैवामृति धारयेत् ॥ ७८ ॥ ब्रह्मचारी भिक्षमाणो युतः संवर्गविद्यया ॥ संवर्गरूपतां चित्ते धारयित्वा ह्यभिक्षत ॥ ७९ ॥ पुरुषस्येच्छया कर्तुमकर्तुं कर्तुमन्यथा ॥ शक्योपास्तिरतो नित्यं कुर्यात्प्रत्ययसंततिम् ॥ ८० ॥ वेदाध्यायी ह्यप्रमत्तोधीते स्वप्नेधिवासतः ॥ जपिता तु जपत्येव तथा ध्याताऽपि वासयेत् ॥ ८१ ॥ विरोधिप्रत्ययं त्यक्त्वा नैरंतर्येण भावयन् ॥ लभते वासनावेशात्स्वप्नादावपि भावनाम् ॥ ८२ ॥ भुंजानोऽपि निजारब्धमास्थातिशयतोऽनिशम् ॥ ध्यातुं शक्तो न संदेहो विषयव्यसनी यथा ॥ ८३ ॥ परव्यसनिनी नारी व्यग्राऽपि गृहकर्मणि ॥ तदेवास्वादयत्यंतः परसंगरसायनम् ॥ ८४ ॥ परसंगं स्वादयंत्या अपि नो गृहकर्म तत् ॥ कुंठीभवेदपि त्वेतदापातेनैव वर्तते ॥ ८५ ॥ गृहकृत्यव्यसनिनी यथा सम्यक्करोति तत् ॥

काम करिते तसें मात्र तिला करितां यावयाचें नाहीं. ॥ ८६ ॥ त्याप्रमाणें ध्यानैकनिष्ठ पुरुषाचा संसार सरासरी वेठीनें चालतो. पण तत्त्ववेत्त्याची गोष्ट तशी नाहीं. व्यवहारास आणि ज्ञानास विरोध मुळींच नसल्यामुळें त्याचा व्यवहार यथास्थित चालतो.॥ ८७॥ कारण सर्व प्रपंच-मायामय आहे. आणि चैतन्यरूपी आत्मा खरा आहे, असा बोध झाल्यावर त्याला व्यवहाराचा अडथळा मुळींच नाहीं. ॥८८॥ शि०—ज्ञान्यास हा प्रसंग अगदीं खोटा आहे असा निश्चय झाल्यावर व्यवहार कसा घडावा? गु०—व्यवहार करण्याला त्याचीं जीं मुख्य साधनें आहेत तीं असलीं म्हणजे झालें. त्याला म्हणजे प्रपंच खरा आहे, आत्मा जड आहे ही भ्रांतीच असली पाहिजे असें नाहीं. ॥ ८९ ॥ शि०—तीं मुख्य साधनें कोणतीं? गु०—मन, वाणी, शरीर आणि दुसरें बाह्य विषय हींच व्यवहाराचीं मुख्य साधनें. तीं म्हणजे ज्ञान होतांच तत्त्वज्ञ पुरुषांचीं नाहींशीं होतात असें कांहीं नाहीं. मग व्यवहाराला हरकत कोणची? ॥ ९० ॥ शि०—तत्त्ववेत्त्याला मनाचा निरोध करावा लागतो. मग त्याचा व्यवहार कसा चालावा? गु०—ही तुझी गैरसमजूत आहे. तसा जो निरोध करणारा आहे तो तत्त्ववेत्ताच नव्हे. तो ध्याता असें म्हटलें पाहिजे. अरे घट जाणणाराला बुद्धीचें मर्दन केलें पाहिजे काय? तसें करणारा आत्म्याला तर कोठें आढळत नाहीं. ॥ ९१ ॥ एकदां प्रत्यय आल्यानें जर घट समजतो तर एकदां प्रत्यय आल्यानें स्वप्रकाश आत्माही तसाच समजला पाहिजे. ॥ ९२ ॥ शि०—एथें आत्मा स्वप्रकाश म्हणून जें म्हटलें, त्याचें प्रयोजन कांहीं दिसत नाहीं. कारण तो जरी स्वप्रकाश असला, तरी त्यास बुद्धीनें व्यापल्यावांचून त्याचें ज्ञानच होणें नाहीं. आणि बुद्धि तर क्षणोक्षणीं नाश पावणारी आहे. म्हणून तिची पुनः पुनः ब्रह्माचे ठायीं स्थापना केलीच पाहिजे. व ती स्थापना निरोधावांचून होत नाहीं. गु०—ही सर्व शंका घटज्ञानालाही लागू आहे ॥ ९३ ॥ शि०—ती घटज्ञानाला कशी लागू होईल? कारण घटज्ञान जरी क्षणिक असलें तरी एकदां

---

परव्यसनिनी तद्वन्न करोत्येव सर्वथा ॥ ८६ ॥ एवं ध्यानैकनिष्ठोऽपि लेशाल्लौकिकमारभेत् ॥ तत्त्वविस्त्वविरोधित्वाल्लौकिकं सम्यगाचरेत् ॥ ८७ ॥ मायामयः प्रपंचोऽयमात्मा चैतन्यरूपधृक् ॥ इति बोधे विरोधः को लौकिकव्यवहारिणः ॥ ८८ ॥ अपेक्षते व्यवहृतिर्न प्रपंचस्य वस्तुताम् ॥ नाप्यात्मजाड्यं किं त्वेषा साधनान्येव कांक्षति ॥ ८९ ॥ मनोवाक्कायतद्बाह्यपदार्थाः साधनानि तान् ॥ तत्त्वविन्नोपमृद्नाति व्यवहारोऽस्य नो कुतः ॥ ९० ॥ उपमृद्नाति चित्तं चेद्ध्याताऽसौ न तु तत्त्ववित् ॥ न बुद्धिमर्दयन् दृष्टो घटतत्त्वस्य वेदिता ॥ ९१ ॥ सकृत्प्रत्ययमात्रेण घटश्चेद्भासते सदा ॥ स्वप्रकाशोऽयमात्मा किं घटवच्च न भासते ॥ ॥९२॥ स्वप्रकाशतया किं ते तद्बुद्धिस्तत्त्ववेदनम् ॥ बुद्धिश्च क्षणनाश्येति चोद्यं तुल्यं घटादिषु ॥ ९३ ॥ घटादौ निश्चिते बु-

हा घट असा निश्चय झाल्यावर त्या ज्ञानाचा पाहिजे तेव्हां व्यवहार करितां येतो. म्हणून तेथें चित्तस्थैर्याची गरज नाहीं. गु०—जशी घटपक्षीं त्याची गरज नाहीं तशी आत्मज्ञान झाल्यावरही चित्तस्थैर्याची गरज नाहीं. ॥ ९४ ॥ कारण, एकदां आत्मा असा आहे असा निश्चय झाल्यावर पाहिजे तेव्हां त्याचें ध्यान करण्याला, मनन करण्याला, व वर्णन करण्याला तत्त्ववेत्त्याला येतें. ॥ ९५ ॥ शि०—तत्त्ववेत्ताही उपासकाप्रमाणें आत्मज्ञानांत निमग्न असतां त्याला जगाची विस्मृति पडण्याचा संभव आहे. गु०—विस्मृति पडेना बापडी. पडली तरी ती ध्यानापासून पडते, ज्ञानापासून पडत नाहीं, इतकेंच आमचें म्हणणें आहे. ॥ ९६ ॥ शि०—एकून तर तत्त्ववेत्त्यालाही ब्रह्मध्यान करावें लागतें ? गु०—त्यानें तें केलेंच पाहिजे असें कांहीं नाहीं. तें त्यानें पाहिजे असल्यास करावें. कारण मोक्षप्राप्ति ज्ञानापासूनच होते असा वेदाचा डंका वाजत आहे. ॥ ९७ ॥ शि०—तत्त्ववेत्ता जर ब्रह्मध्यान सोडील तर त्याची प्रवृत्ति बाहेर प्रपंचाकडे होईल. गु०—होईना बापडी. तशा प्रवृत्तीनें तत्त्ववेत्त्याचें काय जातें ? ॥ ९८ ॥ शि०—तशी प्रवृत्ति झाल्यास अति प्रसंगाची ज्ञान्यास भीति आहे. गु०—अरे त्याला प्रसंग असेल तर अतिप्रसंग. प्रथम तूं प्रसंग ह्मणजे काय हें मला सांग. शि०—शास्त्राप्रमाणें वागणें. गु०—तें तत्त्ववेत्त्याला मुळींच लागू नाहीं. ॥ ९९ ॥ कारण ज्याला मी अमुक वर्णातला, मी अमुक आश्रमी, मी तरुण, मी वृद्ध, असा अभिमान त्यालाच काय ते विधिनिषेध. पण तत्त्ववेत्त्याचा तर असा निश्चय असतो कीं, हे वर्णाश्रमादिक देहाचे-ठायीं मायेनें कल्पित केले आहेत. त्याचा संपर्क बोधरूप आत्म्याला मुळींच लागत नाहीं. ॥ १०० ॥ १०१ ॥ तो समाधी करो किंवा त्याच्या हृदयांतील सर्व आस्थांचा नाश झा-

---

द्धिर्नश्यत्येव यदा घटः ॥ इष्टो नेतुं तदा शक्य इति चेत्सममात्मनि ॥ ९४ ॥ निश्चित्य सकृदात्मानं यदापेक्षा तदैव तम् ॥ वक्तुं मंतुं तथा ध्यातुं शक्नोत्येव हि तत्त्ववित् ॥ ९५ ॥ उपासक इव ध्यायंल्लौकिकं विस्मरेद्यदि ॥ विस्मरत्वेव सा ध्यानाद्विस्मृतिर्न तु वेदनात् ॥ ९६ ॥ ध्यानं त्वैच्छिकमेतस्य वेदनान्मुक्तिसिद्धितः ॥ ज्ञानादेव तु कैवल्यमिति शास्त्रेषु डिंडिमः ॥ ॥९७॥ तत्त्वविद्यदि न ध्यायेत्प्रवर्तेत तदा बहिः ॥ प्रवर्ततां सुखे नायं को बाधोऽस्य प्रवर्तने ॥ ९८ ॥ अतिप्रसंग इति चेत् प्रसंगं तावदीरय ॥ प्रसंगो विधिशास्त्रं चेन्न तत्तत्त्वविदं प्रति ॥ ॥९९॥ वर्णाश्रमवयोवस्थाभिमानो यस्य विद्यते ॥ तस्यैवच निषेधाश्च विधयः सकला अपि ॥ १०० ॥ वर्णाश्रमादयो देहे मायया परिकल्पिताः ॥ नात्मनो बोधरूपस्येत्येवं तस्य विनिश्चयः ॥ १ ॥ समाधिमथ कर्माणि मा करोतु करोतु वा ॥ हृदयेनास्त-

त्यामुळें त्याला कशाची गरज नाहीं. ॥ १०२ ॥ तो कर्म करो किंवा संन्यास घेवो; तो समाधि करो, किंवा जप करो; त्याच्या मनांतील सर्व वासना समूळ नष्ट झाल्यामुळें तो कसाही राहिला तरी चालतें. ॥ १०३ ॥ खरेंच आहे कीं, आत्मा असंग आहे आणि त्यावांचून बाकी सर्व मायिक इंद्रजाल आहे, असा ज्या धन्य पुरुषाचा निश्चय झाला, त्याच्या मनांत वासनेचा अंकुर कसा राहील ? ॥ १०४ ॥ म्हणून ज्याला प्रसंगच नाहीं त्याला अति प्रसंग तरी कोठून असणार ? जेथें प्रसंग आहे तेथेंच अति प्रसंगाची शंका. ॥ १०५ ॥ लहान मुलाला कोणच्याही कर्माचा विधि-निषेध नसल्यामुळें अति प्रसंगाचा दोष लागत नाहीं. ॥ १०६ ॥ शि०—बाळ अगदीं अज्ञ असतो म्हणून त्याला तो दोष लागत नाहीं. गु०—तत्त्ववेत्ता सर्वज्ञ असतो म्हणून त्यालाही तो दोष लागत नाहीं. शि०—मग विधि-निषेध कोणी बाळगावेत ? गु०—अल्पज्ञ लोकांनीं ते अज्ञान्यालाही नाहींत, व सर्वज्ञालाही नाहींत. ॥ १०७ ॥ शि०—आम्ही असें ऐकितों कीं, शापानुग्रह सामर्थ्य असणें हें तत्त्ववेत्त्याचें मुख्य लक्षण आहे. तें ज्याला नाहीं तो ज्ञानीच नव्हे. गु०—तसें समजणें ती अगदींच चूक आहे. तें सामर्थ्य ज्ञानाचें फळ नव्हे, तर केवळ तपाचें फळ आहे. ॥ १०८ ॥ शि०—व्यासादिक जे ज्ञानी होऊन गेले त्यांचे आंगीं तें सामर्थ्य दिसत होतें. गु०—त्याचें कारण असें कीं, ते ज्ञानी असून तपस्वीही होते म्हणून त्यांचे आंगीं तें सामर्थ्य होतें. पण तें कांहीं ज्ञानाचें फळ नव्हे. ज्ञान होण्यालाही एक प्रकारचें तपच पाहिजे. पण शापादि सामर्थ्यास कारणीभूत तपापासून तें ज्ञानजनक तप निराळें आहे. त्यापासून ज्ञानच होतें. ॥ १०९ ॥ तीं दोन्ही तपें ज्यानें केलीं असतील त्याला ज्ञान आणि सामर्थ्य हीं दोनहीं फळें मिळतात आणि एकच करणाराला एकच फळ मिळतें. ॥ ११० ॥ शि०—विधि-निषेध-रहित अशा तत्त्ववेत्त्याच्या

---

सर्वास्थो मुक्त एवोत्तमाशयः ॥ २॥ नैष्कर्म्येण न तस्यार्थस्तस्यार्थोऽस्ति न कर्मभिः ॥ न समाधानजप्याभ्यां यस्य निर्वासनं मनः ॥ ३ ॥ आत्मासंगस्ततोऽनत्स्यादिंद्रजालं हि मायिकम् ॥ इत्यचंचलनिर्णिते कुतो मनसि वासना ॥ ४ ॥ एवं नास्ति प्रसंगोऽपि कुतोऽस्यातिप्रसंजनम् ॥ प्रसंगो यस्य तस्यैव शंक्येतातिप्रसंजनम् ॥ ५ ॥ विध्यभावान्न बालस्य दृश्यतेऽतिप्रसंजनम् ॥ स्यात्कुतोऽतिप्रसंगोऽस्य विध्यभावे समे सति ॥ ६ ॥ न किंचिद्वेत्ति बालश्चेत्सर्वं वेत्त्येव तत्त्ववित् ॥ अल्पज्ञस्यैव विधयः सर्वे स्युर्नान्ययोर्द्वयोः ॥ ७ ॥ शापानुग्रहसामर्थ्यं यस्यासौ तत्त्वविद्यदि ॥ तन्न शापादिसामर्थ्यं फलं स्यात्तपसो यतः ॥ ८ ॥ व्यासादेरपि सामर्थ्यं दृश्यते तपसो बलात् ॥ शापादिकारणादन्यत्तपो ज्ञानस्य कारणम् ॥ ९ ॥ द्वयं यस्यास्ति तस्यैव सामर्थ्यज्ञानयोर्जनिः ॥ एकैकं तु ततः कुर्वन्नेकैकं लभते फलम् ॥ ११० ॥ सामर्थ्यहीनो

आंगीं शापादि सामर्थ्य जर नसेल तर त्याची विधिपूर्वक कर्मानुष्ठान करणारे पुरुष निंदा करितात. गु०—करीतना बापडे! असे निंदा करणारे पुरुष तरी निंदेतून कुठें सुटले आहेत? त्यांचीही निंदा करण्यास विषयलंपट पुरुष तयार आहेतच! ॥ १११ ॥ शि०—यतींनीं भोगतुष्टीकरितां भिक्षा मागितली व वस्त्रादिकांचें संरक्षण केलें ह्मणून दोष काय? गु०—मग त्यांचें यतित्व काय विचारावें! त्यांचें वैराग्य किती म्ह न वर्णावें! ॥ ११२ ॥ शि०—विषयलंपटांनीं केलेल्या निंदेनें वर्णाश्रम पाळणाऱ्या पुरुषाची मुळींच हानि नाहीं. गु०—मग देहाला मी ह्मणणाऱ्या कर्मठ पुरुषानें ज्ञान्याची निंदा केली असतां त्याचा तरी काय तोटा आहे? ॥ ११३ ॥ शि०—मग तर तुमचें ह्मणणें काय तें तरी सांगा? गु०—आमचें म्हणणें इतकेंच कीं, तत्त्वज्ञान झाल्यानें व्यवहाराचीं देहेंद्रियादिक साधनें ज्या अर्थी नष्ट होत नाहींत त्या अर्थी राज्यादिक व्यवहार करण्यास त्याला कोणची नड आहे असें कांहीं नाहीं. ॥ ११४ ॥ शि०—तत्त्ववेत्त्याला सर्व प्रपंच मिथ्या आहे असा निश्चय झाल्यामुळें त्याविषयीं त्याची इच्छा कशी राहील? गु०—राहते असें आमचें तरी कोठें म्हणणें आहे? तो कांहीं वेळ ध्यानांत व कांहीं वेळ व्यवहारांत अशा रीतीनें प्रारब्धानुसार कालक्षेप करितो. ॥ ११५ ॥ शि०—तर तत्त्ववेत्ता आणि उपासक यांमध्यें भेद काय? गु०—भेद इतकाच कीं, तत्त्ववेत्त्याला जसें पाहिजे तसें राहतां येतें तसें उपासकास राहतां येत नाहीं. ज्या अर्थीं विष्णु आदि दैवतांप्रमाणें त्याचा ब्रह्मपणा ध्यानानेंच केला आहे, त्या अर्थीं त्यानें सदां सर्वदां ध्यानांतच असलें पाहिजे. ॥ ११६ ॥ शि०—मग त्या ध्यानानें झालेल्या ब्रह्मतेला हानी कोणची? गु०—ध्यान जोंपर्यंत आहे तोंपर्यंत कांहीं त्याला हानी नाहीं. ध्यान नष्ट झालें कीं, ती नष्ट झाली. कारण, ती ध्यानाचीच बनलेली आहे. ॥ ११७ ॥ शि०—ध्यान गेलें असतां जशी ब्रह्मता नाहींशी होते, तशी ज्ञान गेल्यानेंही ती नाहींशी होईल, गु०—तसें कधींही होणार नाहीं. कारण, ज्ञान्याची ब्रह्मता ज्ञानानें नवीन झाली असें नाहीं; ती मुळचीच

---

'निंद्यश्चेद्यतिभिर्विधिवर्जितः ॥ निंद्यंते यतयोऽप्यन्यैरनिशं भोगलंपटैः ॥ ११ ॥ भिक्षावस्त्रादि रक्षेयुर्येद्येते भोगतुष्टये ॥ अहो यतित्वमेतेषां वैराग्यभरमंथरम् ॥ १२ ॥ वर्णाश्रमपरान्मूढानिंदंत्वित्युच्यते यदि ॥ देहात्ममतयो बुद्धं निंदंत्वाश्रममानिनः ॥१३॥ तदित्थं तत्त्वविज्ञाने साधनानुपमर्दनात् ॥ ज्ञानिनाऽचरितुं शक्यं सम्यग् राज्यादि लौकिकम् ॥१४॥ मिथ्यात्वबुद्ध्या तत्रेछा नास्ति चेत्तर्हि माऽस्तु तत् ॥ ध्यायन्वाऽथ व्यवहरन्य थाऽरब्धं वसत्वयम् ॥१५॥ उपासकस्तु सततं ध्यायन्नेव वसे द्यतः॥ ध्यानेनैव कृतं तस्य ब्रह्मत्वं विष्णुतादिवत् ॥१६॥ ध्यानोपादानकं यत्तद्ध्यानाभावे विलीयते ॥ वास्तवी ब्रह्मता नैव ज्ञानाभावे विलीयते ॥१७॥ ततोऽभिज्ञापकं ज्ञानं न नित्यं जनयत्यदः ॥ ज्ञापकाभावमात्रेण न हि

सिद्ध आहे. केवळ ती ज्ञानानें प्रकाशित मात्र केली; म्हणून प्रकाशित करणारें ज्ञान जरी नष्ट झालें, तरी ती जशाची तशीच असते. याकरितां ब्रह्मास दाखविणारें जें ज्ञान तें त्यास नवीन बनवीत नाहीं. म्हणून तें गेल्यानें सत्य ब्रह्मस्वरूप नष्ट होत नाहीं हें उघड आहे. ॥ ११८॥ शि०—ज्ञान्याप्रमाणें उपासकाचीही ब्रह्मता खरीच आहे. गु०--त्या दृष्टीनें पाहिलें असतां अज्ञानी मनुष्यांची व पशुपक्ष्यादिकांचीही ब्रह्मता खरी आहे. ॥ ११९ ॥ शि०—पण त्यांच्या अज्ञानामुळें ती असून नसल्यासारखी आहे. मग त्यांत पुरुषार्थ कोणता ? गु०—ही गोष्ट उपासकासही लागू आहे. कारण, त्यालाही ज्ञान नसतें. शि०—मग उपासना कशास सांगतां ? गु०—आह्मी जी उपासना सांगतों ती केवळ "उपवासात् वरं भिक्षा" या न्यायानें सांगतों. उपाशी मरण्यापेक्षां जशी भिक्षा बरी, तसें इतर अनुष्ठानापेक्षां ध्यान बरें. ॥ १२० ॥ एकापेक्षां एक श्रेष्ठ आहेच आहे, अडाण्याच्या व्यवहारापेक्षां कर्मानुष्ठान बरें, त्याहीपेक्षां सगुणोपासना बरी, त्याहीपेक्षां निर्गुण उपासना श्रेष्ठ. ॥ १२१ ॥ याप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कारापर्यंत एकावर एक अशा ह्या पायऱ्या आहेत. तुझी निर्गुण उपासना चांगली दृढ झाली म्हणजे त्यापासून ब्रह्मज्ञान होतें. ॥ १२२ ॥ ज्याप्रमाणें संवादि-भ्रमापासून फलकाल आला असतां फलप्राप्ति होते, त्याप्रमाणें निर्गुण उपासना पक्व होऊन मोक्षप्राप्तीची वेळ आली म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होतो. ॥ १२३ ॥ शि०—संवादिभ्रमानें प्रवृत्त झालेल्या पुरुषाला इंद्रियार्थसंनिकर्षापासून पुढें ज्ञान होतें; पण तो भ्रमच ज्ञान होऊं शकत नाहीं. गु०—उपासनेची ही गोष्ट तशीच आहे. ती तरी स्वतः ज्ञान कोठें आहे ? महावाक्यापासून होणाऱ्या अपरोक्ष ज्ञानाला ती कारण आहे. ॥ १२४ ॥ शि०—निर्गुण उपासना जशी अपरोक्ष ज्ञानास कारण आहे, तशीं मूर्तिध्यानमंत्रादिही ज्ञानास कारण आहेत. मग उपासनेची एवढी प्रतिष्ठा कशाला ? गु०—होय, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण दोहोंमध्यें भेद इतकाच कीं, निर्गुण उपासना ज्ञानास अगदीं जवळची पायरी आहे. बाकीचीं मंत्रादि साधनें दूरच्या पायऱ्या आहेत. ॥ १२५ ॥ शि०--जवळची पायरी म्हटलें त्याचा अर्थ काय ? गु०—त्या-

---

सत्यं विलीयते ॥ १८ ॥ आस्त्येवोपासकस्यापि वास्तवी ब्रह्मतेति चेत् ॥ पामराणां तिरश्चां च वास्तवी ब्रह्मता न किम्॥१९॥ अज्ञानादपुमर्थत्वमुभयत्रापि तत्समम् ॥ उपवासाद्यथा भिक्षा वरं ध्यानं तथान्यतः ॥ १२० ॥ पामराणां व्यवहृतेर्वरं कर्माद्यनुष्ठितिः ॥ ततोऽपि सगुणोपास्तिर्निर्गुणोपासना ततः ॥ २१ ॥ यावद्विज्ञानसामीप्यं तावच्छ्रैष्ठ्यं विवर्धते ॥ ब्रह्मज्ञानाय ते साक्षान्निर्गुणोपासनं शनैः ॥ २२ ॥ यथा संवादिविभ्रांतिः फलकाले प्रमायते ॥ विद्यायते तथोपास्तिर्मुक्तिकालेऽतिपाकतः॥२३॥ संवादिभ्रमतः पुंसः प्रवृत्तस्यान्यमानतः ॥ प्रमेति चेत्तथोपास्तिर्मांतरं कारणाय ताम् ॥२४॥ मूर्तिध्यानस्य मंत्रादेरपि कारणता यदि ॥ अस्तु नाम तथाप्यत्र प्रत्यासत्तिर्विशिष्यते ॥ २५ ॥ नि-

या अर्थ हाच कीं, निर्गुण उपासना पक्क झाली म्हणजे हळूहळू सविकल्प समाधि साधतो, तो पक्क झाला म्हणजे अनायासानें निर्विकल्प समाधि होतो. ॥ १२६ ॥ तो झाल्यानंतर असंग जी आत्मवस्तु तीच तो पुरुष होतो. ही भूमि पुनः चांगली दृढ झाल्यावर त्यास महावाक्यापासून तत्त्वज्ञान होतें, ॥ १२७ ॥ तसें झाल्यानंतर मी निर्विकारी, असंग, नित्य स्वप्रकाश आणि परिपूर्ण आहें, अशीं जीं शास्त्रोक्त ब्रह्माचीं लक्षणें तीं त्याच्या बुद्धींत लवकर ठसतात. ॥ १२८ ॥ याकरितांच अमृतबिंद्वादि उपनिषदांत योगाभ्यास सांगितला आहे. याप्रमाणें निर्विकल्प समाधिरूप दृष्टफल प्राप्तीच्या संबंधानेंही इतर साधनापेक्षां निर्गुण उपासना श्रेष्ठ आहे. ॥ १२९ ॥ ऐवढें निर्गुण उपासनेचें फल असून तिची उपेक्षा करून जे तीर्थयात्रा जपादिक कर्मे करितात त्यांना " पिंड समुत्सृज्य करं लेढि " ( हातांतील लाडू टाकून हात चाटीत बसणें ) ही म्हण लागू पडते. ॥ १३० ॥ शि०--विचार सोडून जे लोक उपासना करितात त्यांस देखील ही म्हण लागू पडत नाहीं काय ? गु०--नाहीं कोण म्हणतो, त्यांसही ती तशीच लागू पडते. जशी तीर्थयात्रेपेक्षां उपासना श्रेष्ठ तसा उपासनेपेक्षां विचार श्रेष्ठ. परंतु आह्मीं जो योग ( उपासना ) सांगितला, तो विचारक्षम पुरुषास नव्हे. ज्यास विचार नाहीं त्यास तो सांगितला. ॥ १३१ ॥ शि०—कित्येकांस विचार कां होत नाहीं ? गु०—ज्यांचें चित्त कामक्रोधादिकांनीं गांजलें गेलें आहे त्यांस विचार करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें तत्त्वज्ञान होत नाहीं. म्हणून त्यांस योगच मुख्य आहे. तेणेंकरून बुद्धिजाड्य नाहींसें होतें. ॥ १३२ ॥ आणि ज्यांच्या चित्तांत कामक्रोधादिक नसल्यामुळें आयतें वैराग्य असून केवळ आत्म्याविषयीं अज्ञान मात्र आहे, त्यांना सांख्यनामक विचार मुख्य सांगितला. त्यापासूनच त्यांना लवकर मुक्ति मिळते. ॥ १३३ ॥ यास गीतावा-

---

र्गुणोपासनं पक्कं समाधिः स्याच्छनैस्ततः॥ यः समाधिर्निरोधाख्यः सोऽनायासेन लभ्यते ॥ २६ ॥ निरोधलाभे पुंसोऽतरसंगं वस्तु शिष्यते ॥ पुनः पुनर्वासितेऽस्मिन्वाक्याज्जायेत तत्त्वधीः ॥२७॥ निर्विकारासंगनित्यस्वप्रकाशैकपूर्णताः ॥ बुद्धौ झटिति शास्त्रोक्ता आरोहंत्यविवादतः ॥ २८ ॥ योगाभ्यासस्त्वेतदर्थोऽमृतबिंद्वादिषु श्रुतः ॥ एवं च दृष्टद्वारापि हेतुत्वादन्यतो वरम् ॥ २९॥ उपेक्ष्य तत्तीर्थयात्राजपादीनेव कुर्वताम् ॥ पिंडं समुत्सृज्य करं लेढीति न्याय आपतेत् ॥१३०॥ उपासकानामप्येवं विचारत्यागतो यदि॥ वाढं तस्माद्विचारस्यासंभवे योग ईरितः ॥ ३१ ॥ बहुव्याकुलचित्तानां विचारात्तत्त्वधीर्नहि ॥ योगो मुख्यस्ततस्तेषां धीदर्पस्तेन नश्यति ॥ ३२ ॥ अव्याकुलधियां मोहमात्रेणाच्छादितात्मनाम् ॥ सांख्यनामा विचारः स्यान्मुख्यो झटिति सिद्धिदः ॥ ३३ ॥ यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ॥ एकं सांख्यं च यो-

क्य प्रमाण " यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं " या श्लोकाचा अभिप्राय असा आहे कीं, जें फळ सांख्यापासून मिळतें तेंच योगापासून मिळतें. ते दोन्हीही फलत्वेंकरून एकच आहेत असें ज्याला समजतें, त्यामच शास्त्रसिद्धांत समजला. ॥ १३४ ॥ श्रुतीचेंही तसेंच प्रमाण आहे. " तत्कारणं सांख्ययोगाभिगम्यं " या श्रुतीचा अर्थ तें जगत्कारण ब्रह्म सांख्य किंवा योगापासून समजतें. शि०—योग आणि सांख्य हे दोनही मुक्तीस जर साधन आहेत, तर त्या शास्त्रांत सांगितलेलें सर्वच प्रमाण म्हणून समजलें पाहिजे. गु०—तसें नव्हे, त्यांत श्रुतिविरुद्ध जे विचार ते आभास म्हणून गाळावे. ॥ १३५ ॥ शि०—उपासना करणाराला ज्ञान न होतां मरण आलें तर मोक्षसिद्धि कशी होते ? गु०—ज्याची उपासना या जन्मीं पक्व झाली नाहीं त्याला अंतकालीं किंवा ब्रह्मलोकीं तत्त्वज्ञान होऊन मुक्ति मिळते. ॥ १३६ ॥ मरणकालीं जी मुक्ति होते त्यास प्रमाण, जो जो भाव स्मरून प्राणी देह सोडितो, तो तो भाव त्याला प्राप्त होतो असें गीतेंत सांगितलें आहे. " यच्चित्तस्तेन याति " असेंही शास्त्र आहे. ॥ १३७ ॥ शि०—तुह्मी म्हणतां कीं, निर्गुण उपासना पक्व झाली तर त्यास मरणकाळीं मुक्ति होते, पण त्याविषयीं जीं प्रमाणें दिलीं त्यापासून पुनर्जन्म होतो असें सिद्ध होतें. तर या विरोधाचा परिहार कसा ? गु०—तें खरें आहे. पण सगुणोपासनेनें अन्तकालीं जसा सगुणसाक्षात्कार होतो तसा निर्गुणोपासनेनेंही निर्गुणसाक्षात्कार जाहलाच पाहिजे. ॥ १३८ ॥ शि०—तर त्याला निर्गुणरूपाची प्राप्ति होईल. मुक्ति कशी मिळेल ? गु०—अरे निर्गुणरूपाची प्राप्ति आणि मुक्ति यांत नाममात्रांचा भेद आहे. परंतु दोन्हींचा अर्थ एकच आहे. मुक्ति म्हणजे स्वरूपावस्थिति. ती एथें प्राप्त होतेच. ज्याप्रमाणें संवादि भ्रमाला भ्रम हें नाममात्र आहे. ॥ १३९ ॥ शि०—निर्गुण उपासना ही मानसिक क्रिया आहे, तेव्हां ती मुक्तीला साधन कशी होईल ? गु०—ती जरी साक्षात् साधन होत नाहीं, तरी मूळ अविद्येस भस्म करून टाकणारें ज्ञान तिजपासून उत्पन्न होतें. यास दुसरा दृष्टांत नको. सगुण उपासनेनें जशी तारक ब्रह्मबुद्धि होते, तसेंच निर्गुण उपासनेनें ब्रह्मज्ञान होतें. ॥१४०॥ शि०—यास प्रमाण

गं च यः पश्यति स पश्यति ॥ ३४ ॥ तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यमिति हि श्रुतिः ॥ यस्तु श्रुतेर्विरुद्धः स आभासः सांख्ययोगयोः ॥ ३५ ॥ उपासनं नातिपक्वमिह यस्य परत्र सः ॥ मरणे ब्रह्मलोके वा तत्त्वं विज्ञाय मुच्यते ॥ ३६ ॥ यं यं वाऽपि स्मरन् भावं त्यजत्यंते कलेवरम् ॥ तं तमेवैति यच्चित्तस्तेन यातीति शास्त्रतः ॥३७॥ अंत्यप्रत्ययतो नूनं भावि जन्म तथा सति॥ निर्गुणप्रत्ययोऽपि स्यात्सगुणोपासने यथा ॥ ३८ ॥ नित्यनिर्गुणरूपं तन्नाममात्रेण गीयताम् ॥ अर्थतो मोक्ष एवैष संवादिभ्रमवन्मतः ॥ ३९ ॥ तत्सामर्थ्याज्जायते धीर्मूलाविद्यानिवर्तिका ॥ अविमुक्तोपासनेन तारकब्रह्मबुद्धिवत् ॥ १४० ॥ सोऽकामो निष्काम इति ह्यशरीरो निरिंद्रियः ॥ अभयं हीति मुक्तत्वं तापनी-

काय ? गु०—" सोऽकामो निष्काम इति " इत्यादिक श्रुतीनें तापनीय उपनिषदांत उपासनेचें मोक्षरूप फळ सांगितलें आहे. ॥ १४१ ॥ शि०—उपासनेपासून मोक्षप्राप्ति होते असें आपण म्हणतां, त्यास " नान्यः पंथाः " या श्रुतीचा विरोध येतो. गु०—तसा विरोध येत नाहीं. कारण उपासनेपासून साक्षात् मुक्ति होते, असें आमचें म्हणणें मुळींच नाहीं. तिचे सामर्थ्यानें ज्ञान होऊन ज्ञानापासून मुक्ति होते. मग विरोध कसचा ? ॥ १४२ ॥ निष्काम उपासनेपासून मोक्षप्राप्ति होते असें तापनीय उपनिषदांत सांगितलें आहे. आणि सकामाला ब्रह्मलोक असें शैब्य प्रश्नांत सांगितलें आहे. ॥ १४३ ॥ शैब्य प्रश्नांत असें सांगितलें आहे कीं, जो ॐकाराची उपासना करतो तो ब्रह्मलोकास जातो; तो समष्टिरूप उपाधिपासून मुक्त होऊन परम पुरुषाप्रत पावतो. म्हणजे ब्रह्म होतो ॥ १४४ ॥ " अमतीकालंबनान्नयति " या बादरायणाच्या सूत्रांत क्रतुन्याय लाविला आहे. त्याचा अभिप्राय कामानुसारें करून फलप्राप्ति होते असें ठरतें. ॥ १४५ ॥ शि०—मग त्यांना मुक्ति कशी ? गु०—त्या त्या निर्गुण उपासनेच्या सामर्थ्यानें तत्त्वज्ञान होतें. पुनः संसारांत येत नाहीं. कल्पांतीं तो मुक्त होतो. ॥ १४६ ॥ वेदांमध्यें ज्या प्रणव उपासना सांगितल्या आहेत त्या बहुतेक निर्गुण आहेत. क्वचित् स्थलीं सगुण सांगितली आहे. ॥ १४७ ॥ पिप्पलादि मुनीनें प्रश्न करणाऱ्या शिष्याला पर आणि अपर ( निर्गुणसगुण ) असे दोन प्रकारचें ब्रह्मरूप ॐकार वर्णिले आहेत ॥ ॥ १४८ ॥ " एतदालंबनम् " या वाक्यानें जो जें इच्छील तें त्यास मिळतें, असें यमानें नचिकेताला सांगितलें आहे. ॥ १४९ ॥ याकरितां उत्तम प्रकारें निर्गुण उपासना करणाराला या जन्मीं किंवा देहांत-कालीं किंवा ब्रह्मलोकीं ब्रह्मसाक्षात्कार होतो. ॥ १५० ॥ आत्म-

---

ये फलं श्रुतम् ॥ ४१ ॥ उपासनस्य सामर्थ्याद्विद्योत्पत्तिर्भवेत्ततः ॥ नान्यः पंथा इति ह्येतच्छास्त्रं नैव विरुध्यते ॥ ४२ ॥ निष्कामोपासनान्मुक्तिस्तापनीये समीरिता ॥ ब्रह्मलोकः सकामस्य शैब्यप्रश्ने समीरितः ॥ ४३ ॥ य उपास्ते त्रिमात्रेण ब्रह्मलोके स नीयते ॥ स एतस्माज्जीवघनात्परं पुरुषमीक्षते ॥४४॥ अप्रतीकाधिकरणे तत्क्रतुन्याय ईरितः ॥ ब्रह्मलोकफलं तस्मात्सकामस्येति वर्णितम् ॥ ४५ ॥ निर्गुणोपास्तिसामर्थ्यात्तत्र तत्त्वमवेक्षते ॥ पुनरावर्तते नायं कल्पांते च विमुच्यते ॥ ४६ ॥ प्रणवोपास्तयः प्रायो निर्गुणा एव वेदगाः ॥ क्वचित्सगुणताप्युक्ता प्रणवोपासनस्य हि ॥ ४७ ॥ परापरब्रह्मरूप ॐकार उपवर्णितः ॥ पिप्पलादेन मुनिना सत्यकामाय पृच्छते ॥ ४८ ॥ एतदालंबनं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ॥ इति प्रोक्तं यमेनापि पृच्छते नचिकेतसे ॥४९ ॥ इह वा मरणे वाऽस्य ब्रह्मलोकेऽथ वा भवेत् ॥ ब्रह्मसाक्षात्कृतिः सम्यगुपासीनस्य निर्गुणम् ॥ १५० ॥ अर्थोऽ-

गीतेंतही हाच अभिप्राय सांगितला आहे. तेथें असें म्हटलें आहे कीं, विचार करण्यास ज्यांची बुद्धि समर्थ नाहीं, त्यांनीं एकसारखी सतत उपासनाच केली पाहिजे. ॥ १५१ ॥ ज्याला साक्षात्कार होत नाहीं त्यानें निःशंकपणें माझें ध्यान केलें असतां कालेंकरून त्याच्या अनुभवाला माझें स्वरूप येऊन त्यास खरोखर मोक्षरूप फळ मिळेल. ॥ १५२ ॥ ज्याप्रमाणें जमिनींत खोल पुरून ठेवलेला ठेवा मिळण्याला खणण्यावांचून दुसरा उपाय नाहीं, त्याप्रमाणें माझ्या स्वरूपाची प्राप्ति व्हावी असें ज्याच्या मनांत असेल त्यानें आत्मध्यानच केलें पाहिजे; दुसरा उपाय नाहीं. ॥ १५३ ॥ एथें मी हाच कोणी एक ठेवा आहे. त्याजवर बसविलेला देहरूप धोंडा काढून टाकून बुद्धिरूप कुदळीनें मनोभूमी पुनः पुनः खणली असतां आत्मठेवा मनुष्यास मिळेलच मिळेल. ॥ १५४ ॥ दुसरे वाक्याचें याविषयीं प्रमाण आहे. तें असें कीं, जरी साक्षात्कार झाला नाहीं तरी ब्रह्मास्मि हें चिंतन सोडूं नये. कारण, उपासनेच्या सामर्थ्यानें काष्ठपाषाणांत नसलेलें देवपण देखील येतें. मग आयतें असलेलें ब्रह्मपण मिळेल हें सांगावयास नको. ॥ १५५ ॥ ध्यानापासून देहादिकांविषयींचा अभिमान दिवसेंदिवस क्षीण होतो असें प्रत्यक्ष अनुभवास येत असून जो ध्यानाची उपेक्षा करितो त्याहून दुसरा पशु कोणता ? सांग बरें ! ॥ १५६ ॥ ध्यानापासून या मरणशील देहाविषयींचा अभिमान जाऊन मनुष्य अमर होत्साता याच देहीं ब्रह्मप्राप्तीचा सोहळा भोगतो. ॥ १५७ ॥ याप्रमाणें हा ध्यानदीप तुला सांगितला. जो मनुष्य चांगलें याचें चिंतन करील तो सर्व संशय जाऊन सदोदित ब्रह्मज्ञानांत त्याचा काल जाईल. ॥ १५८ ॥

---

यमात्मगीतायामपि स्पष्टमुदीरितः ॥ विचाराक्षम आत्मानमुपासीतेति संततम् ॥ ५१ ॥ साक्षात्कर्तुमशक्तोऽपि चिंतयेन्मामशंकितः ॥ कालेनानुभवारूढो भवेयं फलितो ध्रुवम् ॥ ५२ ॥ यथाऽगाधनिधेर्लब्धौ नोपायः खननं विना ॥ मल्लाभेऽपि तथा स्वात्मचिंतां मुक्त्वा न चापरः ॥ ५३ ॥ देहोपलमपाकृत्य बुद्धिकुद्दालकात्पुनः ॥ खात्वा मनोभुवं भूयो गृह्णीयान्मां निधिं पुमान् ॥ ५४ ॥ अनुभूतेरभावेऽपि ब्रह्मास्मीत्येव चिंत्यताम् ॥ अप्यसत्प्राप्यते ध्यानान्नित्याप्तं ब्रह्म किं पुनः ॥ ५५ ॥ अनात्मबुद्धिशैथिल्यं फलं ध्यानाद्दिने दिने ॥ पश्यन्नपि न चेद्ध्यायेत्कोऽपरोऽस्मात्पशुर्वद ॥ ५६ ॥ देहाभिमानं विध्वस्य ध्यानादात्मानमद्वयम् ॥ पश्यन्मर्त्योऽमृतो भूत्वा ह्यत्र ब्रह्म समश्नुते ॥ ५७ ॥ ध्यानदीपमिमं सम्यक्परामृशति यो नरः ॥ मुक्तसंशय एवायं ध्यायति ब्रह्म संततम् ॥ ५८ ॥

इति ध्यानदीपः

# सार्थपंचदश्याम्

## नाटकदीपः ।

### दशमप्रकरणम्



मागील प्रकरणांत उपासना म्हणजे काय व तिचा मुक्तीस किती उपयोग आहे हें सांगितलें. आतां या प्रकरणीं साक्षीचें स्वरूप नाटकाच्या रूपानें तुह्मांस सांगतों.

सृष्टीच्या पूर्वी अद्वयानंद परिपूर्ण जो आत्मा होता, तोच आपल्या मायेच्या योगानें आपणच जग होऊन त्यातेंच जीवरूपानें प्रवेश करिता झाला. ॥ १ ॥ तोच परमात्मा विष्णु आदि करून उत्तम देहाचेठायीं प्रवेश करून देवतारूप बनला, आणि मनुष्यादिक देहांचेठायीं प्रवेश करून त्याचा पूजक झाला. याप्रमाणें पूज्य आणि पूजक हे दोघेही एकाच परमात्म्याचीं रूपें आहेत. ॥ २ ॥ मग अनेक जन्मीं ईश्वराचें भजन करून आपल्या स्वरूपाचा विचार करण्याची इच्छा होते. विचारांतीं मायेचा नाश होऊन पूर्वीप्रमाणें अद्वयानंद पूर्ण आहे तसा रहातो. ॥ ३ ॥ आत्मा अद्वयानंदरूप असून त्याला द्वैताचा आरोप आला हाच दुःखरूप बंध आहे आणि स्वरूपेंकरून जी स्थिति तीच मुक्ति असें ह्मटलें आहे. ब्रह्माहमस्मि या ज्ञानापासून मुक्ति होते असें जें म्हटलें त्याचा हाच अर्थ आहे. ॥ ४ ॥ अविचारापासून जो बंध प्राप्त झाला आहे त्याची निवृत्ति होण्यास दुसरा उपायच नाहीं. ह्मणून जीवात्मा ह्मणजे काय आणि परमात्मा ह्मणजे काय याचा सतत विचार करावा. ॥ ५ ॥ देहादिकाला मी असें ह्मणणारा जो चिदाभास त्यास कर्ता असें म्हणतात, तोच जीव. मन हें त्याचें साधन आहे. त्या मनाच्या, एक अन्तर्वृत्ति आणि दुसरी बहिर्वृत्ति अशा क्रमानें होणाऱ्या दोन क्रिया आहेत. ॥ ६ ॥ मी मी अशी जी अंतर्मुख वृत्ति ती कर्त्याला दाखविते. आणि इदम् ह्मणजे हें

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ नाटकदीपप्रारंभः ॥ परमात्माऽद्वयानंद पूर्णः पूर्वं स्वमायया ॥ स्वयमेव जगद्भूत्वा प्राविशज्जीवरूपतः ॥ १ ॥ विष्ण्वाद्युत्तमदेहेषु प्रविष्टो देवता भवेत् ॥ मर्त्याद्यधमदेहेषु स्थितो भजति मर्त्यताम् ॥ २ ॥ अनेकजन्मभजनात् स्वविचारं चिकीर्षति ॥ विचारेण विनष्टायां मायायां शिष्यते स्वयम् ॥३॥ अद्वयानंदरूपस्य सद्वयत्वं च दुःखिता ॥ बंधः प्रोक्तः स्वरूपेण स्थितिर्मुक्तिरितीर्यते ॥ ४ ॥ अविचारकृतो बंधो विचारेण निवर्तते ॥ तस्माज्जीवपरात्मानौ सर्वदैव विचारयेत् ॥ ५ ॥ अहमित्यभिमंता यः कर्ताऽसौ तस्य साधनम् ॥ मनस्तस्य क्रिये अंतर्बहिर्वृत्ती क्रमोत्थिते ॥ ६ ॥ अंतर्मुखाऽहमित्येषा वृत्तिः

ह्मणणारी जी बहिर्मुखवृत्ति ती जगांतील बाह्य वस्तूस दाखविते. ॥ ७ ॥ या इदंवृत्तीचे शब्द स्पर्शादि पांच भेद आहेत. इदंवृत्ति ही मनाची एक सामान्य वृत्ति आहे. वरील पांच भेद घ्राणादि इंद्रियपंचकांनीं निरनिराळे केले आहेत. ॥ ८ ॥ पूर्वी सांगितलेला कर्ता क्रिया व निरनिराळे विषय या सर्वांस एकदम भासविणारा जो एक कोणी ज्ञानरूप आहे त्यास वेदांतशास्त्रांत साक्षी असें ह्मणतात. ॥ ९ ॥ ज्याप्रमाणें नाटकगृहांतील दिवा त्या गृहासहित नटप्रेक्षकादिकांस एकदम प्रकाशवितो, त्याप्रमाणें मी पाहतों, मी ऐकतों, मी हुंगतों, मी स्वाद घेतों आणि मी स्पर्श जाणतों, या सर्व ज्ञान क्रिया त्या साक्षीच्या योगानें एकदम भासविल्या जातात. ॥ १० ॥ ज्याप्रमाणें नाटकगृहांतील मुख्य दिवा, मुख्य यजमान, प्रेक्षकजन आणि रंगभूमीवर नाचणारी नर्तकी या सर्वांस एकदम प्रकाशित करितो; व त्याच्या अभावींही स्वतः प्रकाशमान असतो. ॥ ११ ॥ त्याप्रमाणें साक्षी हा अहंकार, विषय आणि बुद्धि या सर्वांस भासवून त्यांच्या अभावीं ह्मणजे निद्रादिक अवस्थांच्या ठायींही तो स्वतः भासतो. ॥१२॥ एथें अहंकारादिकांस बुद्धीच प्रकाशित करते, अशी शंका घेऊं नये. कारण, ती विकारी असल्यामुळें जड आहे. निरंतर ज्ञानरूपें करून भासणारा जो कूटस्थ त्याच्या प्रकाशानें ही बुद्धि प्रकाशित होऊन नानाप्रकारचें नृत्य करिते; ह्मणजे एकदां घटाकार एकदां पटाकार होते.॥१३॥एथें अहंकार हा मुख्य यजमान, विषय हे प्रेक्षकजन, बुद्धि ही नाचणारी कलावंतीण, इंद्रियें हीं तालमृदंग वाजविणारे, आणि त्या सर्वांस प्रकाशविणारा साक्षी हा दिवा असें रूपक बसवावें. ॥ १४ ॥ दिवा जसा आपल्या ठिकाणींच असून सर्वत्र प्रकाश देतो, त्याप्रमाणें साक्षीही आपल्याच ठिकाणीं स्थिर राहून आंत बाहेर प्रकाशवितो. ॥ १५ ॥ एथें आंत बाहेर ह्मणून जो.

---

कर्तारमुल्लिखेत् ॥ बहिर्मुखेदमित्येषा बाह्यं वस्त्विदमुल्लिखेत् ॥ ७ ॥ इदमो ये विशेषाः स्युर्गंधरूपरसादयः ॥ असांकर्येण तान् भिंद्याद् घ्राणादींद्रियपंचकम् ॥ ८ ॥ कर्त्तारं च क्रियां तद्वद्व्याहृत्तविषयानपि ॥ स्फोरयेदेकयत्नेन योऽसौ साक्ष्यत्र चिद्वपुः ॥ ९ ॥ ईक्षे शृणोमि जिघ्रामि स्वादयामि स्पृशाम्यहम् ॥ इति भासयते सर्वं नृत्यशालास्थदीपवत् ॥ १० ॥ नृत्यशालास्थितो दीपः प्रभुं सभ्यांश्च नर्तकीम् ॥ दीपयेदविशेषेण तदभावेऽपि दीप्यते ॥ ११ ॥ अहंकारं धियं साक्षी विषयानपि भासयेत् ॥ अहंकाराद्यभावेऽपि स्वयं भात्येव पूर्ववत् ॥ १२ ॥ निरंतरं भासमाने कूटस्थे ज्ञप्तिरूपतः ॥ तद्भासा भास्यमानेयं बुद्धिर्नृत्यत्यनेकधा ॥ १३ ॥ अहंकारः प्रभुः सभ्या विषया नर्तकी मतिः ॥ तालादिधारीण्यक्षाणि दीपः साक्ष्यवभासकः ॥ १४ ॥ स्वस्थानसंस्थितो दीपः सर्वतो भासयेद्यथा ॥ स्थिरस्थायी तथा साक्षी बहिरंतः प्रकाशयेत् ॥ १५ ॥ बहिरंतर्विभागोऽयं देहापेक्षो न साक्षिणि ॥

विभाग केला तो साक्षीस लागत नाहीं. तो देहामुळें झाला आहे. देहाचे बाहेर विषय आहेत आणि आंत अहंकार आहे. ॥ १६ ॥ एथें साक्षी आंत बाहेर भासवितो असें जें म्हटलें त्याचा अर्थ आंत एकदां भासवितो आणि बाहेर एकदां भासवितो असें समजूं नये. कारण साक्षीचेठायीं तसें चांचल्य मुळींच नाहीं. तसें चांचल्य दिसण्याचें कारण हेंच कीं, देहाचे आंत असणारी बुद्धि नेत्रादिद्वारा वारंवार येरझारा घालते, तेव्हां त्या बुद्धीचें चांचल्य साक्षींत आहे असें उगीच भ्रांतीनें वाटतें. ॥ १७ ॥ ज्याप्रमाणें खिडकींतून घराच्या आंतल्या बाजूस आलेलें किरण स्वतः अचल असतांही त्यांत हात नाचविला असतां तें किरणच नाचतें अशी भ्रांति वाटते. ॥ १८ ॥ त्याप्रमाणें साक्षीही आपल्या ठिकाणीं स्थिर असून आंत बाहेर येरझारा करीत असूनही बुद्धिचांचल्यास्तव तो करितो अशी भ्रांति होते. ॥ १९ ॥ हा साक्षी बाहेरही नाहीं व आंतही नाहीं. आंत बाहेर हा देशविभाग केवळ बुद्धीचा आहे. बुध्यादिकांचा लय झाला असतां तो आपला आहे तेथेंच आहे. ॥ २० ॥ आतां याजवर कोणी अशी शंका घेईल कीं, जेथें देश मुळींच नाहीं तेथें "आहे तेथेंच आहे" असें तरी साक्षीस ह्मणणें कसें संभवेल ? तर आमचें तरी ह्मणणें असें कुठें आहे ! त्याला देश परिच्छेद मुळींच नाहीं. आतां श्रुतीमध्यें सर्वगतत्व जें त्याला लाविलें तें केवळ सर्व देशाची कल्पना मनांत आणून लाविलें. स्वतः त्याला कोणचेंच विशेषण लागत नाहीं. ॥ २१ ॥ साक्षित्व मुद्धां जें आहे तें बुद्धीच्याच संबंधानें आहे, ह्मणून आंत बाहेर किंवा सर्व देश यांची बुद्धि जशी जशी कल्पना करील त्या त्या देशांत तो साक्षी व्यापक आहे असें समजावें. ॥ २२ ॥ देशाप्रमाणें वस्तूंच्या ठायीं ही योजना करावी ती अशी कीं, ज्या ज्या रूपाची कल्पना बुद्धि करील त्या त्या रूपास प्रकाशविणारा हा साक्षी आहे. पण स्वतः तो जर ह्मणाल तर वाणी आणि बुद्धि यांस अगोचर आहे. ॥ २३ ॥ तर असा जो वाणी आणि बुद्धि यांस अगोचर साक्षी तो मु-

---

विषया बाह्यदेशस्था देहस्यांतरहंकृतिः ॥ १६ ॥ अंतस्था धीः सहैवाक्षैर्बहिर्याति पुनः पुनः ॥ भास्यबुद्धिस्थचांचल्यं साक्षिण्यारोप्यते वृथा ॥१७॥ गृहांतरगतः स्वल्पो गवाक्षादातपोऽचलः ॥ तत्र हस्ते नर्त्यमाने नृत्यतीवातपो यथा ॥ १८ ॥ निजस्थानस्थितः साक्षी बहिरंतर्गमागमौ ॥ अकुर्वन् बुद्धिचांचल्यात् करोतीव तथा तथा ॥ १९ ॥ न बाह्यो नांतरः साक्षी बुद्धेर्देऽशौ हि तावुभौ ॥ बुध्याद्यशेषसंशांतौ यत्र भात्यस्ति तत्र सः ॥ २० ॥ देशः कोऽपि न भासेत यदि तर्ह्यस्त्वदेशभाक् ॥ सर्वदेशप्रक्लृप्त्यैव सर्वगत्वं न तु स्वतः ॥ २१ ॥ अंतर्बहिर्वा सर्वं वा यं देशं परिकल्पयेत् ॥ बुद्धिस्तद्देशगः साक्षी तथा वस्तुषु योजयेत् ॥२२॥ यद्यद्रूपादि कल्प्येत बुध्या तत्तत्प्रकाशयन् ॥ तस्य तस्य भवेत्साक्षी स्वतो वाग्बुध्यगोचरः ॥ २३ ॥ कथं तादृङ्मया ग्राह्य

मुक्षूस प्राप्त कसा व्हावा असें जर कोणी म्हणेल तर त्याजवर हें उत्तर कीं, त्याचें अग्राह्यत्व आम्हांस इष्टच आहे. सर्व पदार्थांच्या ग्रहणांची शांति झाली म्हणजे अर्थातच तो उर्वरित राहतो. ॥ २४ ॥ तुम्हीं सांगितल्या युक्तीनें आत्मा उर्वरित राहतो असें जरी झालें तरी त्यास कांहीं तरी प्रमाण पाहिजे असें कोणी म्हणेल तर येथें प्रमाणाची अपेक्षा नाहीं. कारण तो स्वप्रकाशक आहे. तथापि तसें प्रमाणच पाहिजे असेल तर गुरूजवळ जाऊन श्रुतीचें अध्ययन कर. ॥ २५ ॥ सर्व ग्रहांचा त्याग करणें जर कठिण वाटेल तर बुद्धीलाच शरण गेलें म्हणजे झालें. बुद्धीस शरण जाणें म्हणजे तिचा निरोध न करितां बाई तूं काय करशील तें कर असें ह्मणून मोकळी सोडून दे म्हणजे झालें. मग आंत बाहेर साक्षीचाच अनुभव येईल.॥२६

नाटकदीप समाप्त.

इति चेन्मैव गृह्यताम् ॥ सर्वग्रहोपसंशांतौ स्वयमेवावशिष्यते ॥ ॥ २४ ॥ न तत्र मानापेक्षाऽस्ति स्वप्रकाशस्वरूपतः ॥ तादृग्व्युत्पत्त्यपेक्षा चेच्छ्रुतिं पठ गुरोर्मुखात् ॥ २५ ॥ यदि सर्वग्रहत्यागो ऽशक्यस्तर्हि धियं व्रज ॥ शरणं तदधीनोंतर्बहिर्वैषोऽनुभूयताम् ॥ २६ ॥ इति नाटकदीपः ॥ १० ॥

॥ इति नाटकदीपः ॥



# सार्थपंचदश्याम्

## ब्रह्मानन्दे योगानन्दः ।

### एकादशप्रकरणम् ।

एथपर्यंत विवेकपंचक आणि दीपपंचक असे दोन भाग झाले. आतां या भागांत पांच प्रकारचे आनंद सांगितले आहेत. त्यांपैकीं ब्रह्मानंदाचें विवेचन आह्मी या प्रकरणांत करणार ह्मणून यास ब्रह्मानंद असें नांव आह्मी ठेवितों. त्याचें चांगलें ज्ञान झालें असतां या लोकींचे व परलोकींचे जे अनर्थ आहेत त्यांपासून मुक्त होऊन मनुष्य आनंदरूप ब्रह्मच होतो. ॥ १ ॥ यास श्रुतीचें प्रमाण ब्रह्मवेत्त्यास परब्रह्माची प्राप्ति होते. आत्मवेत्ता शोकसागरांतून तरून जातो. हा आत्मा एक आनंदरसच आहे यापेक्षां मोठा आनंद दुसरा नाहीं. तो मिळाला तरच प्राणी आनंदी होतो त्यावांचून होणार नाहीं. ॥२॥ सद्गुरुकृपेनें जेव्हां यास ब्रह्मस्थिति प्राप्त होते तेव्हां तो भयरहित होतो, आणि त्यांत अंतर पडल्यास त्याला भय प्राप्त होतें. ॥ ३ ॥ " भीषास्माद्वातः पवते " या श्रुतीचाही अभिप्राय हाच आहे. तो असा कीं, वायु, सूर्य, वन्हि, इंद्र व मृत्यु ह्या ज्या पांच नियामक देवता, धर्म चांगला जाणत असूनही त्यांनीं जन्मांतरीं ब्रह्मास भेददृष्टीनें पाहिल्यामुळें त्याच्या भीतीनेंच आपलीं कामें बजावीत आहेत. ॥ ४ ॥ ब्रह्मानंद जाणणाऱ्या पुरुषाला कशाचीही भीति नाहीं. कारण भीतीला दुसरी वस्तु असली पाहिजे. परंतु तो ब्रह्मानंद अद्वैत आहे ह्मणून तेथें भीतीस जागाच उरली नाहीं. अमुक पुण्य केलें नाहीं, अमुक पाप मीं केलें अशी जी कर्मजाड्यापासून होणारी चिंता ती त्यास मात्र बाधत नाहीं. इतर मूढांस बाधते. ॥ ५ ॥ याप्रमाणें तो तत्त्ववेत्ता पुण्यपापरूप दोन्ही कर्मांचा मिथ्यात्व अनुसंधानानें त्याग करून आत्म्याचेंच स्मरण करीत बसतो. तीं केलेलीं पुण्यपापें

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ ब्रह्मानंदे योगानंदः ॥ ब्रह्मानंदं प्रवक्ष्यामि ज्ञाते तस्मिन्नशेषतः ॥ ऐहिकामुष्मिकानर्थव्रातं हित्वा सुखायते ॥ १ ॥ ब्रह्मवित्परमाप्नोति शोकं तरति चात्मवित् ॥ रसो ब्रह्मरसं लब्ध्वाऽऽनंदी भवति नान्यथा ॥ २ ॥ प्रतिष्ठां विंदते स्वस्मिन् यदा स्यादथ सोऽभयः ॥ कुरुतेऽस्मिन्नंतरं चेदथ तस्य भयं भवेत् ॥ ३ ॥ वायुः सूर्यो वन्हिरिंद्रो मृत्युर्जन्मांतरेंतरम् ॥ कृत्वा धर्मं विजानन्तोऽप्यस्माद्भीत्या चरंति हि ॥ ४ ॥ 'आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कुतश्चन' ॥ एतमेव तपेन्नैषा चिंता कर्माग्निसंभृता ॥ ५ ॥ एवं विद्वान्कर्मणी द्वे हित्वाऽऽत्मानं स्मरेत्सदा ॥ कृते च कर्मणी स्वात्मरूपेणैवैष पश्यति ॥ ६ ॥

आत्मरूपेंकरून तो पहातो. ॥ ६ ॥ कल्पाचीं कल्पें जरी गेलीं तरी कर्माचा क्षय भोगावांचून होतच नाहीं, असें शास्त्र आहे. त्यावरून पूर्वजन्मींचीं जीं कांहीं अप्रसिद्ध कामें आहेत त्यांचा क्षय केवल आत्मानुसंधानानें कसा होईल ? तो न झाल्यास चिंता तरी कशी जाईल, अशी शंका कोणाची असेल तर त्यास आह्मी हें मुंडकश्रुतीचें प्रमाण देतों. तिचा अभिप्राय असा कीं, पर म्हणजे हिरण्यगर्भादि ब्रह्मदेव तेही कमी ज्यापासून असें ब्रह्म, त्या ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां हृदयाची ग्रंथी म्हणजे अन्योन्याध्यास नाहींसा होतो. आत्मा देहापासून निराळा आहे कीं नाहीं इत्यादि सर्व संशय पळून जातात. आणि सर्व पापपुण्यरूप जीं कर्में त्यांचें कारण अज्ञान नष्ट झाल्यामुळें क्षय पावतात. ॥ ७ ॥ जन्ममृत्यु तरण्यास ज्ञानावांचून दुसरा मार्गच नाहीं. अशाविषयीं श्वेताश्वतर शाखेमध्यें प्रमाण आहे. त्याचा अभिप्राय असा कीं, पूर्वोक्त आत्म्यास जाणणारा पुरुष मृत्यूस अतिक्रमून जातो. ज्ञानावांचून दुसरा मार्ग नाहीं. ब्रह्मज्ञान झालें असतां कामक्रोधादिक पाशाची हानी होते. हे पाश क्षीण झाले असतां हीं पुनर्जन्म होत नाहीं. ॥८॥ ज्ञानी शोकानें तरून जातो असें म्हटलें त्यास आणखी एक दुसरें प्रमाण आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं, ब्रह्मज्ञान झालें असतां धीर पुरुषाचे हर्षशोक जातात. मग त्याचे हातून पापें घडलीं आणि पुण्यें घडलीं नाहींत तरी त्याला ताप मुळींच होत नाहीं. ॥ ९ ॥ याप्रमाणें ब्रह्मज्ञान झालें असतां अनर्थाची हानी होऊन आनंद प्राप्त होतो म्हणण्याविषयीं पुष्कळ श्रुति स्मृति पुराणांचा डंका वाजत आहे. ॥ १० ॥ आनंद तीन प्रकारचा. ब्रह्मानंद, विद्यानंद आणि विषयानंद. ह्यांपैकीं ब्रह्मानंदाचें विवेचन प्रथमतः करितों. ॥ ११ ॥ ब्रह्म हें आनंदरूपच आहे अशाविषयीं तैत्तिरीय श्रुतीचें प्रमाण आहे. त्या, चा अर्थ असा कीं. भृगूनें आपला पिता जो वरुण त्यापासून ब्रह्मलक्षण समजून घेऊन अन्नप्राण मन आणि विज्ञान या चार कोशांचा त्याग करून आनंदमय कोश हाच ब्रह्म आहे असें जाणता झाला. ॥ १२ ॥ कारण त्याला ब्रह्माचीं पुढें सांगितलेलीं सर्व लक्षणें लागतात. ज्याच्यापासून सर्व भूतें होतात तें ब्रह्म. एथेंही सुरतानंदापासून सर्व प्राणी होतात. जेणेंकरून सर्व प्राणी वांचतात तें ब्रह्म. या आनंदानेंही सर्व प्राणी वांचतात. कारण विषयोपभोगावांचून वां-

---

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥ क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ७ ॥ तमेव विद्वानत्येति मृत्युं पंथा न चेतरः ॥ ज्ञात्वा देवं पाशहानिः क्षीणैः क्लेशैर्न जन्मभाक् ॥ ८ ॥ देवं मत्वा हर्षशोकौ जहात्यत्रैव धैर्यवान् ॥ नैनं कृताकृते पुण्यपापे तापयतः क्वचित् ॥९॥ इत्यादिश्रुतयो बह्व्यः पुराणैः स्मृतिभिः-सह ॥ ब्रह्मज्ञानेऽनर्थहानिमानंदं चाप्यघोषयन् ॥ १० ॥ आनंदस्त्रिविधोब्रह्मानंदो विद्यासुखं तथा ॥ विषयानंद इत्यादौ ब्रह्मानंदो विविच्यते ॥ ११ ॥ भृगुः पुत्रः पितुः श्रुत्वा वरुणाद्ब्रह्मलक्षणम् ॥ अन्नप्राणमनोबुद्धीस्त्यक्त्वाऽऽनंदं विजज्ञिवान् ॥१२॥ आनंदादेव भूतानि जायंते तेन जीवनम् ॥ तेषां लयश्च तत्रातो

चणें नाहीं. आणि त्यावांचून आनंद नाहीं. जेथें सर्वांचा लय होतो तें ब्रह्म. या आनंदांतही जीवांचा लय होतो. याचा अनुभव सुषुप्तींत सर्वांस आहे. ह्मणून आनंदच ब्रह्म आहे असें सिद्ध केलें. ॥ १३ ॥ ब्रह्माला आनंदरूपता आहे एतद्विषयीं छांदोग्य श्रुतीचेंही प्रमाण आहे. त्याचा भावार्थ असा कीं, आकाशादि पंचभूतांच्या उत्पत्तीपूर्वीं ज्ञातृज्ञानज्ञेय त्रिपुटीरूप द्वैत मुळींच नव्हतें. केवळ एक व्यापक आत्माच होता. कारण प्रलयकाळीं ती त्रिपुटी नाहीं असा वेदांत सिद्धांत आहे. ॥ १४ ॥ कारण परमात्म्यापासून उत्पन्न झालेला विज्ञानमय जो जीव तोच ज्ञाता, मन हेंच ज्ञान आणि बाकीचे सारे शब्दादिक विषय हे ज्ञेय होत. तेव्हां ही त्रिपुटी मिळून सर्व जग झालें. मग त्याचे उत्पत्तीचे पूर्वीं ती त्रिपुटी नव्हती हें कांहीं सांगावयास नको. ॥ १५ ॥ तिहींचा अभाव झाला असतां आत्मा आपण अद्वैत परिपूर्ण राहतो. याचा अनुभव ज्ञान्यास समाधींत, आणि इतर लोकांस सुषुप्ति व मूर्च्छा या अवस्थेंत आहे. ह्मणून सृष्टिपूर्वींही या त्रिपुटीचा अभाव असल्यामुळें तो आत्मा तसाच असला पाहिजे ॥१६॥ त्रिपुटीच्या अभावीं पूर्ण आत्मा राहतो असें सांगितलें, तेवढ्यावरून तो आनंदरूप कसा ठरतो अशी कोणीं शंका घेण्याचें कारण नाहीं. कारण नारदास फार शोक झाला असतां सनत्कुमारानें असें सांगितलें कीं, " बाबारे, जें भूमा ह्मणजे पूर्ण आहे, तेंच सुखरूप आहे या त्रिपुटीनें परिच्छिन्न झालेल्या अल्पामध्यें मुळींच सुख नाहीं. " ॥ १७ ॥ नारदास शोक होण्याचें कारण हेंच कीं, पुराणसहित पांच वेद व अनेक प्रकारचीं सर्व शास्त्रें जाणूनही आत्मज्ञान त्यास झालें नाहीं. ॥ १८ ॥ वेदाभ्यास होण्यापूर्वीं केवळ त्रिविधतापाचाच शोक होतो. नंतर अभ्यासाचे श्रमाचा शोक, विस्मरणाचा शोक, दुसऱ्यांनीं केलेल्या तिरस्काराचा शोक, बरें, कदाचित् चांगलें अध्ययन झालें तर गर्वाचा पुनः शोक आहेच. ॥१९॥ नारदास अति शोक झालेला त्यानें सनत्कुमारास केलेल्या पुढील प्रश्नावरून समजून येतो. नारद म्हणतो महाराज, मला फार शोक होत आहे. यापासून मला पार करा. सनत्कुमार म्हणाला, बाबारे,

---

ब्रह्मानंदो न संशयः ॥ १३ ॥ भूतोत्पत्तेः पुरा भूमा त्रिपुटी द्वैतवर्जनात् ॥ ज्ञातृज्ञानज्ञेयरूपा त्रिपुटी प्रलये हि नो ॥ १४ ॥ विज्ञानमय उत्पन्नो ज्ञाता ज्ञानं मनोमयः ॥ ज्ञेयाः शब्दादयो नैतत्त्रयमुत्पत्तितःपुरा ॥१५॥ त्रयाभावे तु निर्द्वैतः पूर्ण एवानुभूयते ॥ समाधिसुप्तिमूर्च्छासु पूर्णः सृष्टेः पुरा तथा ॥ १६ ॥ यो भूमा स सुखं नाल्पे सुखं त्रेधा विभेदिनि ॥ सनत्कुमारः प्राहैवं नारदायातिशोकिने ॥ १७ ॥ स पुराणान् पंच वेदान् शास्त्राणि विविधानि च ॥ ज्ञात्वाऽप्यनात्मवित्त्वेन नारदोऽतिशुशोच ह ॥ १८ ॥ वेदाभ्यासात्पुरा तापत्रयमात्रेण शोकिता ॥ पश्चात्त्वभ्यासविस्मारभंगगर्वैश्च शोकिता ॥ १९ ॥ सोऽहं विद्वन्प्रशोचामि शोकपारं नयात्र माम् ॥ इत्युक्तः सुखमेवास्य पारमित्यभ्यधादृषिः

यापासून पार होण्यास सुख ह्मणजे काय हें समजलें पाहिजे. ॥ २० ॥ तें खरें सुख विषयापासून होत नाहीं. विषयाशसून होणारें सुख विषयुक्त अन्नाप्रमाणें हजारों दुःखांनीं वेढलेलें असल्यामुळें तें दुःख समजलें पाहिजे. अशा अभिप्रायानेंच त्रिपुटीमध्यें सुख नाहीं, असें सनत्कुमारानें सांगितलें. ॥ २१ ॥ याजवर असा एक पूर्वपक्ष आहे कीं, द्वैतांत सुख नाहीं हें आह्मांस कबूल; पण तुमच्या अद्वैतांत तरी तें कुठें आहे? जर आहे म्हणतांच, तर त्याचा अनुभव असला पाहिजे. आणि अनुभव जर असेल तर अनुभव घेणारा, आणि अनुभव घेण्याची वस्तु हीं दोन्ही असलीं पाहिजेत. तीं दोन घेतलीं ह्मणजे पुनः त्रिपुटी येऊन अद्वैतहानि झालीच. ॥ २२ ॥ याचें उत्तर आम्ही असें देतों कीं, अद्वैत निराळेंच असून त्यांत निराळें सुख आहे असें आमचें ह्मणणें मुळींच नाहीं. कारण अद्वैत हेंच स्वतः सुख आहे. ही गोष्ट इतकी प्रत्यक्ष आहे कीं, तिला दुसऱ्या प्रमाणांची जरूर नाहीं. कारण तें स्वयंप्रकाश आहे. ॥२३॥ त्याच्या स्वयंप्रकाशत्वाविषयीं अद्वैतांत सुख नाहीं म्हणणाराचें वाक्यच प्रमाण आहे. कारण, तो जेव्हां वाक्य बोलला तेव्हां अद्वैतांत सुख आहे किंवा नाहीं एवढीच मात्र त्यास शंका आहे. पण अद्वैताच्या अस्तित्वाविषयीं त्याला शंकाच असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां प्रमाणावांचून त्याला अद्वैत भासलें असें ठरतें. ॥ २४ ॥ आतां याजवर जो प्रश्न येणार तो आम्हांस माहितच आहे. तो असा कीं, आम्ही तुमचे अद्वैताचा अनुभव कबूल करीत नाहीं. अद्वैतांत सुख नाहीं असें जें म्हटलें तें तुमचेंच वाक्य घेऊन म्हटलें! तर याजवर आम्ही असें विचारतों, द्वैताचे पूर्वी काय होतें तें त्यांनींच सांगावें. ॥ २५ ॥ अद्वैत होतें कीं द्वैत होतें किंवा दोन्हींवांचून तिसरा कांहीं प्रकार होता. तिसरा प्रकार तर मुळींच संभवत नाहीं. कारण, अनुभवास येणाऱ्या काय त्या दोन वस्तुः एक द्वैत किंवा अद्वैत: यांवांचून तिसरी गोष्ट मुळींच नाहीं. बरें, तेव्हां द्वैत होतें असें जर म्हणावें तर द्वैताच्या पूर्वी द्वैत कसें असेल? या रीतीनें दोन पक्षांचें खंडन झाल्यावर तिसरा पक्ष जो अद्वैत तो सहजच सिद्ध झाला. ॥ २६ ॥ ही अद्वैत-सिद्धि युक्तीनें सिद्ध क-

---

॥ २० ॥ सुखं वैषयिकं शोकसहस्रेणावृतत्वतः ॥ दुःखमेवेति मत्वाऽऽह नाल्पेऽस्ति सुखमित्यसौ ॥ २१ ॥ ननु द्वैते सुखं माभूदद्वैतेऽप्यस्ति नो सुखम् ॥ अस्ति चेदुपलभ्येत तथा च त्रिपुटी भवेत् ॥ २२ ॥ मास्त्वद्वैते सुखं किं तु सुखमद्वैतमेव हि ॥ किं मानमिति चेन्नास्ति मानाकांक्षा स्वयंप्रभे ॥ २३ ॥ स्वप्रभत्वे भवद्वाक्यं मानं यस्माद्भवानिदम् ॥ अद्वैतमभ्युपेत्यास्मिन्सुखं नास्तीति भाषते ॥ २४ ॥ नाभ्युपैम्यहमद्वैतं तद्वचोनूद्य दूषणम् ॥ वच्मीति चेत्तदा ब्रूहि किमासीद्द्वैततः पुरा ॥ २५ ॥ किमद्वैतमुत द्वैतमन्यो वा कोटिरंतिमः ॥ अप्रसिद्धो न द्वितीयोऽनुत्पत्तेः शिष्यतेऽग्रिमः ॥ २६ ॥ अद्वैतसिद्धिर्युक्त्यैव नानुभूत्याति चेद्वद ॥

रून आमचें तोंड बंद केलें. अनुभवास येत नाहीं असा आरोप पुनः आमचेवर येणारच; तर त्याजवर आम्ही असें विचारतों कीं, ती युक्ति दृष्टांतपूर्वक आहे कीं, अदृष्टांतपूर्वक आहे ? ह्यांपैकीं एक प्रकार असला पाहिजे. तिसरा प्रकार मुळींच संभवत नाहीं. ॥ २७ ॥ अनुभव तर नाहींच आणि दृष्टांतावांचून तर युक्ति सिद्ध होत नाहीं. म्हणून युक्तीला दृष्टांत पाहिजे असें झालें. तो दृष्टांत उभय वाद्यांस मान्य असला पाहिजे. असा दृष्टांत कोणचा तो सांगा. ॥ २८ ॥ यास दृष्टांत प्रलयाचाच चांगला आहे. कारण, तेथें द्वैत नाहीं. जेथें द्वैत नाहीं तें अद्वैत. जशी निद्रा. आतां आम्ही पुसतों कीं निद्रा तरी अद्वैत कशावरून ? त्यास पुनः एक उदाहरण पाहिजे. दुसऱ्याचे निद्रेचें ते उदाहरण देतील तर त्यांचें मोठें पांडित्यच समजलें पाहिजे. कारण ज्याला स्वतःची निद्रा समजत नाहीं, त्याला दुसऱ्याची कशी समजेल ? ॥ २९ ॥ ३० ॥ याजवरही त्याचें उत्तर आहेच; तें हें कीं, दुसरा निःचेष्ट झाला म्हणजे तो निजला असें समजावें. तें तरी कशावरून समजलें असें आम्ही विचारणारच. त्याचें उत्तर आपल्या अनुभवावरून दुसऱ्याची निद्रा. तेव्हां अर्थातच स्वप्रभत्व कबूल करणें भाग पडलें ॥ ३१ ॥ कारण सुषुप्तीचें ज्ञान करून देण्याला इंद्रियादि इतर साधनेंही नाहींत, व दृष्टांतही नाहीं. असें असून सुषुप्ति समजली म्हणतात, तेव्हां अर्थातच ती स्वयंप्रकाश असें ठरलें. साधनावांचून जें ज्ञान तेंच स्वयंप्रकाश. ॥ ३२ ॥ याप्रमाणें सुषुप्ति अद्वैत असून स्वयंप्रकाश आहे असें सिद्ध झालें; परंतु तेथें सुख आहे किंवा नाहीं ही अद्यापि शंका राहिलीच. या शंकेचा परिहार हा कीं, जेथें दुःख नाहीं तेथें सुख असलेंच पाहिजे. निद्रेंतील दुःखाभावाचा अनुभव सर्वांस आहे. तेव्हां अर्थातच बाकी सुख राहिलें. ॥ ३३ ॥ यास श्रुतीचें प्रमाण असें आहे कीं, निद्रेमध्यें देहाभिमान लीन झाल्यामुळें मनुष्यास आपण आंधळा, जखमी किंवा रोगी असल्या त्याचें भान त्याला कांहींच नसतें. असा प्रत्येक मनुष्याचा अनुभवही आहे. म-

---

निर्दृष्टांता सदृष्टांता वा कोट्यंतरमत्र नो ॥ २७ ॥ नानुभूतिर्न दृष्टांत इति युक्तिस्तु शोभते ॥ सदृष्टांतत्वपक्षे तु दृष्टांतं वद मे मतम् ॥ २८ ॥ अद्वैतः प्रलयो द्वैतानुपलंभेन सुप्तिवत् ॥ इति चेत्सुप्तिरद्वैतेत्यत्र दृष्टांतमीरय ॥ २९ ॥ दृष्टांतः परसुप्तिश्चेदहो ते कौशलं महत् ॥ यः स्वसुप्तिं न वेत्त्यस्य परसुप्तौ तु का कथा ॥ ३० ॥ निश्चेष्टत्वात्परः सुप्तो यथाऽहमिति चेत्तदा ॥ उदाहर्तुः सुषुप्तेस्ते स्वप्रभत्वं बलाद्भवेत् ॥ ३१ ॥ नेंद्रियाणि न दृष्टांतस्तथाऽप्यंगीकरोषि ताम् ॥ इदमेव स्वप्रभत्वं यज्ज्ञानं साधनैर्विना ॥ ३२ ॥ स्तामद्वैतस्वप्रभत्वे वद सुप्तौ सुखं कथम् ॥ शृणु दुःखं तदा नास्ति ततस्ते शिष्यते सुखम् ॥ ३३ ॥ अंधः सन्नप्यनंधः स्याद्विद्धोऽविद्धोऽथ रोग्यपि ॥ अरोगीति श्रुतिः प्राह त-

॥ ३४ ॥ याजवर कोणी म्हणेल कीं, दुःख नाहीं एवढ्याचमुळें सुखाचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं. कारण, लोष्टशिलादिकांचे ठायीं त्या दोहींचाही अभाव आहे ? पण हा दृष्टांतच बरोबर नाहीं.॥ ३५॥ कारण, दुसऱ्याचें सुखदुःखाचें जें अनुमान करावयाचें तें केवळ त्याचे मुद्रेवरून. मुद्रा प्रफुल्लित असली तर त्यास सुख झालें आहे, व ती म्लान असली तर दुःख झालें आहे असें समजावयाचें; पण तूं जो लोष्टाचा दृष्टांत दिलास तेथें दुःखादिकाचें अनुमान करण्यास मार्गच नाहीं. ॥ ३६ ॥ दुसऱ्याचें सुखदुःख जसें अनुमानानें समजावयाचें, तसें स्वकीय सुखदुःख समजण्यास अस्तित्व जसें अनुभवानें समजतें तसा त्यांचा अभावही अनुभवानेंच समजतो. दुसऱ्या प्रमाणाची जरूर नाहीं. ॥ ३७ ॥ याकरितां आपल्या निद्रेमधील दुःखाभाव ज्याअर्थी अनुभवानें समजतो त्याअर्थी विरोधि दुःखाच्या अभावामुळें राहिलेलें सुख अनुभवास आलेंच पाहिजे. ॥ ३८ ॥ निद्रेंत जर सुख नसेल तर मोठ्या प्रयासानें मऊ गाद्या गिर्द्या इत्यादिक साधनें करण्याच्या खटपटींत मनुष्य कशाला पडता ? ॥ ३९ ॥ तो जी खटपट करितो ती केवळ दुःखनिवारणार्थ; तेथें कांहीं नवीन सुखाची प्राप्ति नाहीं; अशी शंका कोणी घेऊं नये. कारण, ती गोष्ट कदाचित् रोग्याला लागू पडेल पण धडधाकड मनुष्य देखील जो इतका त्या साधनार्थ प्रयत्न करितो त्या अर्थी तो सुखार्थच असला पाहिजे यांत संशय नाहीं. ॥ ४० ॥ यावर दुसरी अशी एक शंका आहे कीं, ज्या सुखास शय्यादिकांचें साधन लागतें तें आत्मसुख कसें होईल ? कारण, आत्मसुख स्वतःसिद्ध आहे. याकरितां तें सुख वैषयिकच असलें पाहिजे. तर आम्ही तरी नाहीं कुठें म्हणतों. शय्यादि साधनांपासून होणारें सुख वैषयिकच आहे. ॥ ४१ ॥ परंतु निद्रेमध्यें जें सुख आहे त्याला कोणच्याच साधनाची जरूर नाहीं. आधीं बुद्धीचें तोंड सुखाकडे होऊन ती परमसु-

---

च्च सर्वे जना विदुः ॥ ३४ ॥ न दुःखाभावमात्रेण सुखं लोष्टशिलादिषु ॥ द्वयाभावस्य दृष्टत्वादिति चेद्विषमं वचः ॥ ३५ ॥ मुखदैन्यविकासाभ्यां परदुःखसुखोहनम् ॥ दैन्याद्यभावतो लोष्टे दुःखाद्यूहो न संभवेत् ॥ ३६ ॥ स्वकीये सुखदुःखे तु नोहनीये ततस्तयोः ॥ भावो वेद्यो ऽनुभूत्यैव तदभावोपि नान्यतः ॥ ३७ ॥ तथा सति स्वसुप्तौ च दुःखाभावोऽनुभूतितः ॥ विरोधिदुःखराहित्यात्सुखं निर्विघ्नमिष्यताम् ॥ ३८ ॥ महत्तरप्रयासेन मृदुशय्यादिसाधनम् ॥ कुतःसंपाद्यते सुप्तौ सुखं चेत्तत्र नो भवेत् ॥३९॥ दुःखनाशार्थमेवैतदिति चेद्रोगिणस्तथा ॥ भवत्वरोगिणस्त्वेतत्सुखायैवेति निश्चिनु ॥ ४० ॥ तर्हि साधनजन्यत्वात्सुखं वैषयिकं भवेत् ॥ भवत्वेवात्र निद्रायाः पूर्वं शय्यासनादिजम् ॥ ४१ ॥ निद्रायां तु सुखं यत्तज्जन्यते केन हेतुना ॥ सुखाभिमुखधीरा-

त्यांत निमग्न होते. ॥ ४२ ॥ मनुष्य दिवसभर श्रम करून दमून जेव्हां मृदु शय्येवर येऊन निजतो तेव्हां श्रमापासून झालेल्या दुःखाचें निवारण होऊन स्वस्थपणें शय्यादि विषयसुखाचा अनुभव घेतो. ॥ ४३ ॥ या विषयसुखाचा अनुभव घेण्यामध्यें देखील श्रमच आहेत. पण तो आधीं भासत नाहीं. मृदु शय्येवर निजल्यावर बुद्धि–वृत्ति अन्तर्मुख होऊन त्यामध्यें आत्मानंदाचें प्रतिबिंब पडतें. तोच विषयानंद एथेंही अनुभविता, अनुभाव्य आणि अनुभव अशी त्रिपुटी असल्यामुळें त्याला श्रमच होतो. ॥ ४४ ॥ तो श्रमही त्यास सहन न झाल्यामुळें त्याच्या निवारणार्थ जीव आत्मरूपाकडे धांव घेतो. मग त्याशीं ऐक्य पावून निद्रेमध्यें ब्रह्मानंदच होऊन राहतो. ॥ ४५ ॥ या निद्रानंदास श्रुतीनें पांच दृष्टांत दिले आहेत. एक शकुनीचा दुसरा; श्येनाचा; तिसरा बाळाचा; चवथा सार्वभौम राजाचा आणि पांचवा महाब्राह्मण जे तत्त्ववेत्ते त्यांचा. ॥ ४६ ॥ शकुनि म्हणून एक पक्षी आहे त्याचे पायास सूत्र बांधून त्याला उडावयास आकाशांत सोडलें असतां चोंहोकडे फिरून फिरून कोठेंही विश्रांति स्थान न मिळाल्यामुळें ज्या हातानें तें सूत्र धरलें असेल त्या हातावर किंवा ज्या खांबास तें बांधलें असेल त्या खांबावर पुनः येऊन विश्रांति घेतो. ॥ ४७ ॥ त्याप्रमाणें जीवोपाधिरूप मन पुण्यपापाचीं फलें जीं सुखदुःखें त्याचा अनुभव घेण्याकरितां जागृत्स्वप्नीं भ्रमण करून कर्मक्षय झाल्यावर आपलें उपादान जें अज्ञान त्यांत लीन होतें. ॥ ४८ ॥ ज्याप्रमाणें श्येनपक्षी पुष्कळ उडून उडून दमला असतां त्याचें सर्व लक्ष आपल्या घरट्याकडे लागून त्यांत निजावयास तो जाऊं पाहतो, त्याप्रमाणें जीवही सर्व दिवसभर श्रम करून ब्रह्मानंदाविषयीं उत्सुक होऊन निद्रेकडे धांव घेतो. ॥ ४९ ॥ अथवा ज्याप्रमाणें तान्हें मूल आईच्या आंगावर पिऊन मऊ हांतरुणावर हंसत पडलेलें असतें, तेव्हां रागद्वेषाची उत्पत्ति मनामध्यें अद्यापि झाली

---

दौ पश्चान्मज्जेत्परे सुखे ॥ ४२ ॥ जाग्रद्व्यावृत्तिभिः शांतो विश्रम्याथ विरोधिनि ॥ अपनीते स्वस्थचित्तोऽनुभवेद्विषये सुखम् ॥ ४३ ॥ आत्माभिमुखधीवृत्तौ स्वानंदः प्रतिबिंबति ॥ अनुभूयैनमत्रापि त्रिपुट्या श्रांतिमाप्नुयात् ॥४४॥ तच्छ्रमस्यापनुत्त्यर्थं जीवो धावेत्परात्मनि ॥ तेनैक्यं प्राप्य तत्रत्यो ब्रह्मानंदः स्वयं भवेत् ॥ ४५ ॥ दृष्टांताः शकुनिः श्येनः कुमारश्च महानृपः ॥ महाब्राह्मण इत्येते सुप्त्यानंदे श्रुतीरिताः ॥ ४६ ॥ शकुनिः सूत्रबद्धः सन् दिक्षु व्यापृत्य विश्रमम् ॥ अलब्ध्वा बंधनस्थानं हस्तस्तंभाद्युपाश्रयेत् ॥ ४७ ॥ जीवोपाधिमनस्तद्वद्धर्माधर्मफलाप्तये ॥ स्वप्ने जाग्रति च भ्रांत्वा क्षीणे कर्मणि लीयते ॥ ४८ ॥ श्येनो वेगेन नीडैकलंपटः शयितुं व्रजेत् ॥ जीवः सुप्त्यै तथा धावेद्ब्रह्मानंदैकलंपटः ॥ ४९ ॥ अतिबालः स्तनं पीत्वा मृदुशय्यागतो

नसल्यामुळें तो केवळ आनंदाची मूर्तीच होऊन राहतो. ॥ ५० ॥ अथवा ज्याप्रमाणें सार्व-भौम राजा आपणास सर्व विषयभोगाची प्राप्ति झाल्यामुळें तृप्त होऊन मानुषानंदाच्या शिखरीं जाऊन मूर्तिमान आनंदच होऊन राहतो. ॥ ५१ ॥ किंवा ज्याप्रमाणें महाविप्र ब्रह्म-वेत्ता विद्यानंदाची परम सीमा पावून कृतकृत्य होऊन स्वस्थ राहतो, त्याप्रमाणें सुषुप्तीचे ठायीं जीव आनंदरूप होऊन राहतो. ॥ ५२ ॥ सुषुप्तीच्या आनंदाविषयीं अति बाला-दिक तिन्हींचा मात्र येथें दृष्टांत देण्याचें कारण हेंच कीं, अज्ञान्यांमध्यें तान्हें मूल, प्रौढांमध्यें सार्वभौम राजा, आणि विद्वानांमध्यें ब्रह्मवेत्ता इतके सुखी आहेत. बाकीच्या लोकांस सुख नाहीं. ॥५३॥ वरील दृष्टांतांत कुमारादिक जसे मूर्तिमान आनंदच आहेत त्याप्रमाणें हा जीवही ब्र-ह्मानंदैकतत्पर होऊन, स्त्रीस आलिंगन दिलेल्या कामीं पुरुषाप्रमाणें आंत बाहेर कांहींच जाणत नाहीं. ॥ ५४ ॥ एथें बाहेर आंत जें म्हटलें, तें पुढील दृष्टांतावरून चांगलें समजेल. ज्याप्रमाणें घराबाहेर रस्त्यावर होणारा लोकांचा गलबला व गाड्यांचा घडघडाट यास बाहेरचा वृत्तांत म्हणतात, आणि आंतील गृहकृत्यांस आंतला म्हणतात. त्याप्रमाणें एथेंही जागृत अवस्था बाहेरील आणि नाडीमध्यें होणारी अवस्था आंतील. ॥ ५५ ॥ सुषुप्तींत बापा-चा बापपणा व लेंकाचा लेंकपणा राहत नाहीं अशा अर्थाची जी श्रुति आहे, तिजवरून त्या-वेळीं जीवत्वाचें निवारण होतें व तेव्हां संसारीपणाही नजरेस येत नाहीं. म्हणून निद्रेमध्यें जीव हा ब्रह्मरूपच असतो असें म्हणण्यास कोणची हरकत आहे ? ॥ ५६ ॥ कारण मी पिता मी पुत्र असा जो अभिमान तोच सर्व सुखदुःखाची खाण आहे. त्यांतच सर्व प्रपंच आहे. म्हणून तो नाहींसा झाला असतां हा जीव सर्व शोकापासून मुक्त होतो. ॥ ५७ ॥ सुषुप्ति-कालीं सुख असतें याविषयीं अथर्वश्रुतीचें प्रमाण आहे. सुषुप्तीच्या वेळीं सर्व जागृदादि प्रपं-

---

हसन् ॥ रागद्वेषाद्यनुत्पत्तेरानंदैकस्वभावभाक् ॥ ५० ॥ महाराजः सार्वभौमः संतृप्तः सर्वभोगतः ॥ मानुषानंदसीमानं प्राप्यानंदैकमूर्तिभाक् ॥ ५१ ॥ महाविप्रो ब्रह्मवेदी कृतकृत्यत्वलक्षणाम् ॥ विद्यानंदस्य परमां काष्ठां प्राप्यावतिष्ठते ॥ ५२ ॥ मुग्धबुद्धातिबुद्धानां लोके सिद्धा सुखात्मता ॥ उदाहृतानामन्ये तु दुःखिनो न सुखात्मकाः ॥ ५३ ॥ कुमारादिवदेवायं ब्रह्मानंदैकतत्परः ॥ स्त्रीपरिष्वक्तवद्वेद न बाह्यं नापि चांतरम् ॥ ५४ ॥ बाह्यं रथ्यादिकं वृत्तं गृहकृत्यं यथांतरम् ॥ तथा जागरणं बाह्यं नाडीस्थः स्वप्न आंतरः ॥ ५५ ॥ पितापि सुप्तावपितेत्यादौ जीवत्ववारणात् ॥ सुप्तौ ब्रह्मैव नो जीवः संसारित्वासमीक्षणात् ॥ ५६ ॥ पितृत्वाद्यभिमानो यः सुखदुःखाकरः स हि ॥ तस्मिन्नपगते तीर्णः सर्वान् शोकान् भवत्ययम् ॥ ५७ ॥ सुषुप्तिकाले

चाचा तमःप्रधान प्रकृतींत लय झाला असतां त्या तमानें आच्छादित होऊन जीव सुखरूप ब्रह्मच होऊन राहतो. ॥ ५८ ॥ आमचा नेहमींचा अनुभवही तसाच आहे. निद्रेंतून जागा झाल्यावर मी इतक्या वेळ सुखानें निजलों होतों, व इतका वेळ मला कांहींच समजलें नाहीं; असें निद्रेंतील सुखाचें व अज्ञानाचें स्मरण आम्हांस होतें. ॥ ५९ ॥ अनुभवावांचून स्मरण कधींच होत नाहीं. ज्याअर्थी जागें झाल्यावर सुखाचें व अज्ञानाचें स्मरण होतें त्याअर्थी निद्राकालीं अनुभव आलाच पाहिजे. आतां अनुभवास इंद्रियादिक साधनें पाहिजेत आणि तीं तर सुषुप्तीमध्यें नाहींत, मग अनुभव कसा आला ? अशी एक येथें शंका येण्याजोगी आहे. तर त्याचें समाधान इतकेंच कीं, सुख हें स्वप्रकाश चिद्रूप असल्यामुळें तें भासण्यास साधनाची जरूर नाहीं. आणि त्याचे जोरानेंच अज्ञानही समजतें. ॥ ६० ॥ हें स्वप्रकाश सुखच ब्रह्म आहे अशाविषयीं " ब्रह्म विज्ञानमानंदम् " म्हणजे ज्ञानरूप आनंदच ब्रह्म आहे असें वाजसनीय शाखेंत म्हटलें आहे. ॥ ६१ ॥ हा जो सुखज्ञानाचा अनुभव आम्हीं सांगितला तो विज्ञानमय शब्दवाच्य जीवाला आहे अशी कोणीं शंका घेऊं नये. कारण त्या अज्ञानांतच विज्ञानमय आणि मनोमय हे दोघेहि लीन होतात. त्यांची जी विलयावस्था तीच निद्रा आणि तेंच अज्ञान ॥६२॥ ज्याप्रमाणें उष्णतेच्या संयोगानें पातळ झालेलें तूप पुनः घट्ट होतें त्याप्रमाणें. जागृत्स्वप्नावस्थेंतील भोगप्रद कर्मांचा क्षय झाला असतां लीन झालेलें अंतःकरण पुनः कर्मवशात् जागृत होऊन विज्ञानमय होतें. या विलीनावस्थेलाच आनंदमय असें नांव दिलें आहे. ॥ ६३ ॥ म्हणजे निद्रेच्या पूर्वक्षणीं जी वृत्ति बाहेरचें जग सोडून स्वरूपाकडे वळण्यानें स्वरूपसुखांत निमग्न होऊन लीन होते. या अवस्थेला आनंदमय कोश म्हणतात. ॥ ६४ ॥ असा हा अंतर्मुखवृत्तीचा परिणामरूप आनंदमय कोश त्यावेळीं ब्रह्मसुखाचा उपभोग घेतो. त्या काळीं त्या सुखानें बिंबित अशा अज्ञानवृत्ती असतात, त्यामुळें भोग घडतो. ॥६५॥ त्या

---

सकले विलीने तमसाऽऽवृतः ॥ सुखरूपमुपैतीति ब्रूते ह्याथर्वणी श्रुतिः ॥ ५८ ॥ सुखमस्वाप्समत्राहं न वै किंचिदवेदिषम् ॥ इति सुप्ते सुखाज्ञाने परामृशति चोत्थितः ॥ ५९ ॥ परामर्शोऽनुभूतेस्तीत्यासीदनुभवस्तदा ॥ चिदात्मत्वात्स्वतो भाति सुखमज्ञानधीस्ततः ॥ ६० ॥ ब्रह्म विज्ञानमानंदमिति वाजसनेयिनः ॥ पठंत्यतः स्वप्रकाशं सुखं ब्रह्मैव नेतरत् ॥ ६१ ॥ यदज्ञानं तत्र लीनौ तौ विज्ञानमनोमयौ ॥ तयोर्हि विलयावस्था निद्राऽज्ञानं च सैव हि ॥ ६२ ॥ विलीनघृतवत्पश्चात्स्याद्विज्ञानमयो घनः ॥ विलीनावस्थ आनंदमयशब्देन कथ्यते ॥ ६३ ॥ सुप्तिपूर्वक्षणे बुद्धिवृत्तिर्या सुखबिंबिता ॥ सैव तद्बिंबसहिता लीनानंदमयस्ततः ॥ ६४ ॥ अंतर्मुखो य आनंदमयो ब्रह्मसुखं तदा ॥ भुंक्ते चिद्बिंबयुक्ताभिरज्ञानोत्पन्नवृत्तिभिः ॥ ६५ ॥ अज्ञानवृत्तयः सूक्ष्मा

अज्ञानवृत्ति सूक्ष्म ह्मणजे अस्पष्ट आहेत आणि बुद्धिवृत्ति त्यापेक्षां स्पष्ट आहेत असें वेदांतसिद्धांतपारग पुरुष ह्मणतात. ॥६६॥ ही गोष्ट मांडूक्य तापनीयादि श्रुतीमध्यें स्पष्ट करून सांगितली आहे. तेथें असें ह्मटलें आहे कीं, आनंदमय हा भोक्ता आहे. आणि ब्रह्मानंद हें त्याचें भोग्य आहे. ॥६७॥ मांडूक्य श्रुतीतील " प्रज्ञानघनैव आनंदमयः " इत्यादि वाक्यांचा अर्थ असा कीं, विज्ञानमय वाच्य जीव सुषुप्तीमध्यें स्वरूपाशीं ऐक्य पावून आनंदमय होऊन चैतन्य प्रतिबिंबित वृत्तीच्या योगानें तेथील ब्रह्मानंदाचा भोग घेतो. ॥६८॥ ऐक्य पावतो म्हणून जें वर म्हटलें त्याचा अर्थ असा कीं, पूर्वीं जो विज्ञानमय आदिकरून रूपांनीं युक्त होतो, तोच आतां पुष्कळ तांदुळांच्या पिठाप्रमाणें त्या सर्व रूपाच्या लयाशीं ऐक्य पावतो. ॥६९॥ ज्याप्रमाणें थंड देशांत पाणी घट्ट होतें तसें घटादिक ज्या बुद्धिवृत्ति ज्यांस प्रज्ञान असें ह्मणतात त्या सुषुप्तींत घट्ट होतात. तेव्हां तो चिद्रूपाशीं ऐक्य पावतो. ॥ ७० ॥ ज्याला वेदांतशास्त्रांत प्रज्ञानघन साक्षी असें म्हटलें त्यालाच बाकीचे साधारण लोक व तार्किकादिक पंडित दुःखाभाव असें ह्मणतात. कारण निद्रेंत सर्व दुःखवृत्तींचा लोप होतो. ॥ ७१ ॥ या आनंदभोगांना अज्ञानप्रतिबिंबित चैतन्य साधन आहे, अशी एकदां ज्याची रुचि घेतली आहे असें जें ब्रह्मसुख तें सोडून देऊन जीव बाहेर येतो त्याला कारण त्याचें कर्मच. ॥ ७२ ॥ पूर्व जन्मीं केलेल्या कर्मामुळेंच पुनः जागा होतो, असें जागृतीस कर्मच कारण आहे; असें कैवल्यशाखेंत म्हटलें आहे. ॥ ७३ ॥ मनुष्य जागा झाल्यानंतर कांहीं वेळपर्यंत निद्रेंत भोगिलेल्या ब्रह्मानंदाचा ठसा असतो. ही एक आनंद भोगल्याची खूणच आहे. कारण, त्यावेळीं

---

विस्पष्टा बुद्धिवृत्तयः ॥ इति वेदांतसिद्धांतपारगाः प्रवदंति हि ॥ ६६ ॥ मांडूक्यतापनीयादिश्रुतिष्वेतदतिस्फुटम् ॥ आनंदमयभोक्तृत्वं ब्रह्मानंदे च भोग्यता ॥ ६७ ॥ एकीभूतः सुषुप्तस्थः प्रज्ञानघनतां गतः ॥ आनंदमय आनंदभुक् चेतोमयवृत्तिभिः ॥ ६८ ॥ विज्ञानमयमुख्यैर्यो रूपैर्युक्तः पुराऽधुना ॥ स लयेनैकतां प्राप्तो बहुतंदुलपिष्टवत् ॥ ६९ ॥ प्रज्ञानानि पुरा बुद्धिवृत्तयोऽथ घनो ऽभवत् ॥ घनत्वं हिमबिंदूनामुदग्देशे यथा तथा ॥ ७० ॥ तद्धनत्वं साक्षिभावं दुःखाभावं प्रचक्षते ॥ लौकिकास्तार्किका यावद्दुःखवृत्तिविलोपनात् ॥ ७१ ॥ अज्ञानबिंबिता चित्स्यान्मुखमानंदभोजने ॥ भुक्तं ब्रह्मसुखं त्यक्त्वा बहिर्यात्यथ कर्मणा ॥ ७२ ॥ कर्म जन्मांतरेऽभूद्यत्तद्योगाद्बुध्यते पुनः ॥ इति कैवल्यशाखायां कर्मजो बोध ईरितः ॥७३ ॥ कंचित्कालं प्रबुद्धस्य ब्रह्मानंदस्य वासना ॥ अनुगच्छेद्यतस्तूणीमास्ते निर्विषयः

हांतरुणावर पडलेला असतां मनामध्यें कोणचाही विषय नसतां सुखी असतो. ॥ ७४ ॥ तो तसाच सुखानें स्वस्थ पडून राहतो. परंतु कर्मांहींकरून प्रेरित होत्साता नानाप्रकारचीं दुःखें मनांत येऊन हळूहळू त्यास ब्रह्मानंदाची विस्मृति पडते. ॥ ७५ ॥ निद्रेच्या पूर्वीं व तिच्या अंतीं कांहीं वेळ ब्रह्मानंदाविषयींची प्रीति असलेली मनुष्यास दृष्टीस पडते. कारण पूर्वीं तो आनंद भोगण्याकरितां मृदु शय्यादि साधनांचा प्रयत्न, व अंतीं हांतरूण सोडून उठण्याचा कंटाळा, ह्या दोन गोष्टींवरून हें सिद्ध होतें. तेव्हां या निद्रेंत ब्रह्मानंद आहे याविषयीं सुज्ञांस संशय कधीं येईल काय ? ॥ ७६ ॥ याजवर असा एक पूर्वपक्ष आहे कीं, सुषुप्तीच्या आदि अंतीच्या तूष्णीं स्थितींत ब्रह्मानंद भासतो असें जर मानलें तर कांहीं खटपट न करितां मनुष्यास मोक्षप्राप्ति होईल; मग गुरु आणि शास्त्र यांची गरज काय ? ॥ ७७ ॥ खरें आहे. परंतु ब्रह्माचें ज्ञान जर होईल तर तेवढ्यानेंच ते कृतार्थ होतील. पण गुरुशास्त्रांचे साहाय्यावांचून तें ज्ञानच होत नाहीं ॥ ७८ ॥ तुमच्या सांगण्यावरूनच तेंच ब्रह्म असें आह्मांस समजलें असून आह्मांस कृतार्थता कां वाटत नाहीं ? असा प्रश्न आमच्या वरील उत्तरावर कोणी करीत असेल तर त्या प्रश्न करणाऱ्या मनुष्यासारख्या कोणी एका तत्त्वज्ञ म्हणून घेणाराची एक गोष्ट आह्मी सांगतों ॥७९॥ कोणी एका राजानें वर्तमानपत्रांत अशी जाहिरात दिली कीं, जो कोणी चार वेद जाणत असेल त्यास हजार रुपयांचें बक्षीस दिलें जाईल. ही जाहिरात वाचून कोणी एक भट्ट ब्राह्मण राजाकडे येऊन म्हणाला. वेद चार आहेत हें मी पक्कें जाणतों. तर जाहीर केलेलें बक्षीस मला देण्याची आज्ञा व्हावी. ॥ ८० ॥ तें ऐकून राजास हंसूं आलें आणि म्हणाला, काय वेडा ब्राह्मण आहे हा ! अरे केवळ संख्येच्या ज्ञानानें हजार रुपयांचें बक्षीस पटकावून घ्यावें ह्मणतोस काय ? असो. ज्याप्रमाणें त्या ब्राह्मणाला अशेष वेदांचा तत्त्वार्थ न समजतां केवळ संख्या मात्र समजली, तसेंच आमच्या शंकाकारासही ब्रह्माचें अशेष स्वरूपज्ञान न होतां केवळ ब्रह्म हा शब्द मात्र समजला; तेव्हां तेवढ्यानें कृतार्थता कशी

---

सुखी ॥ ७४ ॥ कर्मभिः प्रेरितः पश्चान्नानादुःखानि भावयन् ॥ शनैर्विस्मरति ब्रह्मानंदमेषोऽखिलो जनः ॥ ७५ ॥ प्रागूर्ध्वमपि निद्रायाः पक्षपातो दिने दिने ॥ ब्रह्मानंदे नृणां तेन प्राज्ञोऽस्मिन्विवदेत कः ॥ ७६ ॥ ननु तूष्णीं स्थितौ ब्रह्मानंदश्चेद्भाति लौकिकाः ॥ अलसाश्चरितार्थाः स्युः शास्त्रेण गुरुणात्र किम् ॥ ७७ ॥ बाढं ब्रह्मेति विद्युश्चेत्कृतार्थास्तावतैव ते ॥ गुरुशास्त्रे विनाऽत्यंतं गंभीरं ब्रह्म वेत्ति कः ॥ ७८॥ जानाम्यहं त्वदुक्त्याद्य कुतो मे न कृतार्थता ॥ शृण्वत्र त्वादृशो वृत्तं प्राज्ञंमन्यस्य कस्यचित् ॥ ७९ ॥ चतुर्वेदविदे देयमितिशृण्वन्नवोचत ॥ वेदाश्चत्वार इत्येवं वेद्मि मे दीयतां धनम् ॥ ८० ॥ संख्यामेवैष जानाति न तु वेदानशेषतः ॥ यदि तर्हि त्वमप्येवं नाशेषं ब्रह्म

होईल ? ॥८१॥ यावरही एक अशी शंका आहे कीं, ब्रह्म अखंडैकरस आनंदरूप आहे. येथें माया व तिचें कार्य याचा संपर्कच नाहीं. असें असून अशेष सशेष असें ह्मणण्याला तेथें जागाच नाहीं. ॥ ८२ ॥ तर या पूर्वपक्षकारास आह्मी असें विचारतों कीं, ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे इतके शब्द तोंडपाठ झाल्यानेंच पुरें आहे, कीं त्यांचा अर्थ समजला पाहिजे ? नुस्ते शब्द पाठ करून कांहीं उपयोग नाहीं. तेव्हां त्यांचा अर्थ चांगला समजला पाहिजे ॥ ८३ ॥ बरें व्याकरणादिकाचे साहाय्यानें अर्थही समजला तरी तेवढ्यानें कुठें भागतें. त्याचा साक्षात्कार म्हणून जो आहे तो राहिलाच. तो झाल्यावांचून ज्ञान संपूर्ण होत नाहीं. तसें संपूर्ण ज्ञान होऊन कृतार्थता होईपर्यंत सद्गुरूची सेवा केली पाहिजे. ह्मणूनच आह्मीं अशेष हा शब्द घातला. ॥ ८४ ॥ असो. आतां आपल्या विषयाकडे वळूं. वासनानंदाची खूण हीच कीं, नेहमींच्या व्यवहारामध्यें जेव्हां जेव्हां विषयांवांचून मनुष्यास सुख वाटतें, तेव्हां तेव्हां तो ब्रह्मानंदाचा संस्काररूप वासनानंदच समजावा. ॥ ८५ ॥ विषयानंदांतही असाच कांहीं प्रकार घडतो. कारण जेव्हां जेव्हां आह्मास विषयापासून आनंद होतो तेव्हां तेव्हां विषय मिळून त्याची इच्छा शान्त झाल्यावर मनोवृत्ति अंतर्मुख होऊन त्यांत ब्रह्मानंदाचें प्रतिबिंब पडतें. ॥ ८६ ॥ येणेंप्रमाणें ब्रह्मानंद, वासनानंद, आणि विषयानंद असे तीनच आनंद या जगांत आहेत. बाकी जे आनंद शास्त्रांत किंवा लौकिकांत आहेत त्या सर्वांचा समावेश या तिहींत होतो. ॥ ८७ ॥ या तिहींपैकीं वासनानंद आणि विषयानंद या दोहोंची उत्पत्ति ब्रह्मानंदापासूनच आहे. आणि तो ब्रह्मानंद मात्र केवळ स्वयंप्रकाश आहे. ॥ ८८ ॥ येथपर्यंत श्रुति, युक्ति आणि अनुभव या तिहींच्या योगेंकरून सुषुप्तिकाळीं ब्रह्मानंद स्वप्रकाश आहे असें सिद्ध केलें. आतां दुसऱ्या वेळीं म्हणजे जागृतीमध्येंही त्याची सिद्धता

---

वेत्सि हि ॥ ८१ ॥ अखंडैकरसानंदे मायातत्कार्यवर्जिते ॥ अशेषत्वसशेषत्ववार्तावसर एव कः ॥ ८२ ॥ शब्दानेव पठस्याहो, तेषामर्थं च पश्यसि ॥ शब्दपाठेऽर्थबोधस्ते संपाद्यत्वेन शिष्यते ॥ ८३ ॥ अर्थे व्याकरणाद्बुद्धे साक्षात्कारोवशिष्यते ॥ स्यात्कृतार्थत्वधीर्यावत्तावद्गुरुमुपास्व भोः ॥ ८४ ॥ आस्तामेतद्यत्र यत्र सुखं स्याद्विषयैर्विना ॥ तत्र सर्वत्र विद्ध्येतां ब्रह्मानंदस्य वासनाम् ॥ ८५ ॥ विषयेष्वपि लब्धेषु तदिच्छोपरमे सति ॥ अंतर्मुखमनोवृत्तावानंदः प्रतिबिंबति ॥ ८६ ॥ ब्रह्मानंदो वासना च प्रतिबिंब इति त्रयम् ॥ अंतरेण जगत्यस्मिन्नानंदो नास्ति कश्चन ॥ ८७ ॥ तथा च विषयानंदो वासनानंद इत्यमू ॥ आनंदौ जनयन्नास्ते ब्रह्मानंदः स्वयंप्रभः ॥ ८८ ॥ श्रुतियुक्त्यनुभूतिभ्यः स्वप्रकाशचिदात्मके ॥ ब्रह्मानंदे सुप्तिकाले सिद्धे सत्यन्यदा शृणु

करूं. ॥८९॥ सुषुप्तींत जो आनंदमय असतो तोच विज्ञानमय होऊन त्या त्या स्थानभेदाप्रमाणें स्वप्न व जागृति या दोन अवस्थांप्रत पावतो. ॥ ९० ॥ तीं स्थानें हीं; जागृतीचें स्थान नेत्र, स्वप्नाचें स्थान कंठ, आणि सुषुप्तीचें स्थान हृदयकमळ. येथें जागृतीचें स्थान नेत्र असें जें म्हटलें तें केवळ सर्व देहाचें उपलक्षण समजावें. वास्तविक पाहतां चिदाभास हा आपादमस्तक देहाला व्यापून राहतो ॥ ९१ ॥ ज्याप्रमाणें तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यांत अग्नि व्यापून राहतो तसा हा जीवही देहतादात्म्य पावून मी मनुष्य असा निश्चय करून जागृतींत असतो. ॥ ९२ ॥ ह्या देहाच्या अभिमानास कारणीभूत अशा जीवाच्या तीन अवस्था आहेत. सुखी, दुःखी, आणि उदासीन. आह्मी जें कर्म करितों त्याचीं फलें दोन प्रकारचीं; एक सुख वाटणें, दुसरें दुःख वाटणें. आणि स्वाभाविक जी जीवाची स्थिति तें औदासीन्य. ॥ ९३ ॥ या सुखदुःखांचे दोन प्रकार आहेत. बाह्य विषयभोगापासून होणारीं सुखदुःखें. मनोराज्यापासून होणारीं सुखदुःखें आणि सुखही नाहीं आणि दुःखही नाहीं म्हणजे दोहोंमधील जी फट त्या फटीस तूष्णींस्थिति असें ह्मणतात. ॥ ९४ ॥ आज मला कशाची काळजी नाहीं, मी सुखी आहें, असें म्हणून प्रत्येक मनुष्य निजानंदाचें भान उदासीन स्थितीमध्यें प्रकट करितो. ॥ ९५ ॥ परंतु हा निजानंद मुख्य ह्मणतां येत नाहीं, हा केवळ त्याची वासना ह्मणजे संस्कार आहे. कारण तेथें भी अशा सामान्य अहंकाराचें आच्छादन आहे. ॥ ९६ ॥ ज्याप्रमाणें गार पाण्यानें भरलेल्या भांड्याचा बाहेरील भाग थंड लागतो, पण तें कांहीं प्रत्यक्ष पाणी नसतें, तर केवळ तो पाण्याचा एक गुण आहे. आणि त्या गुणावरून पाण्याच्या अस्तित्वाचें अनुमान करितां येतें. ॥ ९७ ॥ त्याप्रमाणें शास्त्रांत सांगितलेल्या योगाभ्यासानें अ-

---

॥ ८९ ॥ य आनंदमयः सुप्तौ सविज्ञानमयात्मताम् ॥ गत्वा स्वप्नं प्रबोधं वा प्राप्नोति स्थानभेदतः ॥ ९० ॥ नेत्रे जागरणं कंठे स्वप्नः सुप्तिर्हृदंबुजे ॥ आपादमस्तकं देहं व्याप्य जागर्ति चेतनः ॥ ९१ ॥ देहतादात्म्यमापन्नस्तप्तायःपिंडवत्ततः ॥ अहं मनुष्य इत्येवं निश्चित्यैवावतिष्ठते ॥ ९२ ॥ उदासीनः सुखी दुःखीत्यवस्थात्रयमेत्यसौ ॥ सुखदुःखे कर्मकार्ये त्वौदासीन्यं स्वभावतः ॥ ॥ ९३ ॥ बाह्यभोगान्मनोराज्यात्सुखदुःखे द्विधा मते ॥ सुखदुःखांतरालेषु भवेत्तूष्णीमवस्थितिः ॥ ९४ ॥ न कापि चिंता मेऽस्त्यद्य सुखमास इति ब्रुवन् ॥ औदासीन्ये निजानंदभानं वक्त्यखिलो जनः ॥ ९५ ॥ अहमस्मीत्यहंकारसामान्याच्छादितत्त्वतः॥ निजानंदो न मुख्योऽयं किं त्वसौ तस्य वासना ॥ ९६ ॥ नीरपूरितभांडस्य बाह्ये शैत्यं न तज्जलम् ॥ किं तु नीरगुणस्तेन नीरसत्तानुमीयते ॥ ९७ ॥ यावद्यावदहंकारो विस्मृतोभ्यासयोगतः॥

हंकाराचें जसजसें विस्मरण होत जाईल तसतसें सूक्ष्म दृष्टीस निजानंदाचें अनुमान करितां येईल ॥ ९८ ॥ असें विस्मरण होतां होतां अगदींच अहंकार सूक्ष्म होतो. तेव्हां साक्षात्ब्रह्मानंदाचाच अनुभव होतो. ही स्थिति निद्रा आहे अशी कोणी शंका घेऊं नये. कारण निद्रेंत अहंकार अगदीं लीन ह्मणजे नाहींसाच होतो. तसा येथें होत नाहीं. कारण तसें होईल तर निद्रेप्रमाणें देह लागलाच पडेल. ॥ ९९ ॥ जेव्हां द्वैतही भासत नाहीं आणि निद्राही नाहीं अशा वेळीं जें सुख भासतें तेंच ब्रह्मानंद असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें आहे. ॥ १०० ॥ तें असें कीं, हे अर्जुना, हळू हळू धैर्ययुक्त बुद्धीनें मनाचा उपरम करून आत्म्यावर त्याची स्थापना करावी. आणि मग कांहीं एक चिंतन न करितां स्वस्थ बसावें हाच योगाचा परमावधि. ॥ १०१ ॥ त्याचा क्रम असा कीं, ज्या ज्या विषयापासून मन उठून दुसऱ्या विषयाकडे धांवतें, तेंच त्याला तेथून ओढून आणून बसवावें. कारण तें फार चंचळ आणि अस्थिर आहे. ॥ १०२ ॥ याप्रमाणें मन शांत झालें असतां मनामधील रजतमादि कल्मष नाहींसें होऊन हें सर्व ब्रह्मच आहे असें त्या योग्यास ज्ञान होऊन उत्तम सुखाची प्राप्ति होते. ॥ १०३ ॥ त्या वेळेस योगाभ्यासानें चित्ताचा निरोध झाल्यानें त्याला ज्ञान होऊन आत्म्याकडे त्याची दृष्टि परतते. आणि आपल्यामध्येंच आपण तो सुख पावतो. ॥ १०४ ॥ तें सुख अतींद्रिय असून केवळ बुद्धीस मात्र ग्राह्य असतें. याप्रमाणें एकदां आत्म्यावर योग्याचे मनाची स्थापना झाली असतां तो स्वरूपापासून ढळत नाहीं. ॥ १०५ ॥ अशी आत्मप्राप्ति झाल्यावर त्यापेक्षां त्याला दुसरा कोणताही लाभ अधिक वाटत नाहीं. आणि एकदां त्याची आत्मस्वरूपाशीं चिकाटी बसली ह्मणजे शस्त्रघातासारख्या भयंकर दुःखाच्यानेंही त्याला तेथून हालवितां येत नाहीं. ॥ १०६ ॥ या योगांत दुःखाचा संयोग मुळींच नाहीं. वैराग्ययुक्त चि-

---

तावत्तावत्सूक्ष्मदृष्टेर्निजानंदोऽनुमीयते ॥ ९८ ॥ सर्वात्मना विस्मृतः सन्सूक्ष्मतां परमां व्रजेत् ॥ अलीनत्वान्न निद्रैषा ततो देहोऽपि नोपतेत् ॥९९॥ न द्वैतं भासते नापि निद्रा तत्रास्ति यत्सुखम् ॥ स ब्रह्मानंद इत्याह भगवानर्जुनं प्रति ॥१००॥ शनैः शनैरुपरमेद्बुध्द्या धृतिगृहीतया ॥ आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ १ ॥ यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ॥ ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥२ ॥ प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ॥ उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ ३ ॥ यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ॥ यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ ४ ॥ सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ॥ वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ ५ ॥ यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ॥ यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ ६ ॥ तं विद्या-

त्यानें मुमुक्षूनें याचें अनुष्ठान करावें ॥ १०७ ॥ याप्रमाणें सदां सर्वदां आत्म्याचें अनुसंधान करणारा पापरहित योगी आत्यंतिक जें ब्रह्मसुख तें अनायासानें पावतो. ॥ १०८ ॥ मनोनिग्रह कठिण आहे ह्मणोन बसून उपयोग नाहीं. टिट्टिभपक्ष्यानें समुद्रानें नेलेलीं आंडीं परत मिळावीं ह्मणोन आपणामध्यें आणि समुद्रामध्यें अंतर मुळींच न पाहतां कुशाग्रेंकरून त्याचा एकेक बिंदु उसपण्याचा प्रयत्न धैर्य न सोडतां चालविला असतां तो जसा शेवटीं सिद्धीस गेला, त्याप्रमाणें मनाचा निग्रहही खचित सिद्धीस जाईलच जाईल. ॥ १०९ ॥ मैत्रायणी नामक यजुःशाखेमध्यें शाकायन्य नामक मुनीनें आपला शिष्य जो बृहद्रथ राजा यास समाधीनें सुख प्राप्ति होते अशाविषयीं पुष्कळ उपदेश केला आहे. ॥ ११० ॥ तेथें त्यांनीं असें सांगितलें आहे कीं, सर्व काष्ठादिक इंधन जळून गेल्यावर ज्वाला शांत होऊन अग्नि जसा नुस्ता तेजमात्र राहतो, त्याप्रमाणें घटपटादिक वृत्तींचा क्षय झाला असतां चित्ताचें रजतमत्व जाऊन तें केवळ सात्विक होऊन राहतें. यालाच मनोनाश ह्मणतात ॥ १११ ॥ याप्रमाणें आपल्या कारणाच्याठायीं मनाची शान्ति होऊन केवळ आत्म्याकडेच त्याचा ध्यास लागून विषयापासून तें परतलें असतां अर्थातच कर्मापासून होणारीं सर्व दुःखें मिथ्या ठरतात ॥ ११२ ॥ कारण आमचा सर्व प्रपंच मनाचाच केलेला आहे. ह्मणून त्या मनाचें शोधन प्रयत्नानें केलें पाहिजे. ज्या विषयाकडे मनुष्याचें मन लागलें तन्मय तो होतो. हें गूढ कांहीं आजकालचें नव्हे. तर अनादिकालापासून चालत आलें आहे. ॥ ११३ ॥ चित्ताची शुद्धि होऊन ब्रह्मानुसंधान त्यास लागलें ह्मणजे सर्व शुभाशुभकर्मांचा नाश होऊन मनुष्याचें चित्त प्रसन्न होऊन आत्मस्वरूपीं त्याला अक्षय सुख मिळतें. ॥ ११४ ॥ प्राण्यांचें चित्त जसें विषयांवर लागलेलें आहे, तसें ब्रह्मावर लागेल तर कोण बरें मुक्त होणार नाहीं? ॥ ११५ ॥

---

दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ॥ स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ ७ ॥ युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ॥ सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ ८ ॥ उत्सेक उदधेर्यद्वत्कुशाग्रेणैकबिंदुना ॥ मनसो निग्रहस्तद्वद्भवेदपरिखेदतः ॥ ९ ॥ बृहद्रथस्य राजर्षेः शाकायन्यो मुनिः सुखम् ॥ प्राह मैत्राख्यशाखायां समाध्युक्तिपुरःसरम् ॥ १० ॥ यथा निरिंधनो वन्हिः स्वयोनावुपशाम्यति॥तथा वृत्तिक्षयाच्चित्तं स्वयोनावुपशाम्यति॥११॥ स्वयोनावुपशांतस्य मनसः सत्यकामिनः॥ इंद्रियार्थविमूढस्यानृताः कर्मवशानुगाः ॥ १२ ॥ चित्तमेव हि संसारस्तत्प्रयत्नेन शोधयेत् ॥ यच्चित्तस्तन्मयो मर्त्यो गुह्यमेतत्सनातनम् ॥ १३ ॥ चित्तस्य हि प्रसादेन हंति कर्म शुभाशुभम् ॥ प्रसन्नात्मात्मनि स्थित्वा सुखमक्षय्यमश्नुते ॥ १४ ॥ समासक्तं यथा चित्तं जंतोर्विषयगोचरे ॥ यद्येवं ब्रह्मणि स्यात्तत्को न मुच्येत बंधनात् ॥ १५ ॥

मनाचे प्रकार दोन. एक शुद्ध आणि अशुद्ध. जेव्हां तें कामक्रोधांनीं भरलेलें असतें तेव्हां तें अशुद्ध, आणि त्यांहीं करून रहित असतें तेव्हां तें शुद्ध समजावें. ॥ ११६ ॥ मनुष्याच्या बंधमोक्षांस कारण मनच आहे. तें विषयासक्त झाल्यानें मनुष्य बंधांत पडतो. आणि तें निर्विषय झाल्यानें मुक्त होतो. ॥ ११७ ॥ समाधीच्या अभ्यासानें ज्याचा मल धुवून टाकलेला आहे व ज्याचा प्रवेश आत्मस्वरूपीं झाला आहे, त्या चित्तास जें सुख होतें त्याचें वर्णन वाणीनें करणें अशक्य आहे. तें स्वतः अन्तःकरणानेंच ग्रहण करावयाचें. ॥ ११८ ॥ हा समाधि चिरकाल राहणें जरी कठिण आहे, तथापि तो क्षणभर मिळूं शकतो, तेवढा ब्रह्मानंदाचा निश्चय करण्यास बस आहे. ॥ ११९ ॥ या आनंदाचा निश्चय होण्यास श्रद्धा आणि व्यसन हीं दोन साधनें अवश्य आहेत. व्यसन ह्मणजे एका कामाच्या पाठीस लागलें असतां तें होईपर्यंत चैन नसणें तो एक केवळ निश्चय झाला असतां तो तसाच सर्वदां आहे, अशी खात्री होते. ॥ १२० ॥ एकदां निश्चय झालेल्या पुरुषास उदासीन दशेमध्यें देखील भासणारा जो वासनानंद त्याचीही उपेक्षा करून मुख्य जो ब्रह्मानंद तिकडेच त्याचें लक्ष असतें. ॥१२१॥ ज्याप्रमाणें जिचें सर्व चित्त परपुरुषाकडे लागलें आहे अशी व्यभिचारिणी स्त्री गृहकृत्यांत निमग्न असतांहि आंतून त्या परसंगरसायनाचा आस्वाद घेत असते. ॥ १२२ ॥ त्याप्रमाणें ज्या धीर पुरुषास एकदां परब्रह्माचा निश्चय होऊन विश्रांति मिळाली तो व्यवहार करीत असतांहि आंतून नित्य त्याचा स्वाद घेत असतो. ॥ १२३ ॥ एथें धीर ह्मणून जो शब्द आहे त्याचा अर्थ असा कीं, इंद्रियें मनास विषयांकडे ओढीत असूनही ब्रह्मानंद चाखण्याच्या इच्छेनें सर्व इंद्रियांचा तिरस्कार करून जो पुरुष त्या तत्त्वाचेंच चिंतन करितो तो धीर समजावा. ॥ १२४ ॥.

---

मनो हि द्विविधं प्रोक्तं शुद्धं चाशुद्धमेव च ॥ अशुद्धं कामसंपर्काच्छुद्धं कामविवर्जितम् ॥ १६ ॥ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥ बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतम् ॥१७॥ समाधिनिर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत् ॥. न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदंतःकरणेन गृह्यते ॥ ॥ १८ ॥ यद्यप्यसौ चिरं कालं समाधिर्दुर्लभो नृणाम् ॥ तथापि क्षणिको ब्रह्मानंदं निश्चाययत्यसौ ॥ १९ ॥ श्रद्धालुर्व्यसनी योऽत्र निश्चिनोत्येव सर्वथा ॥ निश्चिते तु सकृत्तस्मिन् विश्वसित्यन्यदाप्ययम् ॥ २० ॥ तादृक् पुमानुदासीनकालेप्यानंदवासनाम् ॥ उपेक्ष्य मुख्यमानंदं भावयत्येव तत्परः ॥ २१ ॥ परव्यसनिनी नारी व्यग्रापि गृहकर्मणि ॥ तदेवास्वादयत्यंतः परसंगरसायनम् ॥ २२ ॥ एवं तत्त्वे परे शुद्धे धीरो विश्रांतिमागतः ॥ तदेवास्वादयत्यंतर्बहिर्व्यवहरन्नपि ॥ २३ ॥ धीरत्वमक्षप्राबल्येप्यानंदास्वादवांछया ॥ तिरस्कृत्याखिलाक्षाणि तच्चिंतायां प्रवर्तनम् ॥२४॥

आणि विश्रांति शब्दाचा अर्थ असा कीं, जसा एखादा ओझें वाहणारा मनुष्य ओझें टाकून विश्रांति पावतो, त्याप्रमाणें संसारांतील व्यापाराचा त्याग झाला असतां जो हलकेपणा वाटतो तीच एथें विश्रांति. ॥ १२५ ॥ याप्रमाणें परम विश्रांति पावलेला पुरुष औदासीन्य दशेप्रमाणें सुख दुःख दशेचेठायींही त्या मुख्यानंदाकडेसच लक्ष देऊन असतो. ॥ १२६ ॥ ज्याप्रमाणें अग्निमध्यें शीघ्र प्रवेश करण्याची इच्छा झाली असतां सती जाणाऱ्या स्त्रीचें अलंकाराविषयीं वैरस्य होतें, त्याप्रमाणें धीर पुरुषास ब्रह्मानुसंधानाला विरोध न करणाऱ्या विषयसुखाविषयीं विसरता प्राप्त होते. ॥ १२७ ॥ जें सुख ब्रह्मानंदाला विरोधी नाहीं, अशा सुखाच्या वेळीं तत्त्ववेत्त्याची बुद्धि कावळ्याच्या दृष्टीप्रमाणें एकदां त्या सुखाकडे आणि एकदां ब्रह्मानंदाकडे अशा येरझारा करीत असते. ॥ १२८ ॥ कावळ्याच्या दृष्टीचा असा स्वभाव आहे कीं ती एकदां डावीकडे व एकदां उजवीकडे येते; कारण मनुष्याप्रमाणें त्याला दोन बुबुळें नाहींत. तत्त्ववेत्त्याची बुद्धीही अशीच दोन आनंदांमध्यें येरझारा घालते. ॥ १२९ ॥ ज्याप्रमाणें दुभाषी दोन्हीही भाषा जाणतो, त्याप्रमाणें तत्त्ववेत्ता लौकिक व वैदिक ह्मणजे विषयानंद आणि ब्रह्मानंद या दोहींचा अनुभव घेतो. ॥ १३० ॥ एखादें दुःख प्राप्त झालें असतां अशा पुरुषाच्या मनांत उद्वेग होत नाहीं असें नाहीं. कारण तो धर्माचा आहे, परंतु अज्ञान्यास जसा होतो तसा त्यास होत नाहीं. कारण त्याची दृष्टि आतां दोन्ही बाजूंकडे असते. ज्याप्रमाणें नदींत कमरे इतक्या पाण्यांत उभा राहिलेल्या मनुष्यास शीत व उष्ण या दोहींचा अनुभव येतो, त्याप्रमाणें याची दृष्टि दोहींकडे असते. ॥ १३१ ॥ याप्रमाणें जागृतींत तत्त्ववेत्त्याला ब्रह्मसुख सदां सर्वदां भासतें. तसेंच त्या वासनेपासून उत्पन्न होणाऱ्या स्वप्नांतही भासतें. ॥ १३२ ॥ केवळ सुखच भासतें असें नाहीं. जशी आनंदवासना असते, तशी अविद्यावासनाही असते;

---

भारवाही शिरोभारं मुक्त्वास्ते विश्रमं गतः ॥ संसारव्यापृतित्यागे तादृक्बुद्धिस्तु विश्रमः ॥ २५ ॥ विश्रांतिं परमां प्राप्तस्त्वौदासीन्ये यथा तथा ॥ सुखदुःखदशायां च तदानंदैकतत्परः ॥ २६ ॥ अग्निप्रवेशहेतौ धीः शृंगारे यादृशी तथा ॥ धीरस्योदेति विषयेनुसंधानविरोधिनि ॥ २७ ॥ अविरोधिसुखे बुद्धिः स्वानंदे च गमागमौ ॥ कुर्वत्यास्ते क्रमादेषा काकाक्षिवदितस्ततः ॥ २८ ॥ एकैव दृष्टिः काकस्य वामदक्षिणनेत्रयोः ॥ यात्यायात्येवमानंदद्वये तत्त्वविदो मतिः ॥ २९ ॥ भुंजानो विषयानंदं ब्रह्मानंदं च तत्त्ववित् ॥ द्विभाषाभिज्ञवद्विद्यादुभौ लौकिकवैदिकौ ॥ ३० ॥ दुःखप्राप्तौ नचोद्वेगो यथापूर्वं यतो द्विदृक् ॥ गंगामग्नार्द्धकायस्य पुंसः शीतोष्णधीर्यथा ॥ ३१ ॥ इत्थं जागरणे तत्त्वविदो ब्रह्मसुखं सदा ॥ भाति तद्वासनाजन्ये स्वप्ने तद्भासते तथा ॥ ॥ ३२ ॥ अविद्यावासनाप्यस्तीत्यतस्तद्वासनोत्थिते ॥ स्वप्ने मूर्ख-

त्यामुळें त्यापासून उत्पन्न होणाऱ्या स्वप्नांत देखील मूढाप्रमाणें यालाही सुखदुःखें भासतात. ॥ १३३ ॥ एथवर ब्रह्मानंद प्रकरणामध्यें योग्यास प्रत्यक्ष होणारा जो ब्रह्मानंद तो या प्रथमाध्यायीं आह्मीं सांगितला. ॥ १३४ ॥

---

वदेवैष सुखं दुःखं च वीक्षते ॥ ३३ ॥ ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे ब्रह्मानंदप्रकाशकम् ॥ योगिप्रत्यक्षमध्याये प्रथमेऽस्मिन्नुदीरितम् ॥ ३४ ॥ इति ब्रह्मानंदे योगानंदो नाम प्रथमोऽध्यायः १ ॥ ११

॥ इति ब्रह्मानन्दे योगानन्दः ॥

# सार्थपंचदश्याम्

## ब्रह्मानन्दे आत्मानन्दः ।

### द्वादशप्रकरणम्

शि०—ह्या प्रकरणाच्या प्रथमाध्यायीं तूष्णीं स्थितींतील वासनानंद आणि सुषुप्तींतील यांखेरीज समाधींतील निजानंद जो सांगितला तो जाणण्यास केवळ योगी मात्र समर्थ आहेत. पण मूढांस तो समजणें कठिण असल्यामुळें त्यांणीं काय करावें ? ॥ १ ॥ गु० जे केवळ अज्ञानी आहेत त्यांचें होईल तसें होवो. पूर्वजन्मीं केलेल्या पुण्यपापरूप कर्मवशात् ते जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडेनात बापडे. त्यांजवर दया करून उपयोग काय ? ॥ २ ॥ शि० सर्वांवर अनुग्रह करण्याचें काम ज्या अर्थी आपण पतकरलें आहे त्या अर्थी असें ह्मणून कसें चालेल ? त्यांच्याही उद्धारास कोणचा तरी मार्ग सांगितलाच पाहिजे. गु० अरे, मूढ दोन प्रकारचे आहेत. एक जिज्ञासु ह्मणजे ज्यास तत्त्वज्ञानाची इच्छा आहे तो, आणि दुसरा पराङ्मुख ह्मणजे ज्यास ती इच्छा नसून केवळ परलोकाची मात्र इच्छा आहे तो. यांपैकीं तूं कोणचा घेतोस ? ॥ ३ ॥ पराङ्मुख जर ह्मणशील तर त्याला आह्मी उपासना किंवा कर्म सांगून वाटेस लावितों. आणि जिज्ञासु असून जड बुद्धीचा असेल तर त्याला आत्मानंदाचें विवेचन करून मार्गास लाविलें पाहिजे. ॥ ४ ॥ शि०—ह्या आत्मानंदाचें विवेचन पूर्वी कोणीं कोणाला केलें आहे काय ? गु० होय तर. याज्ञवल्क्यऋषीनें आपल्या मैत्री नामक पत्नीला असा बोध केला आहे कीं, "हे प्रिये, स्त्रीला पति जो आवडतो तो पतीच्या सुखाकरितां नव्हे, तर तिच्या स्वतःच्या सुखाकरितां. याचप्रमाणें पति, जाया, पुत्र, द्रव्य, पशु, ब्राह्मण, क्षत्रिय लोक, देव, वेद, आणि सृष्टींतील इतर सर्व पदार्थ, मनुष्यास आप-

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथात्मानंदः ॥ नन्वेवं वासनानंदाद्ब्रह्मानंदादपीतरम् ॥ वेत्तु योगी निजानंदं मूढस्यात्राऽस्ति का गतिः ॥ १ ॥ धर्माधर्मवशादेष जायतां म्रियतामपि ॥ पुनः पुनर्देहलक्षैः किन्नो दाक्षिण्यतो वद ॥ २ ॥ अस्ति वोनुजिघृक्षुत्वाद्दाक्षिण्येन प्रयोजनम् ॥ तर्हि ब्रूहि स मूढः किं जिज्ञासुर्वा पराङ्मुखः ॥ ३ ॥ उपास्तिं कर्म वा ब्रूयाद्विमुखाय यथोचितम् ॥ मंदप्रज्ञं तु जिज्ञासुमात्मानंदेन बोधयेत् ॥ ४ ॥ बोधयामास मैत्रेयीं याज्ञवल्क्यो निजप्रियाम् ॥ न वा अरे पत्युरर्थे पतिः प्रिय इतीरयन् ॥ ५ ॥ पतिर्जाया पुत्रवित्ते पशुब्राह्मणबाहुजाः ॥ लोका

त्याचकरितां प्रिय झाले आहेत ॥ ६ ॥ जेव्हां पतीविषयीं स्त्रीला काम उत्पन्न होतो तेव्हां तिला तो अतिप्रिय होतो. आणि जेव्हां क्षुधा, अनुष्ठान आणि रोगादि इहींकरून तो युक्त असतो तेव्हां ती त्याला आवडत नाहीं. ॥ ७ ॥ यावरून तिची प्रीति स्वार्थाकरितां आहे. ती कांहीं पतीकरितां नव्हे. तसेंच उलट पक्षीं पाहतां पतीची स्त्रियेवरील प्रीति ही स्त्रियेकरितां नसून केवळ स्वतःकरितांच आहे. ॥८ ॥ याप्रमाणें परस्पर प्रीति करण्याचीं प्रेरणा स्वेच्छेनेंच उत्पन्न होते. ॥९ ॥ बाप मुलाचे जे इतके मुके घेतो, ते काहीं मुलाकरितां नव्हत तर केवळ आपल्याकरितां आहेत. कारण मुलाकरितां जर ह्मणावें तर दाढीचे केंस त्या कोमल आंगांस टोंचल्यानें तें मूल रडत असतांही हा धुम् मुके घेतच असतो. तेव्हां तच मुलाकरितां नव्हत हें उघड आहे. ॥ १० ॥ हीं मनुष्याची गोष्ट झाली. आतां [illegible] षयीं तर बोलायलाच नको. कारण सोनें रुपें बोलून चालून जड असल्यामुळें त्यांस इच्छेचा संभवच नाहीं. ह्मणोन त्याजविषयींची मनुष्याची प्रीति केवळ स्वार्थाकरितांच आहे हें उघड आहे. ॥ ११ ॥ तशीच जनावरांची गोष्ट. वाण्याची बैलावरील प्रीति जर बैलाकरितां ह्मणावी तर त्याजवर बळजोरीनें तो ओझें कसें लादील. याजकरितां तीहि प्रीति स्वतःचकरितां. ॥ १२ ॥ जातीवर जी आमची प्रीति आहे, तीही स्वार्थपरच. मी ब्राह्मण आहें ह्मणून मी पूज्य आहें, असा जो जातीविषयींचा संतोष तो मनुष्यासच होतो; तो जातीस होत नाहीं. ॥ १३ ॥ तसेंच मी क्षत्रिय आहें, मी राज्य करितों, असा राजाभिमानही मनुष्यालाच होतो. क्षत्रिय जातीला मुळींच नाहीं. हाच नियम बाकीचे वैश्यादिक जातीला लागू आहे. ॥१४॥ हा सिद्धांत इतका खरा आहे कीं, तो केवळ प्रपंचालाच लागतो असें नाहीं. परमार्थांतही याणें

---

देवा वेदभूते सर्वं चात्मार्थतः प्रियम्॥६॥पत्याविच्छा यदा पत्न्यास्तदा प्रीतिं करोति सा ॥ क्षुदनुष्ठानरोगाद्यैस्तदा नेच्छति तत्पतिः ॥ ७ ॥ न पत्युरर्थे सा प्रीतिः स्वार्थ एव करोति ताम् ॥ पतिश्चात्मन एवार्थे न जायार्थे कदाचन ॥ ८ ॥ अन्योन्यप्रेरणेप्येवं स्वेच्छयैव प्रवर्तनम् ॥ ९ ॥ श्मश्रुकंटकवेधेन बाले रुदति तत्पिता ॥ चुंबत्येव न सा प्रीतिर्बालार्थे स्वार्थ एव सा ॥ १०॥निरिच्छमपि रत्नादिवित्तं यत्नेन पालयन्॥ प्रीतिं करोति स स्वार्थे वित्तार्थत्वं न शंकितम् ॥ ११ ॥ अनिच्छति बलीवर्दे विवाहयिषते बलात् ॥ प्रीतिः सा वणिगर्थैव बलीवर्दार्थता कुतः ॥ १२ ॥ ब्राह्मण्यं मेऽस्ति पूज्योहमिति तुष्यति पूजया ॥ अचेतनाया जातेर्नो संतुष्टिः पुंस एव सा ॥ १३ ॥ क्षत्रियोऽहं तेन राज्यं करोमीत्यत्र राजता ॥ न जातेर्वैश्यजात्यादौ योजनायेदमीरितम्॥१४॥स्वर्गलोकब्रह्मलोकौ स्तां ममेत्यभिवांछनम् ॥ लोकयो-

आपला अंमल तितकाच बसविला आहे. स्वर्गलोक ब्रह्मलोक इत्यादि मला मिळावे अशी जी मनुष्याला इच्छा होते तीही केवळ स्वतःकरितांच आहे. त्या लोकांकरितां नाहीं. ॥ १५ ॥ आपलें पाप नष्ट व्हावें ह्मणून ईश विष्णु इत्यादि देवतांची लोक जी उपासना करितात ती आपलें पाप जावें ह्मणून. निष्पापी जे देव त्यांना काय त्यांची जरूर आहे. ॥ १६ ॥ तशीच अध्ययनाची गोष्ट. ऋग्वेदादि चार वेदांचें अध्ययन जें करितात तें आपलें व्रात्यत्व जाऊन ण्य यावें ह्मणून. वेदाला कांहीं त्याची जरूरी नाहीं मनुष्यांनाच आहे. ॥ १७ ॥ तशीच आदि पंचभूतें यांवर जी मनुष्याची प्रीति आहे तीही आपल्याकरितांच. आपल्याला राहजागा पाहिजे ह्मणून पृथ्वी प्रिय, तृषेकरितां पाणी, स्वयंपाककिरतां अग्नि, शोषणाकर आणि अवकाश मिळावा ह्मणून आकाश. ॥ १८ ॥ याचप्रमाणें धनी आणि चाकर, राजा आणि प्रजा, यांचाही संबंध तसाच आहे. त्यांची परस्परांविषयींची हितचिंता केवळ आपल्याकरितांच आहे. कोणाचा कोणांवर उपकार नाहीं. ॥ १९ ॥ अशीं उदाहरणें व्यवहारांत पुष्कळ आहेत. यावरून मनुष्यानें आत्म्यावरील जी स्वभाविक प्रीति ती ओळखून दृढ करावी. ॥ २० ॥ शिष्य–आत्म्याविषयीं अनिमित्त प्रीति जी आपण सांगितली ती कोणची ह्मणून समजावी ? जगामध्यें प्रीतींचीं चार स्वरूपें राग, श्रद्धा, भक्ति आणि इच्छा ( आवड ) आतां दृष्टीस पडतात. राग हीच आपण सांगितलेली प्रीति ह्मणावी तर ती केवळ स्त्री पुत्र धन इत्यादिकांच्याठायीं, श्रद्धा यज्ञयागादि कर्माविषयींच आहे. ॥ २१ ॥ भक्ति ह्मणावी तर ती केवळ गुरुदेवतेविषयींच आणि इच्छा ह्मणजे आवड ह्मणावी तर ती केवळ अप्राप्य वस्तूंविषयींच. तर तुह्मीं सांगितलेली जी एक सारखी असणारी प्रीति ती यांपैकीं कोणती ? गु०–तूं ज्या चार प्रकारच्या प्रीति सांगितल्यास त्यांना व्यभिचार घडतो तसा आमच्या आत्मप्रीतीस व्यभिचार मुळींच नाहीं. तर त्या प्रीतीचें स्वरूप तुला आतां सांगतों. सर्वदां सुखावरच जड-

---

नोपकाराय स्वभोगायैव केवलम् ॥ १५ ॥ ईशविष्ण्वादयो देवाः पूज्यंते पापनष्टये ॥ न तन्निष्पापदेवार्थं तत्तु स्वार्थं प्रयुज्यते ॥ १६ ॥ ऋगादयो ह्यधीयंते दुर्ब्राह्मण्यानवाप्तये ॥ न तत्प्रसक्तं वेदेषु मनुष्येषु प्रसज्यते ॥ १७ ॥ भूम्यादिपंचभूतानि स्थानतृट्पाकशोषणैः ॥ हेतुभिश्चावकाशेन वांछंत्येषां न हेतवः ॥ १८ ॥ स्वामिभृत्यादिकं सर्वं स्वोपकाराय वांछति ॥ तत्तत्कृतोपकारस्तु तस्य तस्य न विद्यते ॥ १९ ॥ सर्वव्यवहृतिष्वेवमनुसंधातुमीदृशम् ॥ उदाहरणबाहुल्यं तेन स्वां वासयेन्मतिम् ॥ २० ॥ अथ केयं भवेत्प्रीतिः श्रूयते या निजात्मनि ॥ रागो वध्वादिविषये श्रद्धा यागादिकर्मणि ॥ २१ ॥ भक्तिः स्याद्गुरुदेवादाविच्छा त्वप्राप्तवस्तुनि ॥ तर्ह्यस्तु सात्विकी वृत्तिः सुखमात्रानुवर्तिनी ॥

लेली अशी अन्तःकरणाची सात्विकवृत्ति तीच आमची आत्मप्रीति ॥ २२ ॥ शि०—मग ती इच्छा म्हणावी. आत्मप्रीति कसची ? गु०—ती इच्छा होऊं शकत नाहीं. कारण इच्छा ही वस्तु प्राप्त होण्यापूर्वी मात्र असते. परंतु या प्रीतीची गोष्ट तशी नाहीं. वस्तु प्राप्त होवो किंवा नष्ट होवो, ती जशाची तशी असते. म्हणून ही आत्मप्रीतीच आहे. इच्छा नव्हे. ॥ २३ ॥ शि०—अन्नपानादि पदार्थ सुखास साधनीभूत आहेत म्हणून ते प्रिय झालेले आहेत. यावरून असें अनुमान होतें कीं, ज्या ज्या म्हणून प्रिय वस्तु त्या त्या सुखाचीं साधनें आहेत. आणि आपण म्हणतां कीं, आत्मा प्रिय आहे. त्यावरून त्यालाही सुखसाधनत्व आलें. मग त्या अन्नपानादिकांत व आत्म्यांत भेद तो काय ? गु०—आत्मा हा अन्नपानादिकांप्रमाणें सुखसाधन ह्मणतां येत नाहीं. कारण अन्नपानादिकांपासून जसें निराळें एक सुख प्राप्त होण्याचें असतें, तसें आत्मरूप साधनानें सुख घेणारा कोण; शि०—आत्म्यापासून सुख आत्म्यानेंच घ्यावें. गु०—तसें मानल्यास एकाला कर्मता आणि कर्तृता येऊन विरोध येईल. ॥ २४ ॥ शि०—वैषायिक सुखावरही तशीच प्रीति असते. तेव्हां तुमचा आत्मा आणि विषयसुख यांत भेद काय ? गु०—भेद आहे; नाहीं कसा ! विषयसुखावर प्रीति जरी असली तरी ती केवळ प्रीति होय. ती निरतिशय नव्हे म्हणजे एकसारखी नसते. ती एका विषयसुखास सोडून दुसऱ्यावर जाते. म्हणून ती व्यभिचारिणी होय. तशी आत्मप्रीति नव्हे. या प्रीतीस कधीं व्यभिचारच नाहीं. ह्मणून आत्मा अतिप्रिय आहे. ॥ २५ ॥ ती जशी एका विषयसुखास सोडून दुसऱ्यावर जाते तशी ही आत्मप्रीति नव्हे. कारण, आत्म्याचा त्यागही घडत नाहीं आणि ग्रहणही घडत नाहीं. तेव्हां त्या प्रीतीस व्यभिचार कसा येईल ?॥२६॥ शि०—ज्या वस्तूस त्याग आणि ग्रहण नाहीं ती तृणासारखी उपेक्षेस पात्र आहे; म्हणून तुमचा आत्माही तसा उपेक्ष्य म्हणजे तुच्छ झाला कीं ? गु०—तुच्छ कसा होईल, अरे जो त्यागग्रहणास विषय नाहीं तो उपेक्षेस तरी कसा विषय होईल. उपेक्षा करणारा आणि आत्मा यांमध्यें मुळीं भेदच नाहीं. तेव्हां याची उपेक्षा कोण करणार ? ॥ २७ ॥ शि०—मनुष्याला रोगानें फार ग्रासलें असतां किंवा अतिसंताप आला असतां, त्यास मरणाची इच्छा झालेली जगांत दृष्टीस पडते, यावरून आ-

---

॥ २२ ॥ प्राप्ते नष्टेऽपि सद्भावादिच्छातो व्यतिरिच्यते ॥ सुखसाधनतोपाधेरन्नपानादयः प्रियाः ॥ २३ ॥ आत्मानुकूल्यादन्नादिसमश्चेदमुनात्र कः ॥ अनुकूलयितव्यः स्यान्नेकस्मिन्कर्मकर्तृता ॥ २४ ॥ सुखे वैषयिके प्रीतिमात्रमात्मा त्वतिप्रियः ॥ सुखे व्यभिचरत्येषा नात्मनि व्यभिचारिणी ॥ २५ ॥ एकं त्यक्त्वाऽन्यदादत्ते सुखं वैषयिकं सदा ॥ नात्मा त्याज्यो न चादेयस्तस्मिन्व्यभिचरेत्कथम् ॥ २६ ॥ हानादानविहीनेऽस्मिन्नुपेक्षा चेत्तृणादिवत् ॥ उपेक्षितुः स्वरूपत्वान्नोपेक्ष्यत्वं निजात्मनः ॥ २७ ॥ रोगक्रोधाभिभूतानां मुमूर्षा वीक्ष्यते क्वचित् ॥ ततो द्वेषाद्भवे-

त्मा द्वेषामुळें त्याज्य आहे असें होतें. ॥ २८ ॥ गु०—होय मरणाची इच्छा मनुष्यास होते. पण ती देहत्यागाची इच्छा. देह कांहीं आत्मा नव्हे. देहाचा त्याग करणारा जो कोणी निराळा आहे तो आत्मा आणि त्याविषयीं कांहीं त्याचा द्वेष नसतो. शि०—देहाविषयीं तरी असतो ना ? गु०—देहाविषयीं असेना बापडा. तेणेंकरून आमचे सिद्धांतास काय हानी. ॥ २९॥ करितां सर्व पदार्थांवरील प्रीति आत्मार्थच असल्यामुळें तो ज्याप्रमाणें पुत्रास्तव पुत्राचा मित्र त्यामुळें पुत्रच मित्रापेक्षां अधिक प्रिय असला पाहिजे, त्याप्रमाणें आत्माही सर्वांमध्यें प्रिय हें सिद्ध झालें. ॥ ३० ॥ शि०—युक्तीनें तसें सिद्ध पण अनुभव कुठें तसा आहे. गु०—ही तसाच आहे. मीं सदां सर्वदां असावें, कधींच नष्ट होऊं नये. अशी आत्मप्रीतिदर्शक इच्छा कोणास बरें नाहीं ? तस्मात् अनुभवावरूनही सिद्ध झालें. ॥ ३१ ॥ शि०—याप्रमाणें अनुभव, युक्ति आणि श्रुति या तीन प्रमाणांनीं आत्म्यावरील अति प्रति सिद्ध केली. पण कित्येकांचें मत असें आहे कीं, पुत्रभार्यादिकांकरितांच आपण आहों. ॥ ३२ ॥ तीं कांहीं आपणाकरितां नव्हेत. म्हणूनच तींच अतिप्रीतीस पात्र आहेत. व याविषयीं श्रुतीमध्यें प्रमाणही आढळतें. "आत्मा वै पुत्रनामासि" असें उपनिषदामध्यें पुत्राला मुख्यत्व दिलें आहे. ॥ ३३ ॥ श्रुतींत असें ह्मटलें आहे कीं, " बाप आपल्या पुत्राला पुण्यकर्मानुष्ठानाकरितां आपल्या जागीं प्रतिनिधी नेमून आपण जराग्रस्त होऊन कृतकृत्य बुद्धीनें देह ठेवितो. " ॥ ३४ ॥ याप्रमाणें पुत्राला मुख्यात्मत्व सिद्ध होतें म्हणून पित्याचा आत्मा जरी असला, तरी " अपुत्राला लोक नाहीं " असें पुराणांतच सांगितलें आहे. याकरितांच पित्यानें ज्यास पुढील मंत्राचा उपदेश केला असा पुत्रच परलोकास साधन आहे असें पंडित ह्मणतात. ॥ ३५ ॥ इतकेंच नव्हे तर

---

त्याज्य आत्मेति यदि तन्न हि ॥ २८ ॥ त्यक्तुं योग्यस्य देहस्य नात्मता त्यक्तुरेव सा ॥ न त्यक्तुर्य्यस्ति स द्वेषस्त्याज्ये द्वेषे तु का क्षतिः ॥ २९ ॥ आत्मार्थत्वेन सर्वस्य प्रीतेश्चात्मा ह्यतिप्रियः ॥ सिद्धो यथा पुत्रमित्रात्पुत्रः प्रियतरस्तथा ॥ ३० ॥ मा न भूवमहं किं तु भूयासं सर्वदेत्यसौ ॥ आशीः सर्वस्य दृष्टेति प्रत्यक्षा प्रीतिरात्मनि ॥ ३१ ॥ इत्यादिभिस्त्रिभिः प्रीतो सिद्धायामेवमात्मनि ॥ पुत्रभार्यादिशेषत्वमात्मनः कैश्चिदीरितम् ॥३२॥ एतद्विवक्षया पुत्रे मुख्यात्मत्वं श्रुतीरितम् ॥ आत्मा वै पुत्रनामेति तच्चोपनिषदि स्फुटम् ॥ ३३ ॥ सोऽस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयते ॥ अथास्येतर आत्मायं कृतकृत्यः प्रमीयते ॥ ॥ ३४ ॥ सत्यप्यात्मनि लोकोस्ति नापुत्रस्यात एव हि ॥ अनुशिष्टं पुत्रमेव लोक्यमाहुर्मनीषिणः ॥ ३५ ॥ मनुष्यलोको जय्यः स्यात्पुत्रेणैवेतरेण नो ॥ मुमूर्षुर्मंत्रयेत्पुत्रं "त्वं ब्रह्मेत्यादिमंत्रकैः

ऐहिक सुखास देखील पुत्राचीच गरज आहे. याविषयीं श्रुतिप्रमाण असें आहे कीं, हा मनुष्यलोक पुत्रानेंच जिंकण्यास योग्य आहे. इतर कोणच्याही कर्मानें तो जिंकतां येत नाहीं. कारण निपुत्रिकांस कितीहि संपत्ति असली तरी तिजपासून त्यांस सुख होत नाहीं. वर जो उपदेश म्हणून सांगितला तो मरणाच्या वेळीं बाप मुलांस करितो तो असा "तूंच ब्रह्म, तूंच लोक आणि तूंच यज्ञ." ॥ ३६ ॥ या सर्व श्रुतीमध्यें आत्म्यापेक्षां पुत्रभार्यादिकांनाच महत्त्व दि[illegible] आहे इतकेंच नव्हें, तर पुत्राला या रीतीचें प्राधान्य जगांत सर्व लोक देतात.॥ ३७ ॥ आ[illegible] मेलों तरी बायकामुलांनीं सुखानें रहावें म्हणून मनुष्य पैसा जमीन इत्यादिकांची तजवीज [illegible]ईल तितकी आपण स्वतः दुःख भोगूनही करितो. याकरितां पुत्रादिकच मुख्य आहेत अ[illegible]ली रतें. ॥ ३८ ॥ गु०—तूं म्हणतोस तें खरें आहे. परंतु एवढ्यावरूनच पुत्रदारापेक्षां आत्मा कमी प्रिय ठरतो असें समजूं नको. कारण आत्म्याचे प्रकार तीन आहेत. एक गौणात्मा, दुसरा मिथ्यात्मा आणि तिसरा मुख्यात्मा. ॥ ३९ ॥ हा देवदत्त सिंह आहे असें म्हणून आम्हीं जेव्हां दोघांचें ऐक्य करितों, तेव्हां उभयतांमध्यें भेद असल्यामुळें तें ऐक्य खरें नव्हे. केवळ औपचारिक आहे. तसाच पुत्रात्माही गौणच समजला पाहिजे. ॥ ४० ॥ साक्षी आणि पंचकोश यांत प्रत्यक्ष भेद असूनही तो भ्रमानें भासत नाहीं. स्थाणूवर जसा चोराचा भ्रम व्हावा तसा कोशांवर आत्म्याचा भ्रम होतो. म्हणून प्रत्येक कोश मिथ्यात्मा समजावा. ॥ ४१ ॥ आणि त्या सर्व कोशांचा जो साक्षी तोच मुख्यात्मा समजावा. कारण तेथें भेद मुळींच नाहीं व भासतही नाहीं. कारण भेद असण्यास व भासण्यास दुसरा कोणी एक प्रतियोगी पाहिजे. साक्षीस तसा प्रतियोगी कोणीच नाहीं. याला मुख्यात्मा ह्मणण्याचें कारण हेंच कीं, तो सर्वांचे ठायीं आहे. ॥ ४२ ॥ या तीन आत्म्यांपैकीं ज्या ज्या व्यवहारांत जो जो आत्मा योग्य असेल, त्या त्या व्यावहारांत त्याला मुख्यत्व देऊन इतर गौण(उपसर्जन) असें समजावें. ॥ ४३ ॥

---

॥ ३६ ॥ इत्यादिश्रुतयः प्राहुः पुत्रभार्यादिशेषताम् ॥ लौकिका अपि पुत्रस्य प्राधान्यमनुमन्वते ॥ ३७ ॥ स्वस्मिन्मृतेपि पुत्रादिर्जीवेद्वित्तादिना यथा ॥ तथैव यत्नं कुरुते मुख्याः पुत्रादयस्ततः ॥ ३८ ॥ बाढमेतावता नात्मा शेषो भवति कस्यचित् ॥ गौणमिथ्यामुख्यभेदैरात्मायं भवति त्रिधा ॥ ३९ ॥ देवदत्तस्तु सिंहोयमित्यैक्यं गौणमेतयोः ॥ भेदस्य भासमानत्वात्पुत्रादेरात्मता तथा ॥ ४० ॥ भेदोस्ति पंचकोशेषु साक्षिणो न तु भात्यसौ ॥ मिथ्यात्मताऽतः कोशानां स्थाणोश्चोरात्मता यथा ॥ ४१ ॥ न भाति भेदो नाप्यस्ति साक्षिणोऽप्रतियोगिनः ॥ सर्वांतरत्वात्तस्यैव मुख्यमात्मात्वमिष्यते ॥ ४२ ॥ सत्येवं व्यवहारेषु येषु तस्यात्मतोचिता ॥ तेषु तस्यैव शेषित्वं सर्वस्यान्यस्य शेषता ॥ ४३ ॥

जेव्हां बाप मरणास टेकतो, तेव्हां आपलें घर शेत इत्यादिकांचें रक्षण व्हावें म्हणून आपल्या बायकामुलांनाच त्या कामीं योजितो. म्हणून त्यांनाच येथें आत्मत्व दिलें पाहिजे. कारण साक्षी अविकारी असल्यामुळें मुख्यात्म्याचा येथें उपयोग नाहीं. आणि देह मरणोन्मुख असल्यामुळें मिथ्यात्माही निरुपयोगी आहे. ॥ ४४ ॥ यास दृष्टांत. " अध्येता ( अध्ययन करणारा ) अग्नि आहे " या वाक्यांत खरा दहन करणारा अग्नि समजावयाचा नव्हे. कारण अध्ययन करण्याचा गुण त्यामध्यें नाहीं. म्हणून अध्ययन करणारा शिष्यच असा या ठिकाणीं अग्नि शब्दाचा अर्थ समजला पाहिजे. ॥ ४५ ॥ तसेंच " मी कृश झालों आहें. " " दुध खाऊन मला लठ्ठ झालें पाहिजे. अशा व्यवहारांत अन्नभक्षणाला योग्य अशा देहालाच आत्मत्व दिलें पाहिजे. कारण तेथें पुत्राचा उपयोग नाहीं. म्हणून येथें मिथ्यात्म्यालाच प्राधान्य दिलें पाहिजे. ॥ ४६ ॥ त्याचप्रमाणें तप करून स्वर्गास मी जाईन अशा इच्छेनें जेव्हां मनुष्य तप करितो, तेव्हां तेथें कर्ता जो विज्ञानमय त्यालाच आत्मत्व दिलें पाहिजे. देहास देतां येत नाहीं. कारण तेव्हां तो शरीरास सुख देणारे सर्व भोग एकीकडे सारून कृच्छ्रचांद्रायणादि तपाचें अनुष्ठान करितो. ॥ ४७ ॥ तसेंच शमादि साधनानें मला मुक्ति व्हावी असें जेव्हां मनुष्य इच्छितो, तेव्हां गुरुशास्त्राचे साहाय्यानें त्यास ज्ञान होतें. मग त्याला कांहींच करण्याची इच्छा नसते. अशा प्रसंगीं मुख्यात्म्यालाच प्राधान्य दिलें पाहिजे. ॥ ४८ ॥ ब्राह्मणानें बृहस्पतिसवेंकरून यज्ञ करावा, या वाक्यावरून तो यज्ञ करण्याचा अधिकार ब्राह्मणालाच आहे. राजानें राजसूययज्ञ करावा, या वाक्यावरून तो यज्ञ करण्याचा क्षत्रियासच अधिकार आहे. आणि वैश्यानें स्तोमनामक यज्ञ करावा. या वाक्यांत तो यज्ञ करण्यास वैश्यालाच अधिकार आहे. त्याप्रमाणें गौण, मिथ्या व मुख्य हे तीनही आत्मे त्या त्या उचित व्यवहारांत प्रधान आहेत. ॥ ४९ ॥ ज्या ज्या व्यवहारीं जो जो आत्मा प्रधान असेल त्या त्या व्यवहारांत त्या त्या आत्म्यावर अतिशय प्रीति असते. त्यावांचून त्याच्याकरितां जे दुसरे पदार्थ आहेत त्यांजवर प्रीतिमात्र असते, पण तितकी नसते. आणि त्यावांचून इतर पदार्थावर प्रीतिही नसते

---

मुमूर्षोर्गृहरक्षादौ गौणात्मैवोपयुज्यते ॥ न मुख्यात्मा न मिथ्यात्मा पुत्रः शेषी भवत्यतः ॥ ४४ ॥ अध्येता वन्हिरित्यत्र सन्नप्यग्निर्न गृह्यते ॥ अयोग्यत्वेन योग्यत्वाद्बटुरेवात्र गृह्यते ॥ ४५ ॥ कृशोहं पुष्टिमाप्स्यामीत्यादौ देहात्मतोचिता॥ न पुत्रं विनियुंक्तेऽत्र पुष्टिहेत्वन्नभक्षणे ॥४६॥ तपसा स्वर्गमेष्यामीत्यादौ कर्तात्मतोचिता ॥ अनपेक्ष्य वपुर्भोगं चरेत्कृच्छ्रादिकं ततः ॥४७॥ मोक्ष्येहमित्यत्र युक्तं चिदात्मत्वं तदा पुमान् ॥ तद्वेत्ति गुरुशास्त्राभ्यां न तु किंचिच्चिकीर्षति ॥ ४८ ॥ विप्रक्षत्रादयो यद्वद् बृहस्पतिसवादिषु ॥ व्यवस्थितास्तथा गौणमिथ्यामुख्या यथोचितम् ॥ ४९ ॥ तत्र तत्रोचितेप्रीतिरात्मन्येवातिशायिनी ॥ अनात्मनि तु तच्छेषे

आणि अतिप्रीतिही नसते. ॥ ५० ॥ आतां इतर पदार्थ ह्मणून जें वर ह्मटलें, त्याविषयीं मनुष्याच्या मनाची वृत्ति दोन प्रकारची असते. एक उपेक्षा आणि दुसरी द्वेषवृत्ति. या वृत्तिभेदानें पदार्थांतही उपेक्ष्य आणि द्वेष्य असे दोन भेद झाले. मार्गावर पडलेले तृणादिक हे उपेक्ष्य आहेत आणि व्याघ्रसर्पादिक दुष्ट प्राणी द्वेष्य आहेत. याप्रमाणें मनोवृत्तीचे प्रकार चार झाले. ॥ ५१ ॥ आत्मा आत्मशेष उपेक्ष्य आणि द्वेष्य या चारींमध्यें अमुकच आत्मा, अमुकच त्याचा शेष, अमुकच उपेक्ष्य आणि अमुकच द्वेष्य असें ह्मणतां येत नाहीं. तर त्या त्या समयीं त्या त्या कार्याकासून जशी जशी लाभ हानी असेल त्यात्याप्रमाणें तें समजावयाचें. ॥५२॥ येथें वाघाचेंच उदाहरण घेतलें ह्मणजे झालें. वाघ समोर आपल्या आंगावर आला असतां तो द्वेष्य होतो दूर डोंगरावर जात असतां उपेक्ष्य होतो. आणि तोच पालन करणाऱ्या दरवेशाला लाभदायक असल्यामुळें प्रिय होतो. ह्मणजे, त्यास आत्मशेषता येते. ॥ ५३ ॥ या तिन्हींचें येथें लक्षण सांगितलें असतां समजण्यास बरें पडेल. कारण येथें व्यक्तींचा नेम नाहीं. तें लक्षण असें कीं, पदार्थ अनुकूल असतां प्रिय होतो, प्रतिकूल असतां द्वेष्य होतो आणि दोन्हींही नसेल तर तो उपेक्ष्य समजावा. ॥ ५४ ॥ यावरून असें झालें कीं आत्मा हा सर्वांत प्रिय आणि त्याला उपकार करणारे पदार्थ त्याहून कमी प्रिय आणि त्यावांचून बाकीच्या पदार्थांत कांहीं द्वेष्य आणि उपेक्ष्य अशी व्यवस्था याज्ञवल्क्यांनीं केली आहे. ॥ ५५ ॥ याप्रमाणें पुरुषविध ब्राह्मणांतही आत्म्याचा अतिप्रियपणा वर्णिला आहे. तेथें असें ह्मटलें कीं, " सर्वांच्या अंतरीं असणारा आत्मा पुत्र, वित्त व दुसऱ्या सर्व पदार्थांपेक्षां फार प्रिय आहे." ॥ ५६ ॥ आतां श्रुतीस अनुसरून विचारदृष्टीनें पाहिलें असतां सर्वांचा जो साक्षी तोच आत्मा ठरतो. येथें विचार ह्मणजे हाच कीं पंच कोशांचा विवेक करून आपल्या आंत दृष्टि घालावी. ॥ ५७ ॥ जागृती, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांचें येणें जाणें ज्याला सहज स-

---

प्रीतिरन्यत्र नोभयम् ॥ ५० ॥ उपेक्ष्यं द्वेष्यमित्यन्यद् द्वेधा मार्गतृणादिकम् ॥ उपेक्ष्यं व्याघ्रसर्पादि द्वेष्यमेवं चतुर्विधम् ॥ ५१ ॥ आत्मा शेष उपेक्ष्यं च द्वेष्यं चेति चतुर्ष्वपि ॥ न व्यक्तिनियमः किंतु तत्तत्कार्यात्तथा तथा ॥ ५२ ॥ स्याद्व्याघ्रः संमुखो द्वेष्यो ह्युपेक्ष्यस्तु पराङ्मुखः ॥ लालनादनुकूलश्चेद्विनोदायेति शेषताम् ॥ ५३ ॥ व्यक्तीनां नियमो मा भूल्लक्षणात्तु व्यवस्थितिः॥ आनुकूल्यं प्रातिकूल्यं द्वयाभावश्च लक्षणम् ॥५४॥ आत्मा प्रेयान् प्रियः शेषो द्वेषोपेक्षे तदन्ययोः ॥ इति व्यवस्थितो लोको याज्ञवल्क्यमतं च तत् ॥ ५५ ॥ अन्यत्रापि श्रुतिः प्राह पुत्राद्वित्तात्तथान्यतः ॥ सर्वस्मादांतरं तत्त्वं तदेतत्प्रेय इष्यताम् ॥ ५६ ॥ श्रौत्या विचारदृष्ट्यायं साक्ष्येवात्मा न चेतरः ॥ कोशान्पंच विविच्यांतर्वस्तुदृष्टिर्विचारणा ॥ ५७॥ जागरस्वप्नसु-

मजतें तोच स्वप्रकाश चिद्रूप आत्मा. ॥ ५८ ॥ या साक्षीवांचून बाकीचे प्राणापासून वित्तापर्यंत सर्व पदार्थ जितके जितके आत्म्याच्या जवळ जवळ असतील तितकी तितकी त्याविषयीं अधिक अधिक प्रीति असलेली दृष्टीस पडते. ॥ ५९ ॥ जसें द्रव्यापेक्षां मनुष्यास पुत्र प्रिय आहे. कारण पुत्राच्या जीवावरील धोका निवारण्यास द्रव्य खर्च करितो. पुत्रापेक्षांही आपला देह प्रिय आहे. कारण स्वदेह रक्षणाकरितां पुत्रादिकाला दुसऱ्यास दिल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. तसेंच इंद्रियांचा नाश होण्याचा प्रसंग आला ह्मणजे मनुष्य देहपीडा देखील सहन करितात. ह्मणून देहापेक्षांहीं इंद्रियें प्रिय ह्मटलीं पाहिजेत. आणि प्राणावर संकट आलें ह्मणजे ते वांचविण्याकरितां नाक डोळे गेले तरी फारशी परवा नसते. ह्मणून इंद्रियांपेक्षां प्राण प्रिय आहेत. याप्रमाणें उत्तरोत्तर एकांहून एक अधिक प्रिय असल्याचा अनुभव आबाल वृद्धांस आहे. आणि प्राणापेक्षांही आत्मा प्रिय आहे. हा अनुभव मात्र तत्त्ववेत्त्यासच आहे. ॥ ६० ॥ याप्रमाणें आत्मा अतिप्रिय आहे असें सिद्ध जाहलें. याविषयीं ज्ञानी आणि अज्ञानी यांमध्यें चाललेला वाद श्रुतींत सांगितला आहे. यावरूनही आत्म्याचें प्रियतमत्व ठरतें. ॥ ६१ ॥ तो वाद असा कीं, साक्षी हा यावत् दृश्य पदार्थांपेक्षां फार प्रिय आहे असें तत्त्ववेत्त्याचें ह्मणणें, आणि अज्ञानी असें ह्मणतो कीं, पुत्रादिकच प्रियतम आहेत आणि साक्षी हा केवळ त्यांचा भोक्ता आहे. ॥ ६२ ॥ आत्म्यावांचून दुसरे पदार्थ प्रिय आहेत असें ह्मणणारा मनुष्य एक शिष्य तरी असला पाहिजे किंवा प्रतिवादी तरी असला पाहिजे. ह्मणून त्याजवर तत्त्ववेत्त्यानें दिलेलें जें उत्तर तें शिष्यपक्षीं बोधपर आणि प्रतिवादीपक्षीं शापपर असें दोन प्रकारांनीं घेतलें पाहिजे. ॥ ६३ ॥ तें उत्तर असें कीं, "अरे हें प्रिय प्रिय ह्मणतोस पण हें तुला रडवील बरें" येथें आपण ज्याला प्रिय ह्मणतों त्यामध्यें रडविण्याचा दोष आहे असें शिष्य विवेकानें समजतो. आणि प्रतिवाद्याच्या वांटणीस शापच होतो. प्रिय ह्मणण्यामध्यें रडविण्याचा दोष आहे असें जें ह्मटलें त्या दोषाचा तो असा विचार करितो. ॥ ६४ ॥ उदाहरणार्थ पुत्रच घे ह्मणजे

---

धीनामागमापायभासनम् ॥ यतो भवत्यसावात्मा स्वप्रकाशचिदात्मकः ॥ ५८ ॥ शेषाः प्राणादिवित्तांता आसन्नास्तारतम्यतः ॥ प्रीतिस्तथातारतम्यात्तेषु सर्वेषु वीक्ष्यते ॥ ५९ ॥ वित्तात्पुत्रः प्रियः पुत्रात्पिंडः पिंडात्तथेंद्रियम् ॥ इंद्रियाच्च प्रियः प्राणः प्राणादात्मा प्रियः परः ॥६०॥ एवं स्थिते विवादोऽत्र प्रतिबुद्धविमूढयोः ॥ श्रुत्योदाहारि तत्रात्मा प्रेयानित्येव निर्णयः ॥ ६१ ॥ साक्ष्येव दृश्यादन्यस्मात्प्रेयानित्याह तत्त्ववित् ॥ प्रेयान्पुत्रादिरेवेमं भोक्तुं साक्षीति मूढधीः ॥ ६२ ॥ आत्मनोऽन्यं प्रियं ब्रूते शिष्यश्च प्रतिवाद्यपि॥ तस्योत्तरंवचोबोधशापौ कुर्यात्तयोः क्रमात् ॥ ६३ ॥ प्रियं त्वारोत्स्यतीत्येवमुत्तरं वक्तितत्त्ववित ॥ स्वोक्तप्रियस्य दुष्टत्वं शिष्यो वेत्ति विवेकतः॥ ६४ ॥अलभ्यमानस्तनयः पितरौ

झालें. हा पुत्र जो इतका प्रिय झाला आहे तो जन्मास येण्यापूर्वीपासूनच मनुष्यास कसें रडवितो तो झाला नाहीं तरी आईबापांस दुःख आहेच. बरें झाला तरी गर्भपाताची भीति. सुटला तर प्रसवाचें दुःख. ॥ ६५ ॥ त्यांतूनही सुटून उदराबाहेर आला तर ग्रहांची व पीडा व त्यांतूनही सुटून मोठा झाला तर खुळा होण्याची चिंता. बरें शाहणा झाला ाली, तरी त्यास विद्या कशी येईल ही चिंता आहेच. कदाचित् विद्या चांगली झाली चें लग्न कसें होईल ही चिंता. ॥ ६६ ॥ सुदैवेंकरून मुलगी चांग मिळून लग्नही री चिंता कोठें गेली. त्याला एकादें बाहेर छंदाचें व्यसन लागेल. बरें, सन नाहीं, तर ार होऊन त्यांचे पोटाची पंचाईत पडेल. तीही कदाचित् पंचाईत ली ह्मणा. संतति, , विद्या, सद्गुण इत्यादिक गोष्टी सर्व प्राप्त झाल्या तरी शेवटी याच्या मरणाविषयीं आहेच. याप्रमाणें आईबापांच्या दुःखास अंतच नाहीं. ७ ॥ असा विचार करून ांवरची प्रीति सोडून देऊन परम प्रीति कायती आत्म्या आहे असा निश्चय करून वस आत्म्याचेंच तो अनुसंधान करितो. ॥ ६८ ॥ र आह्मीं ह्मटलें आहे कीं, ही प्रीति रडवील असा तत्त्ववेत्त्यानें प्रतिवाद्यास शाप दिला तो असा कीं, आग्रहानें किंवा तत्त्ववेत्त्या द्वेष करून धरलेला पक्ष न सोडणाऱ्या प्रतिवादीला नरकप्राप्ति होईल व जन्मजन्मांतरीं होईल असें सांगितलें. ॥ ६९ ॥ खरेंच आहे कीं, ब्रह्मवेत्ता हा केवळ ब्रह्मच असल्या त्याला ईश्वरत्वही सहजच आलें. तो शिष्यास किंवा प्रतिवाद्यास शाप किंवा आशीर्वाद रूपा जें बोलेल तें तें खरेंच होईल यांत नवल तें काय ? ॥ ७० ॥ जो पुरुष साक्षी जो सर्वोत्तम प्रिय असा आत्मा त्याचें अनुसंधान करितो, त्याला तो अतिप्रिय. आहे आणि पुत्रादिकांप्रमाणें नाशही नाहीं. ॥ ७१ ॥ आत्मा परप्रेमास्पद आहे ह्मणून तो परमानंदरूप आहे. सार्वभौमादि पदांपासून हिरण्यगर्भापर्यंत जसजशी प्रीतीची वृद्धि होते

---

क्लेशयेच्चिरम् ॥ लब्धोपि गर्भपातेन प्रसवेन च बाधते ॥ ६५ ॥ जातस्याहरोगादिः कुमारस्य च मूर्खता ॥ उपनीतेप्यविद्यत्वमनुद्वाहः पंडिते ॥ ६६ ॥ यूनश्च परदारादि दारिद्र्यं च कुटुंबिनः ॥ पित्रोर्दुःखस्य नास्त्यंतो धनी चेन्म्रियते तदा ॥ ६७ ॥ एवं विमृश्य पुत्रादौ प्रीतिं त्यक्त्वा निजात्मनि ॥ निश्चित्य परमां प्रीतिं वीक्षते तमहर्निशम् ॥ ६८ ॥ आग्रहाद्ब्रह्मविद्वेषादपि पक्षममुंचतः ॥ वादिनो नरकः प्रोक्तो दोषश्च बहुयोनिषु ॥ ६९ ॥ ब्रह्मविद्ब्रह्मरूपत्वादीश्वरस्तेन वर्णितम् ॥ यद्यत्तत्तत्तथैव स्याच्छिष्यप्रतिवादिनोः ॥ ७० ॥ यस्तु साक्षिणमात्मानं सेवते प्रियमुत्तमम् ॥ तस्य प्रेयानसावात्मा न नश्यति कदाचन ॥ ७१ ॥ परप्रेमास्पदत्वेन परमानंदरूपता ॥ सुखवृद्धिः प्रीतिवृ-

तसतशी सुखाचीही वृद्धि होते, असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे. ॥ ७२ ॥ शिष्य–तुम्ही, ह्मणतां कीं आनंदरूपता हा आत्म्याचा स्वभावच आहे. पण चैतन्य जसें त्याचा स्वभाव ह्मणतां येईल, तसें सुख हा त्याचा स्वभावच ह्मणतां येत नाहीं. कारण तसें जर असतें तर सर्व बुद्धिवृत्तींच्या ठायीं चैतन्याप्रमाणें सुखाचीही व्याप्ति असती. पण तशी दृष्टीस पडत नाहीं हें कसें ? ॥ ७३ ॥ गुरु–याला तुला एक दृष्टांत देतों, ह्मणजे चांगलें समजेल. दिव्याचा स्वभाव दोन प्रकारचा. एक उष्णता आणि दुसरा प्रकाश. परंतु सर्व घरांत प्रकाशाची जशी व्याप्ति असते, तशी उष्णतेची नसते. म्हणून काय तेथें उष्णता नाहीं ह्मणतां येईल का ? त्याप्रमाणें बुद्धिवृत्तीच्याठायीं चैतन्याचीच व्याप्ति असून कोठें कोठें सुखाची असते. ॥ ७४ ॥ शिष्य–चैतन्य आणि आनंद या दोन्हींचा अभेद आहे तर चैतन्य प्रकाश करणारी जी व्याप्ति तीच आनंदालाही व्यक्त करील. गुरु–तसा कांहीं नियम नाहीं. कल्पना कर कीं, ज्यामध्यें गंध, रूप, रस, स्पर्श, असे चारीही गुण असलेला एक पदार्थ आहे, उदाहरणार्थ आंबाच कां असेनास. आतां या आंब्याचें ज्ञान होण्यास एकाच इंद्रियानें भागत नाहीं. तर त्याचा गंधादिक प्रत्येक गुण समजण्यास घ्राणादिक निराळीं इंद्रियेंच पाहिजेत. एक गुण दुसऱ्या इंद्रियानें घेतां येतच नाहीं. ॥ ७५ ॥ शिष्य–खरें, परंतु हा दृष्टांत बरोबर जुळत नाहींसें वाटतें. कारण गंधादिक गुणांमध्यें जसा परस्पर भेद आहे तसा चैतन्य आणि आनंद यांत मुळींच नाहीं. गुरु–चैतन्य आणि आनंद या दोन्हींचा अभेद जो तूं ह्मणतोस तो काय साक्षीच्या ठिकाणीं कीं दुसऱ्या ठिकाणीं तें सांग. ॥ ७६ ॥ साक्षीचे ठायीं जर ह्मणशील तर चैतन्य आणि आनंद यांचा जसा अभेद आहे तसा आंब्यामध्यें किंवा पुष्पामध्येंही गंधादि गुणांचा अभेदच आहे. आणि दुसऱ्या ठिकाणीं जर ह्मणशील तरी आमचा दृष्टांत तसाच जुळतो. इंद्रियें भिन्न भिन्न असल्यामुळें गंधादि गुणही भिन्न झाले. त्याप्रमाणें वृत्तिभेदानें चैतन्य आणि आनंद यांत भेद आला. ॥ ७७ ॥ शिष्य–मग चिदानंदाचें ऐक्य तरी कोठें दृष्टीस पडतें ? गुरु–बुद्धीची जी सात्विक वृत्ति तींत चिदानंदाचें ऐक्य स्पष्ट भासतें. कारण ती वृत्ति स्वच्छ आहे. परंतु राजस वृत्ति मलीन असल्यामुळें तिजमध्यें सुखांशाचा लोप होतो. ॥७८॥

---

द्धौ सार्वभौमादिषु श्रुता ॥ ७२ ॥ चैतन्यवत्सुखं चास्य स्वभावश्चेच्चिदात्मनः ॥धीवृत्तिष्वनुवर्तेत सर्वास्वपि चितिर्यथा ॥७३॥ मैवमुष्णप्रकाशात्मा दीपस्तस्य प्रभा गृहे ॥ व्याप्नोति नोष्णता तद्वच्चितेरेवानुवर्तनम् ॥ ७४ ॥ गंधरूपरसस्पर्शेष्वपि सत्सु यथा पृथक् ॥ एकाक्षेणैक एवार्थो गृह्यते नेतरस्तथा ॥ ७५ ॥ चिदानंदौ नैव भिन्नौ गंधाद्यास्तु विलक्षणाः ॥ इति चेत्तदभेदोपि साक्षिण्यन्यत्र वा वद ॥ ७६ ॥ आद्ये गंधादयोप्येवमभिन्नाः पुष्पवर्तिनः ॥ अक्षभेदेन तद्भेदे वृत्तिभेदात्तयोर्भिदा ॥ ७७ ॥ सत्त्ववृत्तौ चित्सुखैक्यं तद्वृत्तेर्निर्मलत्वतः ॥ रजोवृत्तेस्तु मालिन्या-

यास दृष्टांत. चिंचेमध्यें मीठ घातलें असतां त्याचा आंबटपणा जसा कमी होतो, त्याचप्रमाणें वृत्तीमध्यें रजोगुण मिळाल्यानें तिचा आनंद लोपून जातो. ॥ ७९ ॥ **शिष्य**–आत्मा प्रियतम असल्यामुळें तो परमानंदरूप आहे असें विचाराअंतीं ठरलें, परंतु योगावांचून काय होणार ? ॥ ८० ॥ **गुरु**–जें योगानें होतें तेंच योगावांचूनही होतें असें आम्ही म्हणतों. **शिष्य**–तुमचा अभिप्राय समजला नाहीं. **गुरु**–जें योगानें होतें तेंच योगावांचूनही होतें. अरे ज्ञानसिद्धीकरितां जसा आम्हीं मागील प्रकरणीं योग सांगितला तसें विवेकापासूनही ज्ञान होतें असें आम्ही म्हणतों. ॥ ८१ ॥ याविषयीं गीतेंत प्रमाणही आहे. जें स्थान सांख्यानें मिळतें, तेंच योगानेंही मिळतें. असें योगी आणि विवेकी या दोघांनाही ज्ञानद्वारा मोक्षरूपी फळ मिळतें ॥ ८२ ॥ **शिष्य**–दोन्हींही मार्गांचें फल एकच असल्यानंतर शास्त्रानें दोन मार्ग कां सांगितले ?, **गुरु**–कित्येकांना योग साध्य होतो, आणि कित्येकांस विवेक करणें सोपें वाटतें. अशा अभिप्रायानें भगवंतानें दोन मार्ग सांगितले. ॥ ८३ ॥ **शिष्य**–तथापि मला योग आणि विवेक दोन्ही भिन्न आहेत असें वाटतें ? **गुरु**–असें तुला कां वाटतें. दोघांला ज्ञान सारखेंच हें तर तूं कबूल करतोस ना ? **शिष्य**–पण योग्याला रागद्वेष मुळींच नसतात. **गुरु**–ते विवेक्यालाही नसतात. ॥ ८४ ॥ अरे ज्याला आत्माच सर्वांमध्यें प्रिय झाला त्याची प्रीति विषयावर कशी जाईल ? विषय अप्रिय झाल्यावर मग अर्थातच त्याला कोणचीही गोष्ट प्रतिकूल नाहीं. मग रागद्वेष तरी कोठून येणार ? ॥ ८५ ॥ **शि०**–विवेक्याला देहादिकांस ज्या प्रतिकूल वस्तू असतात त्यांविषयीं द्वेष असतो. **गु०**–तसा योग्यालाही असतो. **शि०**–तसा द्वेष करीत असतांना तो योगीच नव्हे. **गु०**–तशा वेळीं तो विवेकी नव्हे. ॥ ८६ ॥ **शि०**–पण तुमच्या विवेक्याला द्वैताचें भान असतें. **गु०**–भान असतें परंतु तें व्यवहारकालीं कीं विवेककालीं? **शि०**–व्यवहा-

---

त्सुखांशोऽत्र तिरस्कृतः ॥ ७८ ॥ तिंतिडीफलमत्यम्लं लवणेन युतं यदा ॥ तदाम्लस्य तिरस्कारादीषदम्लं यथा तथा ॥ ७९ ॥ तनुप्रियतमत्वेन परमानंदतात्मनि ॥ विवेक्तुं शक्यतामेवं विना योगेन किं भवेत् ॥८०॥ यद्योगेन तदेवेति वदामो ज्ञानसिद्धये ॥ योगः प्रोक्तो विवेकेन ज्ञानं किं नोपजायते ॥ ८१ ॥ यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ॥ इति स्मृतं फलैकत्वं योगिनां च विवेकिनाम् ॥ ८२ ॥ असाध्यः कस्य चिद्योगः कस्य चिज्ज्ञाननिश्चयः॥इत्थं विचार्य मार्गौ द्वौ जगाद परमेश्वरः॥८३॥ योगे कोऽतिशयस्तेऽत्र ज्ञानमुक्तं समं द्वयोः ॥ रागद्वेषाद्यभावश्च तुल्यो योगिविवेकिनोः ॥ ८४ ॥ न प्रीतिर्विषयेष्वस्ति प्रेयानात्मेति जानतः ॥ कुतो रागः कुतो द्वेषः प्रातिकूल्यमपश्यतः॥८५॥ देहादेः प्रतिकूलेषु द्वेषस्तुल्यो द्वयोरपि ॥ द्वेषं कुर्वन्न योगी चेदविवेक्यपि तादृशः ॥ ८६ ॥ द्वैतस्य प्रतिभानं तु व्यवहारे द्व-

रकालीं. गु०—तशा वेळीं योग्यालाही द्वैतभान आहे. शि०—पण समाधीमध्यें कुठें आहे? गु०—त्याप्रमाणें विवेक्यालाही विवेकदर्शनांत द्वैतदर्शन नाहीं. ॥ ८७ ॥ याचें प्रतिपादन पुढील प्रकरणीं ह्मणजे पुढील अद्वैतानंद नामक तिसऱ्या अध्यायांत आह्मी करूं. ॥ ८८ ॥ शि०—तुमच्या विवेक्याला जगाचें भान मुळींच नसून सर्वदां निजानंदच जर भासला तर तो योगीच ह्मटला पाहिजे, विवेकी कसला? गु०—तसें ह्मणतो कोण? आमच्या मतें योगी आणि विवेकी एकच. तें तुझ्या समजुतीस पक्कें यावें असें आमच्या मनांत होतें तसें झालें; आतां स्वस्थ ऐस. ॥ ८९ ॥ याप्रमाणें आह्मी ब्रह्मानंद प्रकरणाच्या या दुसऱ्या अध्यायीं मंदबुद्धीच्या लोकांकरितां आत्मानंदाचें विवेचन करून हें प्रकरण आटपतों. ॥ ९० ॥

---

योः समम् ॥ समाधौ नेति चेत्तद्वन्नाद्वैतत्वविवेकिन ॥ ८७ ॥ विवक्ष्यते तदस्माभिरद्वैतानंदनामके ॥ अध्याये हि तृतीयेऽतः सर्वमप्यतिमंगलम् ॥ ८८ ॥ सदापश्यन्निजानंदमपश्यन्निखिलं जगत् ॥ अर्थाद्योगीति चेत्तर्हि संतुष्टो वर्द्धतां भवान् ॥ ८९ ॥ ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे मंदानुग्रहसिद्धये ॥ द्वितीयाध्याय एतस्मिन्नात्मानंदो विवेचितः ॥९०॥ इति श्री० ब्रह्मानंदे आत्मानंदः ॥ १२ ॥

# सार्थपंचदश्याम्

## ब्रह्मानन्दे अद्वैतानन्दः ।

### त्रयोदशप्रकरणम्



या प्रकरणांत अद्वैतानंद ह्मणजे काय व तो विवेकापासून कसा प्राप्त होतो, तें येथें संवादरूपानें सांगतों. शि०-आपण ज्या आत्मानंदाचें विवेचन केलें, तो आणि योगानंद हे एकच ह्मणतां; परंतु मिथ्यात्मा व गौणात्मा असे त्यास प्रतियोगी असल्यामुळें सजातीयत्वादि भेद येऊं पाहतो. तेव्हां या द्वितीयानंदास ब्रह्मत्व कसें येईल. ॥ १ ॥ गु०-हा आत्मानंद अद्वितियच आहे. कारण तैत्तिरीय श्रुतीमध्यें " तस्माद्वा एतस्मात् आत्मन आकाशः " या वाक्यानें आकाशापासून आमचे देहापर्यंत सर्व जग आत्मानंदाहून निराळें नाहीं असें ठरतें. त्यावरून तो अद्वितीय ब्रह्मच ह्मटला पाहिजे. ॥ २ ॥ शि०-पण ती श्रुति आत्म्याविषयीं आहे आनंदाविषयीं नाहीं. गु०-अरे आत्मा आणि आनंद यांत कांहीं भेद नाहीं. आनंदाविषयींचेंच प्रमाण पाहिजे तर दुसरें आहे तें तुला सांगतों ह्मणजे झालें. श्रुतींत असेंही ह्मटलें आहे कीं, हें जग आनंदापासून झालें आहे, त्यांतच तें राहतें व त्यांतच तें लीन होतें. ह्मणून तें आनंदापासून भिन्न नाहीं. कारण कार्य हें कारणापासून भिन्न नसतें. ॥ ३ ॥ शि०-कारण कार्यापासून भिन्न नसतें असा जो आपण नियम केला, त्यास अपवाद आहे. कुलालापासून घट उत्पन्न होतो ह्मणून कुलाल हा त्याचें कारण झालें पण तो घटापासून भिन्न आहे काय? गु०-आमचा आनंद घटाचें उपादान कारण जसें माती, तसा जगाला उपदान कारण आहे. कुलाप्रमाणें निमित्त कारण नव्हे. ॥ ४ ॥ शि०-कुलालच कां उपादान कारण ह्मणूं नये. गु०-उपदान कारणाचें लक्षण हेंच कीं, तें स्थिति आणि लय या दोहोंस आधार असतें. घटाच्या स्थितिलयांस कुलाल आधार होत नसल्यामुळें उपादानाचें लक्षण त्यास लागू पडत नाहीं. परंतु घटाचे स्थितिलय मातींत होतात, ह्मणून माती हें उपादान कारण घटाचें होय. त्याचप्रमाणें जगाच्या स्थितिलयांस श्रुतींत सांगितल्याप्रमाणें आनंद हा आधार आहे ह्मणून तो जगाचा उपा-

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथाद्वैतानंदः ॥ योगानंदः पुरोक्तो यः स आत्मानंद इष्यताम् ॥ कथं ब्रह्मत्वमेतस्य सद्वयस्येति चेच्छृणु ॥ १ ॥ आकाशादिस्वदेहांतं तैत्तिरीयश्रुतीरितम् ॥ जगन्नास्त्यन्यदानंदादद्वैतब्रह्मता ततः ॥ २ ॥ आनंदादेव तज्जातं तिष्ठत्यानंद एव तत् ॥ आनंद एव लीनं चेत्युक्तानंदात्कथं पृथक् ॥ ३ ॥ कुलालाद्धट उत्पन्नो भिन्नश्चेति न शंक्यताम् ॥ मृद्वदेष उपादानं निमित्तं न कुलालवत् ॥ ४ ॥ स्थितिर्लयश्च कुंभस्य कुलाले स्तो

दान ह्मटला पाहिजे. ॥ ५॥ शि०—उपादान कारणाचें लक्षण समजलें. मग पुढें काय? गु०—हें उपादान कारण तीन प्रकारचें आहे. विवर्ति, परिणामि आणि आरंभक. यांपैकीं शेवटच्या दोन प्रकारांला निरवयव वस्तूंत अवकाशच मिळत नाहीं. ॥ ६ ॥ शि०—त्या तिन्ही प्रकारांचें विवरण कृपा करून सांगा. गु०—आरंभवाद्याचें मत असें आहे कीं एका कारणापासून निराळ्याच प्रकारचें कार्य उत्पन्न होतें. यास उदाहरण. तंतूपासून पट उत्पन्न होतो. येथें तंतु आणि पट भिन्न आहेत. ॥ ७ ॥ एका पदार्थाचें जें अवस्थांतर होतें, त्याला परिणाम ह्मणतात, दूध, दहीं, माती, घट, सुवर्ण, कुंडल. ॥८॥ आणि वस्तूची पूर्वावस्था न जातां अवस्थांतराचा जो भास होतो तोच विवर्त, जसा रज्जूवर सर्पाचा भास होतो. शि०—पण रज्जु सावयव आहे. गु०—हा विवर्त सावयवावर जसा घडतो, तसा निरवयवावरही घडतो. यास उदाहरण आकाशाचें. आकाशास वस्तुतः रंग कोणचाच नसून तें निळें दिसतें. ॥ ९ ॥ शि०—मग तुमच्या आनंदाला कोणचा प्रकार लागू पडतो? गु०—आनंदास विवर्त लागू पडतो. जसा रज्जूवर सर्प भासतो त्याप्रमाणें आनंदावर हें जग भासत आहे. शि०—तुमचा आनंद अद्वितीय आहे असें ह्मणतां. त्यावर जगाची कल्पना तरी कशी झाली? गु०—मायेमुळें झाली. जशी ऐंद्रजालिक शक्तीला गंधर्वनगरादिकांची कल्पना करितां येते, त्याप्रमाणें मायेमुळें जगाची कल्पना झाली. ॥ १० ॥ शि०—मायेमुळें जर जगाची कल्पना झाली, तर तुमच्या आनंदाखेरीज दुसरी माया ह्मणून एक आहेच, तेव्हां अर्थात् द्वैत आलें. गु०—ज्या पदार्थाचें अमुक निरूपणच करितां येत नाहीं, तो मिथ्याच ह्मटला पाहिजे. माया ही एक शक्ति आहे. ती जर आनंदापासून निराळी समजावी तर शक्त पदार्थापासून शक्ति मुळींच निराळी नाहीं, असा आमचा अनुभव आहे. बरें निराळी नाहीं ह्मणावी तर कांहीं कारणांनीं तिचा प्रतिबंध होतो. शक्ति जर निराळी नसेल तर प्रतिबंध कोणाला होईल. ह्मणून ती अनिर्वचनीय आहे. ॥ ११ ॥ शि०—शक्ति मुळीं अतींद्रिय पडली मग तिचा प्रतिबंध कसा ओळखावा ? गु०—शक्तीचें अ-

---

न हि क्व चित् ॥ दृष्टौ तौ मृदि तद्वत्स्यादुपादानं तयोः श्रुतेः ॥ ५ ॥ उपादानं त्रिधा भिन्नं विवर्ति परिणामि च ॥ आरंभकं च तत्रांत्यौ न निरंशेऽवकाशिनौ ॥ ६ ॥ आरंभवादिनोन्यस्मादन्यस्योत्पत्तिमूचिरे ॥ तंतोः पटस्य निष्पत्तेर्भिन्नौ तंतुपटौ खलु ॥ ७ ॥ आवस्थांतरतापत्तिरेकस्य परिणामिता ॥ स्यात्क्षीरं दधि मृत्कुंभः सुवर्णं कुंडलं यथा ॥ ८ ॥ अवस्थांतरभानं तु विवर्तो रज्जुसर्पवत् ॥ निरंशेप्यस्त्यसौ व्योम्नि तलमालिन्यकल्पनात् ॥९॥ ततो निरंश आनंदे विवर्तो जगदिष्यताम् ॥ मायाशक्तिः कल्पिका स्यादैंद्रजालिकशक्तिवत् ॥ १० ॥ शक्तिः शक्तात्पृथङ्नास्ति तद्वद्दृष्टेर्न चाभिदा॥प्रतिबंधस्य दृष्टत्वाच्छक्त्यभावे तु कस्य सः ॥ ११ ॥ शक्तेः कार्यानुमेयत्वादकार्ये प्रतिबंधनम् ॥ ज्वलं-

नुमान कार्यावरून करावयाचें. तें कार्य बंद झालें ह्मणजे प्रतिबंध झाला असें समजावें. यास उदाहरण अग्नीचें. अग्निशक्ति तिचें जें कार्य दाहकत्व त्यावरून समजावयाची. तें कार्य नाहीं-सें झालें ह्मणजे शक्तीस मंत्रादिकांचा प्रतिबंध झाला असें समजावें. ॥ १२ ॥ याप्रमाणें या-विषयीं उपनिषदांत प्रमाण आहे तें असें कीं, मोठमोठे मुनि परमात्म्याची शक्ति तिचे कार्या-मध्यें झांकली असें ध्यान करून पाहते झाले. दुसरे एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, ह्या परमा-त्मशक्तीचें स्वरूप क्रिया ज्ञान बलरूप आहे. ॥ १३ ॥ योगवासिष्ठांतही असेंच सांगितलें आहे. वसिष्ठ ह्मणतात हे रामा, हें परब्रह्म नित्य पूर्ण आद्वितीय असून सर्व शक्ति त्याच्याच आहेत. ॥ १४ ॥ त्या शक्तीच्या योगानें जेव्हां ब्रह्म प्रफुल्लित होतें, तेव्हां हें जग दिसूं लागतें. ती शक्ति जीवाचे ठायीं चेतनरूप आहे. ॥ १५ ॥ वायूंत चलनरूप आहे. दगडांत दार्ढ्यरूप आहे. उदकांत द्रवरूप आहे. अग्नींत दाहरूप आहे. ॥ १६ ॥ आकाशांत शून्य-रूप व विनाशी पदार्थांत नाशरूप आहे. ज्याप्रमाणें लहानशा अंड्यामध्यें महासर्प गुप्तरूपानें असतो किंवा एका लहनशा बीजामध्यें फलपुष्पशाखामूलयुक्त वृक्ष असतो, त्याप्रमाणें हें सर्व जग ब्रह्माचेठायीं मावलें आहे. ॥ १७ ॥ १८ ॥ पृथ्वीच्या ज्याप्रमाणें अमुकच देशांत अमु-क काळीं अमुकच प्रकारचीं धान्य फळें पिकतात, त्याप्रमाणें या ब्रह्मावर देशकालाप्रमाणें नि-रनिराळ्या शक्ति उत्पन्न होतात. ॥ १९ ॥ हे रामा, असा जो सर्वव्यापी आत्मा त्यापासून पूर्वी मनन शक्ति जी उत्पन्न झाली त्यास मन असें ह्मणतात. ॥ २० ॥ आदि मन झालें. त्यानंतर बंधमोक्षांची कल्पना; त्यानंतर त्रिभुवनात्मक प्रपंचरचना अशी ही जगस्थिति लहान

---

तोऽग्नेरदाहे स्यान्मंत्रादिप्रतिबंधता ॥१२॥ देवात्मशक्तिं स्वगुणैर्नि-गूढां मुनयोऽविदन् ॥ परास्य शक्तिर्विविधा क्रिया ज्ञानबलात्मि-का ॥ १३ ॥ इति वेदवचः प्राह वसिष्ठश्च तथाऽब्रवीत् ॥ सर्व-शक्ति परं ब्रह्म नित्यमापूर्णमद्वयम् ॥ १४ ॥ ययोल्लसति शक्त्या-सौ प्रकाशमधिगच्छति ॥ चिच्छक्तिर्ब्रह्मणो राम शरीरेषूपलभ्यते ॥ १५॥ स्पंदशक्तिश्च वातेषु दार्ढ्यशक्तिस्तथोपले॥ द्रवशक्तिस्त-थांभःसु दाहशक्तिस्तथानले ॥ १६॥ शून्यशक्तिस्तथाकाशे नाश-शक्तिर्विनाशिनि ॥ यथांडेंतर्महासर्पो जगदस्ति तथात्मनि॥१७॥ फलपत्रलतापुष्पशाखाविटपमूलवान् ॥ तनु बीजे यथा वृक्षस्त-थेदं ब्रह्मणि स्थितम् ॥ १८ ॥ क्व चित्काश्चित्कदाचिच्च तस्मा-दुद्यंति शक्तयः॥देशकालविचित्रत्वात्क्ष्मातलादिव शालयः ॥१९॥ स आत्मा सर्वगो राम नित्योदितमहावपुः ॥ यन्मनाङ्मननीं शक्तिं धत्ते तन्मन उच्यते ॥ २० ॥ आदौ मनस्तदनुबंधविमोक्ष-दृष्टिः पश्चात्प्रपंचरचना भुवनाभिधाना ॥ इत्यादिका स्थितिरियं

मुलांस सांगितलेल्या काहणीप्रमाणें खोटी असून खऱ्यामध्यें मोडूं लागली. ॥ २१ ॥ ती काहणी तुला सांगतों. एक दाई बाळाला त्याच्या विनोदाकरितां अशी एक काहणी सांगूं लागली कीं बाळा, तीन राजपुत्र होते. ॥ २२ ॥ त्यांपैकीं दोन मुळींच झाले नाहींत आणि तिसरा तर गर्भांतच नव्हता. ते धर्माचरणांत चांगले असून एका नसणाऱ्या शहरीं राहत होते. ॥ २३ ॥ ते एके दिवशीं आपल्या शून्य नगरांतून निरिच्छ मनानें बाहेर जात असतां आकाशामध्यें त्यांना फळांनीं भरलेले असे कांहीं वृक्ष दृष्टीस पडले. ॥ २४ ॥ तेथें पुढें होणाऱ्या नगरींत ते तीनही राजपुत्र आज शिकार करीत मौजेनें राहिले आहेत. ॥ २५ ॥ हे रामा, याप्रमाणें दायीनें सांगितलेली कथा ऐकून घेऊन अज्ञानामुळें ती खरी आहे असें बाळास वाटलें ॥२६॥ त्या काहणीप्रमाणें ही संसाररचनाही अविचारी लोकांस खरी वाटली आहे. ॥ २७ ॥ अशाच आणखी दुसऱ्या कथा सांगून वसिष्ठांनीं रामास मायाशक्तीचा विस्तार दर्शविला. तिचेंच निरूपण आतां आह्मी करितों. ॥ २८ ॥ ही मायाशक्ति जगद्रूप कार्यापासून आणि आश्रयरूप ब्रह्मापासून विलक्षण आहे. यास दृष्टांत अग्नीची शक्ति भाजून आलेल्या प्रत्यक्ष फोडापासून व प्रत्यक्ष निखाऱ्यापासून भिन्न आहे असें अनुमान होतें. ॥ २९ ॥ दुसरें उदाहरण घटाचें. मोठा आणि वाटोळ्या आकाराचा जो घट तद्रूप कार्य प्रत्यक्ष असतें, आणि शब्दादि पांच गुणांनीं युक्त मृत्तिका ही प्रत्यक्षच आहे. परंतु ज्या शक्तीनें हा घट झाला ती शक्ति दोहोंहून निराळीच आहे. ॥ ३० ॥ पृथ्वादिक जो घटाचा आकार तोही ती नव्हे, आणि शब्दादि गुण-

---

हि गता प्रतिष्ठामाख्यायिका सुभगबालजनोदितेव ॥ २१ ॥ बालस्य हि विनोदाय धात्री वक्ति शुभां कथाम् ॥ क्वचित्संति महाबाहो राजपुत्रास्त्रयः शुभाः ॥ २२ ॥ द्वौ न जातौ तथैकस्तु गर्भ एव न च स्थितः ॥ वसंति ते धर्मयुक्ता अत्यंतासति पत्तने ॥ २३॥ स्वकीयाच्छून्यनगरान्निर्गत्य विमलाशयाः ॥ गच्छंतो गगने वृक्षान् ददृशुः फलशालिनः ॥ २४ ॥ भविष्यन्नगरे तत्र राजपुत्रास्त्रयोऽपि ते॥सुखमद्य स्थिताः पुत्र मृगयाव्यवहारिणः॥२५॥ धात्र्येति कथिता राम बालकाख्यायिका शुभा॥ निश्चयं स ययौ बालो निर्विचारणया धिया ॥ २६ ॥ इयं संसाररचना विचारोज्झितचेतसाम् ॥ बालकाख्यायिकेवेत्थमवस्थितिमुपागता ॥२७॥ इत्यादिभिरुपाख्यानैर्मायाशक्तेश्च विस्तरम् ॥ वसिष्ठः कथयामास सैव शक्तिर्निरूप्यते ॥ २८ ॥ कार्यादाश्रयतश्चैषा भवेच्छक्तिर्विलक्षणा ॥ स्फोटांगारौ दृश्यमानौ शक्तिस्तत्रानुमीयते ॥२९ ॥पृथुबुध्नोदराकारो घटः कार्योऽत्र मृत्तिका ॥शब्दादिभिः पंचगुणैर्युक्ता शक्तिस्त्वतद्विधा ॥ ३० ॥ न पृथ्वादिर्न शब्दादिः शक्ताव-

युक्त मृत्तिका जी घटाचा आश्रय तीही ती नव्हे; ह्मणून ती कशी आहे हें सांगतां येत नाहीं. याकरितां ती अचिंत्य असून अनिर्वचनीय आहे. ॥ ३१ ॥ ही शक्ति घटरूप कार्य होण्यापूर्वीं मृत्तिकेमध्यें गुप्त असते. मग पुढें कुंभार, त्याचें चक्र, इत्यादिकांच्या साहाय्यानें आकाराप्रत पावते. ॥ ३२ ॥ शिष्य कारणापासून शक्तीचें कार्य अगदीं निराळें असून तो कार्यकारणभेद लोकांस कां समजत नाहीं ? गु०—मोठा आणि वाटोळा असा आकार आणि स्पर्शादि गुणांनीं युक्त मृत्तिका, हे दोन्हीही एकवट करून अविवेकी लोक त्यास घट असें ह्मणतात. ॥ ३३ ॥ शि०-ते अविवेकी कसे ? गु०-अविवेकी नव्हे तर काय ? कुंभाराचा हात लागण्यापूर्वी जो मृत्तिकेचा अंश तोच हात लागल्यानंतरही असतो, असें असून केवळ मोठ्या वाटोळ्या पोटाचा जो आकार त्याला घट ह्मणणें हें अज्ञान नव्हे काय ? पूर्वीं घट नसून एकाएकीं मागून कोठून आला ? ॥ ३४ ॥ शि०-घट प्रत्यक्ष खरा असून तो खोटा कसा ह्मणावा ? गु०-खोटा नव्हे तर काय ? मृत्तिकेपासून तो जर भिन्न केला, तर मुळींच दिसत नाहीं; ह्मणून मृत्तिकेहून निराळा नाहीं. बरें मृत्तिकाच घट ह्मणावी, तर पूर्वील पिंडदशेंत तो मुळींच दिसत नाहीं ॥ ३५ ॥ याकरितां शक्तीप्रमाणें हा घटही अनिर्वचनीयच आहे. तो शक्तीचें कार्य आहे. घटाच्या अव्यक्त स्थितीला शक्ति ह्मणतात, आणि व्यक्त स्थितीला घट असें ह्मणतात. ॥ ३६ ॥ लोकांमध्यें जी ऐंद्रजालिक माया दृष्टीस पडते, तीही पूर्वीं दृष्टीस पडत नाहीं. मणीमंत्राचा प्रयोग झाल्यानंतर गंधर्वसेनादिरूपानें ती स्पष्ट होते. ॥ ३७ ॥ याप्रमाणें छांदोग्यश्रुतींत " वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यं " या वाक्यानें विकाराला मायामयत्वामुळें श्रुतीनें खोटेपणा दिला, आणि विकाराला आधारभूत जी मृत्तिका ती खरी आहे असें सांगितलें ॥ ३८ ॥ वाणीनें उच्चार केलेला घट हा शब्द केवळ नाममात्र आहे. या नां-

---

स्तु यथा तथा ॥ अत एव ह्यचिंत्यैषा न निर्वचनमर्हति ॥ ३१॥ कार्योत्पत्तेः पुरा शक्तिर्निगूढा मृद्यवस्थिता ॥ कुलालादिसहाय्येन विकाराकारतां व्रजेत् ॥३२॥ पृथुत्वादिविकारांतं स्पर्शादिं चापि मृत्तिकाम् ॥ एकीकृत्य घटं प्राहुर्विचारविकला जनाः ॥ ३३ ॥ कुलालव्यापृतेः पूर्वो यावानंशः स नो घटः ॥ पश्चात्तु पथुबुध्नादिमत्वे युक्ता हि कुंभता ॥ ३४ ॥ स घटो न मृदो भिन्नो वियोगे सत्यमीक्षणात् ॥ नाप्यभिन्नः पुरा पिंडदशायामनवेक्षणात् ॥ ३५ ॥ अतोऽनिर्वचनीयोऽयं शक्तिवत्तेन शक्तिजः ॥ अव्यक्तत्वे शक्तिरुक्ता व्यक्तत्वे घटनामभृत् ॥ ३६ ॥ ऐंद्रजालिकनिष्ठापि माया न व्यज्यते पुरा ॥ पश्चाद्गंधर्वसेनादिरूपेण व्यक्तिमाप्नुयात् ॥ ३७ ॥ एवं मायामयत्वेन विकारस्यानृतात्मताम् ॥ विकाराधारमृद्वस्तु सत्यत्वं चाब्रवीच्छ्रुतिः ॥३८॥ वाङ्निष्पाद्यं ना-

वांचून खरें स्वरूप कोणचेंच नाहीं; ह्मणून घट असत्य झाला. परंतु स्पर्शादि गुणांनीं युक्त अशी जी केवळ मृत्तिका ती मात्र सत्य आहे ॥ ३९ ॥ कारण शक्ति, तिचें कार्य घट आणि त्यास आधारभूत मृत्तिका या तिहींमध्यें पूर्वींचीं दोन एकदां असणारीं व एकदां नसणारीं अशीं कालभेदास पात्र आहेत. आणि तिसरी जी मृत्तिका ती कालत्रयींही नाश पावत नस-ल्यामुळें सत्य आहे ॥ ४० ॥ शि०—मग एकून घट खोटाच तर ? गु०—यांत संशय काय? जो पदार्थ स्वतः निस्तत्त्व असून व्यक्त झाल्यावर मात्र भासणारा, ज्याला उत्पत्ति व नाश आहेत व ज्याला कांहीं एका नांवानें ओळखावयाचा, असा जो घट त्याला सत्य कोण ह्मणेल? ॥ ४१ ॥ घट शब्दानें घटाचा व्यवहार असल्यामुळें घटाचें स्वरूप शब्दात्मकच आहे. कारण व्यक्त कार्य नष्ट झाल्यावरही घट हें नांव मनुष्याचे तोंडांत तसेंच असतें ॥ ४२ ॥ घटरूप कार्य निस्तत्त्व आहे, नाशवंत आहे आणि केवळ शब्दात्मक आहे. ह्मणून हें घटाचें स्वरूप मृत्तिकेप्रमाणें सत्य ह्मणतां येत नाहीं. ॥ ४३ ॥ शि०—मग मृत्तिकेमध्यें तरी सत्यत्वाचे गुण कुठे आहेत ? गु०—खऱ्याचें लक्षण ह्मणजे हेंच कीं, त्यांत कांहीं तत्त्व असून कालत्रयीं-ही त्याचा नाश होऊं नये. माती तशीच आहे. घट व्यक्त असतांनाही तीच आहे, घटापूर्वी-ही तीच आहे आणि घट फुटल्यानंतरही तचि आहे. ह्मणून ती येथें सत्यच ह्मटली पाहिजे. ॥ ४४ ॥ शि०—व्यक्त, घट आणि विकार या तीन शब्दांनीं दर्शविलेला जो घटपदार्थ, तो जर खोटा तुह्मी म्हणतां, तर शुक्तिकाज्ञानानें जसें रजत नाहींसें होतें, तसा मृत्तिकेच्या ज्ञा-नानें तोही कां नष्ट होत नाहीं ? गु०—अरे, ज्या अर्थी घटाविषयींची सत्यत्वबुद्धि नष्ट झाली त्या अर्थी तो घट नष्ट झाला असेंच समजलें पाहिजे. ॥ ४५ ॥ शिष्य—पण शुक्तिज्ञानानें रजत अगदचि नाहींसें होतें. गु०—त्याचें कारण हेंच कीं, तो रजतभ्रम निरुपाधिक आहे;परंतु येथें तसें नाहीं, येथील भ्रम सोपाधिक आहे. ह्मणून अधिष्ठानज्ञानापासून होणारी जी निवृत्ति

---

.ममातं विकारो नास्य सत्यता ॥ स्पर्शादिगुणयुक्ता तु सत्या के-वलमृत्तिका ॥३९॥ व्यक्ताव्यक्ते तदाधार इति त्रिष्वाद्ययोर्द्वयोः॥ पर्यायः कालभेदेन तृतीयस्त्वनुगच्छति ॥ ४० ॥ निस्तत्त्वं भास-मानं च व्यक्तमुत्पत्तिनाशभाक्॥तदुत्पत्तौ तस्य नाम वाचा नि-ष्पाद्यते नृभिः ॥ ४१ ॥ व्यक्ते नष्टेऽपि नामैतन्नृवक्त्रेष्वनुवर्तते ॥ तेन नाम्ना निरूप्यत्वाद्व्यक्तं तद्रूपमुच्यते ॥४२॥ निस्तत्त्वत्वा-द्विनाशित्वाद्वाचारंभणनामतः ॥ व्यक्तस्य न तु तद्रूपं सत्यं किं-चिन्मृदादिवत् ॥ ४३ ॥ व्यक्तकाले ततः पूर्वमूर्ध्वमप्येकरूपभा-क् ॥ सतत्त्वमविनाशं च सत्यं मृद्वस्तु कथ्यते ॥ ४४ ॥ व्यक्तं घटो विकारश्चेत्येतैर्नामभिरीरितः॥ अर्थश्चेदनृतः कस्मान्न मृद्बोधे निवर्तते ॥ ४५ ॥ निवृत्त एव यस्मात्ते तत्सत्यत्वमतिर्गता ॥ ईदृ-

तिचा अर्थ त्या वस्तूचें आभान असें समजूं नये. ती खोटी आहे असें समजलें ह्मणजे झालें. ॥ ४६ ॥ शि०—हें मला तुमचें ह्मणणें नीट समजलें नाहीं. गु०—याविषयीं तुला एक दृष्टांत देतों ह्मणजे समजेल. कल्पना कर कीं, नदीतीरीं एक मनुष्य उभा असून त्याचें अधोमुख प्रतिबिंब आंत पडलें आहे, तें जरी डोळ्याला दिसलें तरी त्या उभ्या असलेल्या मनुष्याप्रमाणें पाण्यांत दिसलेल्या मनुष्याविषयीं कोणाला कधीं तरी खरेपणा वाटेल काय ? ॥४७॥ शि०—होय, मग एवढ्या ज्ञानानें पुरुषार्थसिद्धि झाली काय ? गु०—आमच्या अद्वैतवाद्यांचें मत असेंच आहे. अशा प्रकारच्या ज्ञानानेंच मोक्षप्राप्ति होते. शि०—पण मृत्तिकेवर घट हा केवळ भासमात्र आहे असें जर मानलें तर तिच्या ज्ञानानें घटाविषयींची सत्यत्वबुद्धि नाहींशी व्हावी ती कोठें होते ? गु०—घटांतील माती वजा केली असतां घटाचें स्वरूप काय राहिलें सांग. अशा विचारानें तो खोटा ठरतो ॥ ४८ ॥ शि०—पण घट हा विवर्ताचें उदाहरण नाहीं. तें परिणामाचें आहे. गु०—तें परिणामाचें नव्हे. कारण, परिणामांत पूर्वरूप जाऊन दुसरें रूप येतें. जसें दुधाचें दहीं. परंतु कुंडलाची व सुवर्णाची गोष्ट तशी नाहीं. कुंडलांतील सुवर्ण व घटांतील माती यांचें रूपांतर होत नाहीं. ॥ ४९ ॥ शि०—पण घट फुटला असतां माती कोठें दिसते ? केवळ खापऱ्या मात्र दिसतात. गु०—नुत्या फोडण्यानें जरी माती दिसली नाहीं तरी पूड केली असतां ती दिसते. कुंडलाविषयीं तर सांगावयास नको, सुवर्ण त्यांत स्पष्ट आहेच. ॥ ५० ॥ शि०—तुह्मीं परिणामाविषयीं दूध, दहीं, मृत्तिका, घट आणि सुवर्णकुंडलें असे तीन दृष्टांत दिलेत, त्यांपैकीं घट आणि कुंडलें यांस जर विवर्तवाद लागू होतो, तर तो दूध, दह्यासही कां लागूं पडूं नये ? गु०—दह्यास पुनः दुधाचें स्वरूप येत नाहीं, तशी घट कुंडलाची गोष्ट नाहीं. कारण त्यांना पुनः पूर्वरूप येतें. यावरून आह्मीं जे दृष्टांत दिले ते बरोबर आहेत ॥ ५१ ॥ शि०—मृत्तिका आणि सुवर्ण यांस जसे परिणाम आणि विवर्त लागूं पडतात तसा आरंभवादही कां न लागूं पडावा ? गु०—आरंभवाद्यांचें मत असें आहे कीं, कार्याचे आणि कारणाचे स्पर्शादि गुण अगदीं पृथक् असतात; पण तसें द्वैगुण्य मृत्तिकेचे ठायीं दिसत नाहीं. ॥ ५२ ॥ वेदांमध्यें उद्दालकऋषींनीं विवर्ताविषयीं मृत्तिका, सुवर्ण आणि लोखंड असे तीन

---

ङ्निवृत्तिरेवात्र बोधजानत्वभासनम् ॥ ४६ ॥ पुमानधोमुखो नीरे भातोप्यस्ति न वस्तुतः ॥ तटस्थमर्त्यवत्तस्मिन्नैवास्था कस्यचित्क्वचित् ॥ ४७ ॥ ईदृग्बोधे पुमर्थत्वं मतमद्वैतवादिनाम् ॥ मृद्रूपस्य परित्यागाद्विवर्तत्वं घटे स्थितम् ॥ ४८ ॥ परिणामे पूर्वरूपं त्यजेत्तत्क्षीररूपवत् ॥ मृत्सुवर्णे निवर्तेते घटकुंडलयोर्न हि॥४९॥ घटे भग्ने न मद्भावः कपालानामवेक्षणात् ॥ मैवं चूर्णेस्ति मृद्रूपं स्वर्णरूपं त्वतिस्फुटम् ॥ ५० ॥ क्षीरादौ परिणामोऽस्तु पुनस्तद्भाववर्जनात् ॥ एतावता मृदादीनां दृष्टांतत्वं न हीयते॥५१॥ आरंभवादिनः कार्ये मृदो द्वैगुण्यमापतेत् ॥ रूपस्पर्शादयः प्रोक्ता कार्यकारणयोः पृथक् ॥ ५२ ॥ मृत्सुवर्णमयश्चेति दृष्टांतत्रयमारु-

दृष्टांत दिले आहेत, त्यावरून कार्य खोटें आहे असा सिद्धांत होतो. तोच सर्व चराचर वस्तूंचे ठायीं लावून चांगला ठसवावा ॥ ५३ ॥ शि०—कार्याचा खोटेपणा ठसवावा असें तरी कां सांगितलें ? गु०—कारणाचें ज्ञान झालें ह्मणजे कार्याचेंही ज्ञान होतें. शि०—कारण हें सत्य आहे आणि कार्य हें मिथ्या असें असून सत्याच्या ज्ञानानें मिथ्या ज्ञान होतें. असें ह्मणण्यांत विरोध नाहीं काय? ॥५४॥ गु०—विचारदृष्टीनें पाहशील तर विरोध मुळींच नाहीं. मृत्तिकेसहित जो घटरूप विकार त्याला कार्य असें लोक ह्मणतात. या कार्यांत एक सत्यांश आहे आणि एक असत्यांश आहे. येथें मृत्तिका सत्यांश आहे, त्या अंशाचें ज्ञानकारण ज्ञानानें होतें. मग विरोध कसचा ? ॥ ५५ ॥ शि०—सत्यांश जसा समजतो तसा मिथ्यांशही समजेल. गु०—मिथ्यांशाचा मुळींच उपयोग नसल्यामुळें तो समजण्यास योग्य नाहीं. खऱ्या तत्त्वाचें जें ज्ञान तोच पुरुषार्थ असत्यांश जाणून फळ काय ॥ ५६ ॥ शि०—तर कारणज्ञानापासून कार्यज्ञान होतें असें ह्मणणें ह्मणजे मृत्तिकाज्ञानापासून मृत्तिकाज्ञान होतें असें ह्मटल्याप्रमाणें आहे. यांत अधिक काय सांगितल्यासारखें झालें ? ॥ ५७ ॥ गु०—खरें, नवल नाहींच; पण तें कोणाला नाहीं ? कार्याचे ठायीं जो सत्यांश आहे, तो कारणस्वरूपीच आहे असें ज्यांना समजलें, त्यांना कांहीं नवल नाहीं; पण अज्ञान्यांचें नवल कोठें जाईल ? ॥ ५८ ॥ कारणापासून कार्य भिन्न मानणारे जे आरंभवादी, पूर्वरूपाचा त्याग होऊन रूपांतर होतें असें मानणारे जे परिणामवादी आणि शास्त्र न जाणणारे सर्व लोक यांना कारणज्ञानापासून कार्यज्ञान होतें असें ऐकून विस्मय झालाच पाहिजे. ॥ ५९ ॥ शि० एका कारणाच्या ज्ञानानें अनेक कार्यांचें ज्ञान होतें असा श्रुतीनें सांगितलेला अर्थ एकीकडे ठवून एवढ्या लांबलचक व्याख्यानाचें कारण काय ? गु०—श्रुतीचें अद्वैतपर तात्पर्य लोकांस समजत नाहीं ह्मणून व्याख्यान केलें पाहिजे. अद्वैतमताचें ज्ञान शिष्यास व्हावें ह्मणन छांदोग्य श्रुतींत कारणाच्या ज्ञानानें कार्याचें ज्ञान

---

णिः ॥ प्राहातो वासयेत्कार्यानृतत्वं सर्ववस्तुषु ॥ ५३ ॥ कारणज्ञानतः कार्यविज्ञानं चापि सो वदत् ॥ सत्यज्ञानेऽनृतज्ञानं कथमत्रोपपद्यते ॥ ५४ ॥ समृत्कस्य विकारस्य कार्यता लोकदृष्टितः॥ वास्तवोऽत्र मृदंशोस्य बोधः कारणबोधतः ॥५५ ॥ अनृतांशो न बोद्धव्यस्तद्बोधानुपयोगतः ॥ तत्त्वज्ञानं पुमर्थं स्यान्नानृतांशावबोधनम् ॥५६॥ तर्हि कारणविज्ञानात्कार्यज्ञानमितीरिते ॥ मृद्बोधान्मृत्तिकाबुद्धेत्युक्तं स्यात्कोऽत्र विस्मयः ॥ ५७ ॥ सत्यं कार्येषु वस्त्वंशः कारणात्मेति जानतः॥विस्मयो मास्त्विहाज्ञस्य विस्मयः केन वार्यते ॥ ५८ ॥ आरंभी परिणामी च लौकिकश्चैककारणे॥ ज्ञाते सर्वमतिं श्रुत्वा प्राप्नुवंत्येव विस्मयम् ॥५९॥ अद्वैतेऽभिमुखीकर्तुमेवात्रैकस्य बोधतः॥सर्वबोधः श्रुतौ नैव नानात्वस्य वि-

होतें असें सांगितलें. अनेक कार्यांचें ज्ञान व्हावें हा कांहीं तिचा हेतु नाहीं. ॥ ६० ॥ ज्याप्रमाणें मातीच्या पिंडाचें ज्ञान झाल्यावांचून कोणच्याही मृन्मय पदार्थांचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्म पाहिल्यावांचून जग दिसतच नाहीं. ॥ ६१ ॥ शि०—ब्रह्मज्ञानापासून जगाचें ज्ञान होतें असा सिद्धांत करण्यापूर्वीं ब्रह्माचें व जगाचें स्वरूप समजलें पाहिजे. त्यावांचून तसा सिद्धांत कसा करितां येईल ? गु०—त्याचें स्वरूप तापनीय श्रुतींत वर्णिलें आहे. ब्रह्म हें सच्चिदानंदरूप आहे आणि जगत् नामरूपात्मक आहे. ॥ ६२ ॥ आरुणीनें तद्रूपाचें वर्णन केलें. बह्वृच यांनीं प्रज्ञानं ब्रह्म या वाक्यानें चिद्रूपाचें वर्णन केलें आहे आणि सनत्कुमारांनीं आनंदरूपाचें वर्णन केलें, असेंच अन्य ठिकाणीं पहावें. ॥ ६३ ॥ तसेंच जगाचें नामरूपस्वरूपही श्रुतींत वर्णिलें आहे. " सर्व रूपांचें चिंतन करून त्यांस नांवें ठेवून ईश्वर जगांत रहातो. " अशा अर्थाची व " नामरूपें मींच केलीं आहेत " अशा अर्थाची श्रुति आहे.॥६४॥ सृष्टीच्या पूर्वीं जें अव्याकृत ह्मणजे अव्यक्तरूप होतें तेंच सृष्टीनंतर दोन प्रकारांनीं व्यक्त झालें. ही जी अव्याकृत नांवाची अचिंत्य ब्रह्मशक्ति, तीच माया. ॥ ६५ ॥ क्रियारहित जें ब्रह्म त्याचेठायीं असणारी शक्ति जी अनेक प्रकारें विकार पावते, त्या शक्तीस माया ह्मणतात. तीच मूळ प्रकृति आणि ती ज्याच्या हातीं आहे तो महेश्वर. ॥ ६६ ॥ या मायोपाधिक ब्रह्माचा पहिला विकार आकाश आहे तो अस्ति, भाति आणि प्रिय असा आहे. अवकाश हें त्याचें रूप आहे. तें मिथ्या आहे; पण पूर्वींचीं तीन रूपें सत्य आहेत. ॥ ६७ ॥ शि०—अवकाशरूपाला मिथ्यात्व कसें येतें ? गु०—अवकाश व्यक्त होण्यापूर्वीं तो नव्हता, व पुढेंही नाहींसा होतो. ज्यास शेंडाबुडखा नसून मध्येंच कांहीं भासतें तेंही तसेंच मिथ्या समजलें पाहिजे ॥ ६८ ॥ यास गीतावाक्य प्रमाण. कृष्णानें अर्जुनास असें सांगितलें आहे कीं, हीं भूतें

---

वक्षया ॥ ६० ॥ एकमृत्पिंडविज्ञानात्सर्वमृन्मयधीर्यथा ॥ तथैक ब्रह्मबोधेन जगद्बुद्धिर्विभाव्यताम् ॥ ६१ ॥ सच्चित्सुखात्मकं ब्रह्म- नामरूपात्मकं जगत् ॥ तापनीये श्रुतं ब्रह्म सच्चिदानंदलक्षणम् ॥ ६२ ॥ सद्रूपमारुणिः प्राह प्रज्ञानं ब्रह्म बह्वृचः ॥ सनत्कुमार आनंदमेवमन्यत्र गम्यताम् ॥ ६३ ॥ विचिंत्य सर्वरूपाणि कृत्वा नामानि तिष्ठति ॥ अहं व्याकरवाणीमे नामरूपे इति श्रुतेः ॥६४॥ अव्याकृतं पुरा सृष्टेरूर्ध्वं व्याक्रियते द्विधा ॥ अचिंत्यशक्तिर्मायैषा ब्रह्मण्यव्याकृताभिधा ॥ ६५ ॥ अविक्रिय ब्रह्मनिष्ठा विकारं यात्यनेकधा ॥ मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥६६॥ आद्यो विकार आकाशः सोऽस्ति भात्यपि च प्रियः ॥ अवकाशस्तस्य रूपं तन्मिथ्या न तु तत्त्रयम् ॥ ६७ ॥ न व्यक्तेः पूर्वमस्त्येव न पश्चाच्चापि नाशतः ॥ आदावंते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा ॥ ६८॥ अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भा-

जीं दिसत आहेत तीं पूर्वींच अव्यक्त होतीं. शेवटींही अव्यक्तच होतात. तीं केवळ मध्यें मात्र व्यक्त आहेत. ॥ ६९ ॥ शि०—अवकाशांत सच्चिदानंद खरे आहेत असें तुह्मी ह्मणतां याला प्रमाण काय? गु०—घटामध्यें मृत्तिका जशी कालत्रयीं असते तसें आकाशामध्यें सच्चिदानंदरूप एकसारखें आहे. ॥ ७० ॥ शि०—आकाश वेगळें करून तें सच्चिदानंदरूप पहावें कोठें? गु०—निराकाश जें तुझें स्वरूप तें पहा ह्मणजे झालें. कारण आकाशाचेंही विस्मरण झालें असतां काय भासतें तें तूंच सांग. शि०—शून्य भासतें. गु०—तें तरी भासतेंना? जर भासतें तर तें शून्य कसें? ॥ ७१ ॥ ज्या अर्थीं भासतें त्या अर्थीं तें आहे ह्मटलें पाहिजे. आणि तें तत्त्व उदासीन असल्यामुळें तें सुखरूप आहे असें सिद्ध होतें. शिं०—सुखाला अनुकूलत्व पाहिजे आणि तें तर उदासीन आहे ह्मणतां, तेव्हां सुख कसें ह्मणतां येईल? गु०—तें सुखच आहे. कारण खऱ्या सुखाचें लक्षण असें आहे कीं, जेथें आनुकूल्यही नाहीं आणि प्रातिकूल्यही नाहीं तें खरें सुख. ॥ ७२ ॥ अनुकूल गोष्ट झाली ह्मणजे सुखरूप बुद्धि होते, आणि प्रतिकूल झाली ह्मणजे दुःखरूप बुद्धि होते. हीं दोन्हींही नसतांना जी स्थिति तोच निजानंद. शि०—तर मग त्या स्थितीला निजदुःख कां ह्मणूं नये? गु०—दुःखाला निजरूपत्व आलेलें असें आह्मी कोठेंच ऐकलें नाहीं. ॥ ७३ ॥ शि०—निजानंद एकसारखा आहे असें जर तुह्मी म्हणतां तर एकदां हर्ष, आणि एकदां शोक कां होतो? गु०—हर्ष, शोक मनाचे आहेत आणि मन तर क्षणिक आहे; म्हणून हर्षशोकांलाही क्षणिकत्व आलें. ॥ ७४ ॥ याकरितां आकाशाचेठायीं आनंद आहे असें सिद्ध झालें. सत्ता आणि भान हीं तर तूं कबूलच करितोस. याचप्रमाणें वायूपासून देहापर्यंत सर्व वस्तूंमध्यें आनंदाची व्याप्ति सिद्ध होते. ॥ ७५ ॥ वायूचीं रूपें दोन गति आणि स्पर्श. दाह आणि प्रकाश हें अग्नीचें रूप. जलाचें द्रवत्व आणि भूमीचें काठिन्य ॥७६॥ याच-

---

रत ॥ अव्यक्तनिधनान्येवेत्याह कृष्णोऽर्जुनं प्रति ॥ ६९ ॥ मृद्वत्ते सच्चिदानंदा अनुगच्छंति सर्वदा ॥ निराकाशे सदादीनामनुभूतिर्निजात्मनि ॥ ७० ॥ अवकाशे विस्मृतेऽथ तत्र किं भाति ते वद ॥ शून्यमेवेति चेदस्तु नाम तादृग्विभाति हि ॥ ७१ ॥ तादृक्त्वादेव तत्सत्त्वमौदासीन्येन तत्सुखम् ॥ आनुकूल्यप्रातिकूल्यहीनं यत्तन्निजं सुखम् ॥ ७२ ॥ आनुकूल्ये हर्षधीः स्यात्प्रातिकूल्ये तु दुःखधीः ॥ द्वयाभावे निजानंदो निजदुःखं न तु क्वचित् ॥ ७३ ॥ निजानंदे स्थिरे हर्षशोकयोर्व्यत्ययः क्षणात् ॥ मनसः क्षणिकत्वेन तयोर्मानसतेष्यताम् ॥ ७४ ॥ आकाशेऽप्येवमानंदः सत्ताभाने तु संमते ॥ वाय्वादिदेहपर्यंतं वस्तुष्वेवं विभाव्यताम् ॥७५॥ गतिस्पर्शौ वायुरूपं वन्हेर्दाहप्रकाशनं ॥ जलस्य द्रवता भूमेः काठिन्यं चेति निर्णयः ॥ ७६ ॥ असाधारण आकार

प्रमाणें सर्व आकार वनस्पति शरीरें यांचीं रूपें मनानें पृथक् पृथक् समजावयाचीं. ॥ ७७ ॥ याचप्रमाणें नामरूपें एकमेकांपासून जरी भिन्न झालीं तरी त्यांत सच्चिदानंद-रूप एकच आहे यांत संशय नाहीं. ॥ ७८ ॥ शिष्य—तर मग नामरूपें जीं भासतात त्यांची व्यवस्था कशी ? गु०—भासेनात बापुडीं. त्यांस जन्मनाश असल्यामुळें तीं मिथ्या आहेत असें आह्मीं पूर्वींच सांगितलें आहे. समुद्रावर जसे बुडबुडे दिसतात, तशीं ब्रह्माचेठायीं तीं समजावीं. ॥ ७९ ॥ सच्चिदानंदरूप पूर्ण ब्रह्म न्याहाळून पाहिलें असतां नामरूपाची अवज्ञा आपोआप हळूहळू होते. ॥ ८० ॥ जसजशी नामरूपाची अवज्ञा होईल तसतसें अद्वैतदर्शन अधिक अधिक होत जातें, आणि जसजसें अद्वैत दर्शन अधिक अधिक स्पष्ट होत जातें, तसतशीं नामरूपें भासेनातशीं होतात. ॥ ८१ ॥ या आभ्या-साच्या योगानें ज्ञान दृढ झालें असतां मनुष्य जीवंत असतांच मुक्त होतो. मग त्याचा देह असला तरी चिंता नाहीं ॥ ८२ ॥ शिष्य—ब्रह्माभ्यास ह्मणजे काय ? गु०—सदा-सर्वदां ब्रह्मतत्त्वाचेंच चिंतन; त्याचेंच कथन; परस्पर त्याचाच बोध; असें जें एकपरत्व त्यास पंडित ब्रह्माभ्यास असें ह्मणतात. ॥ ८३ ॥ हा द्वैतसंस्कार फार दिवसांपासून चालत अस-ल्यामुळें आस्थेनें फार दिवस अभ्यास केला तरच त्याची अगदीं निवृत्ति होते. ॥ ८४ ॥ शि०—एका ब्रह्मापासून हे अनेक आकार कसे उत्पन्न झाले ? गु०—एका ब्रह्मापासून जगदुत्पत्ति होणें जरी युक्तीस विरुद्ध आहे तरी मायेसहित ब्रह्मापासून ती होते असें ह्मण-ण्यास कोणची नड आहे. मातीच्या शक्तीनें जसे अनेक खोटे पदार्थ उत्पन्न होतात तसे ब्रह्मशक्तीपासून हे अनेक आकार उत्पन्न झाले किंवा यापेक्षांही चांगला दृष्टांत निद्रेचा आहे

---

औषध्यन्न वपुष्यपि ॥ एवं विभाव्यं मनसा तत्तद्रूपं यथोचितम् ॥७७॥ अनेकधा विभिन्नेषु नामरूपेषु चैकधा ॥ तिष्ठन्ति सच्चि-दानंदा विसंवादो न कस्यचित् ॥ ७८ ॥ निस्तत्त्वे नामरूपे द्वे जन्मनाशयुते च ते ॥ बुद्ध्या ब्रह्मणि वीक्षस्व समुद्रे बुद्बुदादि-वत् ॥ ७९ ॥ सच्चिदानंदरूपेऽस्मिन्पूर्णे ब्रह्मणि वीक्षिते ॥ स्वय-मेवावजानाति नामरूपे शनैः शनैः ॥८०॥ यावद्यावदवज्ञा स्या-त्तावत्तावत्तदीक्षणम्॥यावद्यावद्वीक्ष्यते तत्तावत्तावदुभे त्यजेत्॥८१॥ तदभ्यासेन विद्यायां सुस्थितायामयं पुमान् ॥ जीवन्नेव भवेन्मु-क्तो वपुरस्तु यथा तथा ॥ ८२ ॥ तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं त-त्प्रबोधनम् ॥ एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥ ८३ ॥ वासनाऽनेककालीना दीर्घकालं निरंतरम् ॥ सादरं चाभ्यस्यमाने सर्वथैव निवर्तते ॥ ८४ ॥ मृच्छक्तिवत् ब्रह्मशक्तिरनेकाननृतान्सृ-जेत् ॥ यद्वा जीवगता निद्रा स्वप्नश्चात्र निदर्शनम् ॥ ८५ ॥

॥ ८५ ॥ जीवाचेठायीं असणारी निद्रा जशी अघटित स्वप्नास उत्पन्न करिते त्याप्रमाणें ही जगदुत्पत्ति ब्रह्माचेठायीं सृष्टिस्थितिलयरूपानें होते ॥ ८६ ॥ स्वप्नामध्यें मनुष्यास काय काय दिसतें आणि काय काय नाहीं याचा कांहीं नेम आहे काय? मी आकाशांत उडत आहें. माझा शिरच्छेद केला असें भलतेंच दिसतें. व एका क्षणांत एक वर्ष गेल्यासारखें वाटतें. पुत्रमित्राचा वियोग होतो. पाहिजे तें दिसतें. ॥ ८७ ॥ यांत युक्तायुक्त विचार ह्मणून मुळींच नाहीं. अमुक गोष्ट योग्य ह्मणतां येत नाहीं व अमुक अयोग्यही ह्मणतां येत नाहीं. जें जें जसें असें असतें तें तें योग्यच ह्मटलें पाहिजे ॥ ८८ ॥ जर एवढ्याशा या निद्राशक्तीचा एवढा मोठा महिमा आहे, तर मायाशक्तीचा महिमा किती अचिंत्य असावा बरें ! ॥ ८९ ॥ पुरुष स्वस्थ निजला असतां निद्राशक्ति नाना प्रकारचें स्वप्न उत्पन्न करिते. त्याप्रमाणें निर्विकार ब्रह्माचेठायीं ही माया विकाराची कल्पना करिते. ॥ ९० ॥ शि०—ते विकार कोणते? गु०—आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, ब्रह्मांड, लोक, प्राणी, शिला इत्यादि सृष्टि. शि० माया ही जड असून तिजपासून सचेतन प्राणी कसे उत्पन्न झाले? गु०—प्राण्याचे शरीराचेठायीं असणारें अंतःकरण स्वच्छ असल्यामुळें त्यामध्यें मूळ चैतन्याचें प्रतिबिंब पडलें आहे ह्मणून तें चैतन्यासारखें दिसतें. परंतु तें वस्तुतः जडच आहे ॥ ९१ ॥ शि० तर मग हा जड चेतन विभाग ब्रह्माचा नव्हे म्हणा. गु०–तो ब्रह्माचा कसा होईल? सच्चिदानंद लक्षण ब्रह्म हें स्थावरजंगमीं सर्वत्र समान आहे. भेद काय तो नामरूपाचा. ॥ ९२ ॥ ज्याप्रमाणें पटावर चित्र असतें त्याप्रमाणें ब्रह्माचेठायीं हीं नामरूपें आहेत. त्यांची उपेक्षा केली असतां तुझी बुद्धि सच्चिदानंदमय होईल. ॥ ९३ ॥ ज्याप्रमाणें पाण्यांत प्रतिबिंबित आपला देह दिसत असूनही

---

निद्राशक्तिर्यथा जीवे दुर्घटस्वप्नकारिणी ॥ ब्रह्मण्येषा स्थिता माया सृष्टिस्थित्यंतकारिणी ॥ ८६ ॥ स्वप्ने वियद्गतिं पश्येत्स्वमूर्द्धच्छेदनं यथा ॥ मुहूर्ते वत्सरौघं च मृतपुत्रादिकं पुनः ॥ ८७ ॥ इदं युक्तमिदं नेति व्यवस्था तत्र दुर्लभा ॥ यथा यथेक्ष्यते यद्यत्तत्तद्युक्तं तथा तथा ॥ ८८ ॥ ईदृशो महिमा दृष्टो निद्राशक्तेर्यदा तदा ॥ मायाशक्तेरचिंत्योऽयं महिमेति किमद्भुतम् ॥ ८९ ॥ शयाने पुरुषे निद्रा स्वप्नं बहुविधं सृजेत् ॥ ब्रह्मण्येवं निर्विकारे विकारान् कल्पयत्यसौ ॥ ९० ॥ खानिलाग्निजलोर्व्यंडलोकप्राणिशिलादिकाः ॥ विकाराः प्राणिधीष्वंतश्चिच्छाया प्रतिबिंबिता ॥ ९१ ॥ चेतनाचेतनेष्वेषु सच्चिदानंदलक्षणम् ॥ समानं ब्रह्म भिद्येते नामरूपे पृथक् पृथक् ॥ ९२ ॥ ब्रह्मण्येते नामरूपे पटे चित्रमिव स्थिते ॥ उपेक्ष्य नामरूपे द्वे सच्चिदानंदधीर्भवेत् ॥ ९३ ॥ जलस्थेऽधोमुखे स्वस्य देहे दृष्टेप्युपेक्ष्य तम् ॥ तीरस्थ एव देहे स्वे

त्याची उपेक्षा करून तीरावर असणारा जो खरा आपला देह त्याविषयीं मात्र सत्यबुद्धि असते. ॥ ९४ ॥ किंवा नाना प्रकारचें मनोराज्य होत असून त्याची जशी मनुष्य उपेक्षा करितो, त्याप्रमाणें नामरूपाची उपेक्षा करावी. ॥ ९५ ॥ हा व्यवहार असा आहे कीं, आतां जें दृष्टीस पडतें तें क्षणांत नाहींसें होतें. आमचें मनोराज्य एका क्षणीं जसें असतें, तसें दुसऱ्या क्षणीं नाहीं. जी कल्पना एकदां झाली ती होऊनच गेली. पुनः ती व्हावयाची नाहीं हा जसा मनांतील व्यवहार तसाच बाह्य जगांतलाही समजावा. ॥ ९६ ॥ तरुणपणीं बाळपण नाहीं, म्हातारपणीं तरुणपण नाहीं, गेलेला बाप पुनः येत नाहीं, आणि गेलेला दिवस गेलाच. ॥ ९७ ॥ ह्या क्षणभंगूर व्यवहारांत व मनोराज्यांत भेद मुळींच नाहीं. याकरितां तो जरी भासला तरी त्याविषयींची सत्य दृष्टि सोडून द्यावी. ॥ ९८ ॥ या व्यवहाराची उपेक्षा केली असतां बुद्धीला निर्विघ्नपणें ब्रह्मचिंतन करितां येतें शि०—मग ज्ञान्यांचा व्यवहार कसा व्हावा? गु०—सोंगाड्या जशी वेषाप्रमाणें बतावणी करितो तसा ज्ञानी निर्वाहापुरता कसा तरी व्यवहार करूं शकतो ॥ ९९ ॥ ज्याप्रमाणें पाण्याचा प्रवाह चालला असतांही त्यांतील मोठी शिला स्थिर राहते, त्याप्रमाणें नामरूपांत कितीही भेद झाला तरी कूटस्थ ब्रह्म आहे तसेंच असतें ॥ १०० ॥ शि०—अखंड ब्रह्माचे ठायीं अगदीं निराळ्या प्रकारचें जग कसें दिसतें? गु०—छिद्ररहित आरशामध्यें सर्व वस्तूंस मावून घेणारें आकाश जसें दिसतें तसें, छिद्ररहित अखंड ब्रह्मामध्यें नानाप्रकारचें जगांस मावून घेणारें आकाश दिसतें ॥ १०१ ॥ शि०—तर मग ब्रह्म मुळींच दिसत नसून केवळ जग मात्र कसें भासतें? गु०—दर्पणाचा पृष्ठभाग जसा नजरेंतून चुकून त्यांतील पदार्थ मात्र भासतात, त्याप्रमाणें सच्चिदानंद ब्रह्म भासत असूनही तें अदृश्य होऊन नामरूपाकडेच चित्त जातें; परंतु वास्तविक पाहतां ब्रह्म आधीं भासल्यावांचून नामरूपें

---

तात्पर्यं स्याद्यथा तथा ॥ ९४ ॥ सहस्रशो मनोराज्ये वर्तमाने सदैव तत् ॥ सर्वैरुपेक्ष्यते यद्वदुपेक्षा नामरूपयोः ॥९५॥ क्षणे क्षणे मनोराज्यं भवत्येवान्यथाऽन्यथा ॥ गतं गतं पुनर्नास्ति व्यवहारो बहिस्तथा ॥९६॥ न बाल्यं यौवने लभ्यं यौवनं स्थाविरे तथा ॥ मृतः पिता पुनर्नास्ति नायात्येव गतं दिनम् ॥९७॥ मनोराज्याद्विशेषः कः क्षणध्वंसिनि लौकिके ॥ अतोऽस्मिन् भासमानेपि तत्सत्यत्वधियं त्यजेत् ॥ ९८ ॥ उपेक्षिते लौकिके धीर्निर्विघ्ना ब्रह्मचिंतने ॥ नटवत्कृत्रिमास्थायां निर्वहत्येव लौकिकम् ॥ ९९ ॥ प्रवहत्यपि नीरेऽधः स्थिरा प्रौढशिला यथा ॥ नामरूपान्यथात्वेपि कूटस्थं ब्रह्म नान्यथा ॥ १०० ॥ निश्छिद्रे दर्पणे भाति वस्तुगर्भं बृहद्वियत् ॥ सच्चिद्घने तथा नाना जगद्गर्भमिदं वियत् ॥ १०१॥ अदृष्ट्वा दर्पणं नैव तदंतस्थेक्षणं तथा ॥ अमत्वा

भासणारच नाहींत असा नियम आहे. ॥ १०२ ॥ शि०–तीं नामरूपें डोळ्यांपुढें असून ब्रह्म कसें पहावें ? गु०– कोणचाही पदार्थ पाहतांना आदि सच्चिदानंदाचा भास होऊन नंतर तो पदार्थ दृष्टीस पडतो. याकरितां जेव्हां जेव्हां तुझी जगाकडे दृष्टि जाते तेव्हां तेव्हां तो भास होतो न होतो इतक्यांतच बुद्धीस ओढून धरून तिला नामरूपाकडे जाऊं देऊं नये. ॥ १०३ ॥ या प्रकारचें हें सच्चिदानंदरूप जगद्रहित एकच ब्रह्म आहे असें सिद्ध झालें. यासच अद्वैतानंद म्हणतात. यामध्यें सर्व लोक सर्वदां रममाण होतात ॥ १०४ ॥ ब्रह्मानंद प्रकरणाच्या या तिसऱ्या अध्यायांत अद्वैतानंद आम्हीं सांगितला. तो जगन्मिथ्यात्व चिंतनानें प्राप्त होतो. ॥ १०५ ॥ इति अद्वैतानंदः समाप्तः

---

सच्चिदानंदनामरूपमतिः कुतः ॥ १०२ ॥ प्रथमं सच्चिदानंदे भासमानेऽथ तावता ॥ बुद्धिं नियम्य नैवोर्ध्वं धारयेन्नामरूपयोः ॥ १०३ ॥ एवं च निर्जगद्ब्रह्म सच्चिदानंदलक्षणम् ॥ अद्वैतानंद एतस्मिन्विश्राम्यंतु जनाश्चिरम् ॥ १०४ ॥ ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे तृतीयोऽध्याय ईरितः ॥ अद्वैतानंद एव स्याज्जगन्मिथ्यात्वचिंतया ॥ १०५ ॥ इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्विद्यारण्यमुनिविरचितो ब्रह्मानंदे अद्वैतानंदो नाम तृतीयोऽध्यायः ॥

# सार्थपंचदश्याम्

## विद्यानन्दः

### चतुर्दशप्रकरणम्

मागील तीन आनंद प्रकरणांत योगाभ्यास, आत्मविवेक आणि द्वैतमिथ्यात्व यांच्या योगानें क्रमेंकरून ब्रह्मानंद अनुभवणाऱ्या पुरुषास जो एक प्रकारचा विद्यानंद होतो तो आह्मी या प्रकरणांत संवादरूपानें सांगतों. ॥ १ ॥ गु०—आतां तुला विद्यानंदाचें स्वरूप सांगतों. विषयानंदाप्रमाणें हा विद्यानंदही बुद्धिवृत्तीपासून होणारा आहे. त्याचे दुःखाभाव आदिकरून चार प्रकार आहेत. ॥ २ ॥ शि०—ते चार प्रकार कोणते? गु०—दुःखभाव, सर्व इच्छेची तृप्ति, कृतकृत्यता आणि प्राप्तप्राप्यता. ॥ ३ ॥ दुःखाचेही दोन प्रकार आहेत. एक ऐहिक आणि दुसरें आमुष्मिक. ऐहिक दुःखाची निवृत्ति बृहदारण्यक श्रुतींत सांगितली आहे. ॥ ४ ॥ शि०—ती श्रुति कोणती? गु०—"आत्मनं चेत्" याचा अभिप्राय असा कीं, आत्मा मी आहें असें जाणणाऱ्या पुरुषांस भोक्तृत्वच मुळीं खोटें ठरल्यानें शरीराचीं दुःखें कशीं होतील? कारण इच्छा करणारा व इच्छिला विषय हे दोन्ही मिथ्या ठरतात. ॥ ५ ॥ शि०—आत्म्याला शोकसंबंध कसा आला? गु०—आत्मे दोन प्रकारचे, जीवात्मा व परमात्मा तीन देहांच्या तादात्म्यानें तो जीव होऊन भोक्ता झाला. ॥ ६ ॥ शि०—परमात्म्याचें स्वरूप सांगा. गु० परमात्मा मूळचा सच्चिदानंदरूप आहे. तो नामरूपाशीं तादात्म्य पावल्यामुळें भोग्य झाला. त्या नामरूपांचा विवेक केला असतां त्याचा भोक्तेपणा आणि भोग्यपणा हीं

श्रीगणेशाय नमः ॥ अथ विद्यानन्दः ॥ योगेनात्मविवेकेन द्वैतमिथ्यात्वचिंतया ॥ ब्रह्मानंदं पश्यतोऽथ विद्यानंदो निरूप्यते ॥ १ ॥ विषयानंदवद्विद्यानंदो धीवृत्तिरूपकः ॥ दुःखाभावादिरूपेण प्रोक्त एष चतुर्विधः ॥ २ ॥ दुःखभावश्च कामाप्तिः कृतकृत्योऽहमित्यसौ ॥ प्राप्तप्राप्योऽहमित्येव चातुर्विध्यमुदाहृतम् ॥ ३ ॥ ऐहिकं चामुष्मिकं चेत्येवं दुःखं द्विधेरितम् ॥ निवृत्तिमैहिकस्याह बृहदारण्यकं वचः ॥ ४ ॥ आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ॥ किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ ५ ॥ जीवात्मा परमात्मा चेत्यात्मा द्विविध ईरितः ॥ चित्तादात्म्यात्रिभिर्देहैर्जीवः सन् भोक्तृतां व्रजेत् ॥ ६ ॥ परमात्मा सच्चिदानंदस्ता-

दोन्हीही नाहींशीं होतात. ॥ ७ ॥ शरीरास ज्वर ह्मणजे संताप झाला असतां तो आपणावर घेण्याचें कारण हें कीं, भोक्त्याकरितां भोग्य विषयाची इच्छा होते. हे ज्वर तीन शरीरांस मात्र आहेत. आत्म्याला मुळींच नाहींत. ॥ ८ ॥ शि०—कोणच्या शरीराला कोणचा ज्वर आहे? गु०—धातुवैषम्यानें ज्या व्याधी होतात ते स्थूल शरीरांतील ज्वर होत. कामक्रोधादिक सूक्ष्म शरीरांतील ज्वर आणि त्या दोहींस कारण जें अज्ञान तें कारण शरीरांतील ज्वर. ॥ ९ ॥ अद्वैतानंद प्रकरणांत जो आह्मीं विवेचनाचा मार्ग सांगितला, तेणेंकरून आत्म्याचें विवेचन केलें असतां वास्तविक भोग्य पदार्थ कोठेंच दिसत नाहीं. मग आत्मवेत्त्यास इच्छा कशाची व्हावी? ॥ १० ॥ शि०—ते ज्वर आत्म्यास कसे लागत नाहींत? गु०—आत्मानंद विवेचन करण्याची जी रीत आह्मीं सांगितली त्या रीतीनें जीवात्म्याचा निश्चय झाला असतां भोक्ता मुळींच नाहींसा होतो. मग ज्वरांचा संबंध कसा लागेल? ॥ ११ ॥ शि०—हें ऐहिक दुःख झालें, आतां आमुष्मिक तें कोणतें? गु०—पुण्यपापाची जी चिंता तेंच आमुष्मिक दुःख. ही चिंता ज्ञान्यास ताप देत नाहीं. अशा अर्थाची श्रुति आह्मीं प्रथमाध्यायीं सांगितली आहे. ॥ १२ ॥ शि०—प्रारब्धकर्माची चिंता नसो, पण आगामी कर्माची तरी बाधा आहे कीं नाहीं? गु०—तीही ज्ञान्यास नाहीं. ज्याप्रमाणें कमलपत्र पाण्यांत असून त्याचा त्यास स्पर्श होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानोत्तर काळीं आगामी कर्माचा संपर्क ज्ञान्यास लागत नाहीं. ॥ १३ ॥ शि०—मग संचित कर्माची व्यवस्था कशी? गु०—ज्याप्रमाणें इषीका तृणांचा कापूस अग्नि लागतांच जळून जातो, त्याप्रमाणें ज्ञान होतांच संचित कर्म जळून जातें. ॥ १४ ॥ याविषयीं गीतेंतही प्रमाण आहे.

---

दात्म्यं नामरूपयोः ॥ गत्वा भोग्यत्वमापन्नस्तद्विवेके तु नोभयम् ॥ ७ ॥ भोग्यमिच्छन् भोक्तुरर्थे शरीरमनुसंज्वरेत् ॥ ज्वरास्त्रिषु शरीरेषु स्थिता न त्वात्मनो ज्वराः ॥ ८ ॥ व्याधयो धातुवैषम्ये स्थूलदेहे स्थिता ज्वराः ॥ कामक्रोधादयः सूक्ष्मे द्वयोर्बीजं तु कारणे ॥ ९ ॥ अद्वैतानंदमार्गेण परात्मनि विवेचिते ॥ अपश्यन्वास्तवं भोग्यं किं नामेच्छेत्परात्मवित् ॥ १० ॥ आत्मानंदोक्तरीत्यास्मिन् जिवात्मन्यवधारिते ॥ भोक्ता नैवास्ति कोप्यत्र शरीरे तु ज्वरः कुतः ॥ ११ ॥ पुण्यपापद्वये चिंता दुःखमामुष्मिकं भवेत् ॥ प्रथमाध्याय एवोक्तं चिंता नैनं तपेदिति ॥ १२ ॥ यथा पुष्करपर्णेऽस्मिन्नपामश्लेषणं तथा ॥ वेदनादूर्ध्वमागामिकर्मणोऽश्लेषणं बुधे ॥ १३ ॥ इषीकातृणतूलस्य वन्हिदाहः क्षणाद्यथा॥ तथा संचितकर्मास्य दग्धं भवति वेदनात् ॥ १४॥ यथैधांसि समिद्धोग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ॥ ज्ञानाग्निः सर्वकर्माणि

ज्याप्रमाणें पेटलेला अग्नि लांकडाची राख करून टाकतो, त्याप्रमाणें हा ज्ञानाग्नि सर्व कर्माचें भस्म करून टाकतो. ॥ १५ ॥ देहादिकांविषयीं ज्याचा अहंभाव अगदीं गेला, ज्याची बुद्धि कर्ममध्यें लिप्त होत नाहीं, त्याच्या हातून लोकांचा जरी मोठा घात झाला तरी तें पाप तो करितो .असें होत नाहीं, व तो त्या कर्मांत बद्ध होत नाहीं. ॥१६॥ शि०—काय असें शास्त्रांत आहे काय ? गु०—शास्त्र तर राहूं द्या, अशाविषयीं श्रुतींतही प्रमाण आहे. तें असें कीं, एकदां निश्चयात्मक ज्ञान होऊन मुक्ति मिळाली असतां मातापितरांचे वध, चोरी, भ्रूणहत्या इत्यादि महा पातकें जरी घडलीं तरी त्याच्या मोक्षास हानि येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याची मुखकांति जशाची तशीच असते. ॥ १७ ॥ शि०—हा दुःखाभाव झाला, आतां सर्व कामाची प्राप्ति ती कशी ? गु०—तीही श्रुतींतच सांगितली आहे. ब्रह्मवेत्त्यास सर्व कामाची प्राप्ति होऊन तो अमृत होतो अशा अर्थाची श्रुति आहे. ॥ १८ ॥ ब्रह्मवेत्ता खावो, पिवो, खेळो, स्त्रियांबरोबर रममाण होवो, आबालवृद्धांबरोबर क्रीडा करो, त्यानें कांहीं केलें तरी देहाचें स्मरण नसतें. कुडींत प्राण असेपर्यंत पूर्व कर्मांच्या योगानें त्याचें जीवन कसें तरी होतें. ॥ १९ ॥ शि०—कर्मफलाचा भोग आहे असें म्हटल्यावर ज्ञान्यास जन्म आहे असें म्हणावें लागेल. गु०—ज्ञानेंकरून संचितकर्म दग्ध झाल्यामुळें त्याला जन्म नसून सर्व कामाची प्राप्ति होते. श्रोत्रियाचेठायीं जे भोग घडतात त्यांस क्रम म्हणून कांहींच नसतो. जसे प्राप्त होतील तसे तो भोगतो. ॥ २० ॥ तैत्तिरीय श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, तरुण रूपवान्, विद्वान्, निरोगी, दृढमनाचा, ज्याच्या पदरीं पुष्कळ सैन्य आहे, व जो संपत्तीनें पूर्ण अशा पृथ्वीचें पालन करणारा सार्वभौम राजा, त्यास या सर्व मानवी भोगांपासून जो आनंद मिळतो. तो ब्रह्मवेत्त्यास प्राप्त होतो. ॥ २१–२२ ॥ शि०—सार्वभौम राजा आणि ज्ञानी यांच्या वि-

---

भस्मसात्कुरुते तथा ॥ १५ ॥ यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥ हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥१६॥ मातापित्रोर्वधः स्तेयं भ्रूणहत्यान्यदीदृशम् ॥ न मुक्तिं नाशयेत्पापं मुखकांतिर्न नश्यति ॥ १७ ॥ दुःखाभाववदेवास्य सर्वकामाप्तिरीरिता ॥ सर्वान् कामानसावाप्त्वा ह्यमृतो भवदित्यतः ॥ १८ ॥ जक्षन्क्रीडन्रतिं प्राप्तः स्त्रीभिर्यानैस्तथेतरैः ॥ शरीरं न स्मरेत्प्राणः कर्मणा जीवयेदमुम् ॥ १९ ॥ सर्वान्कामान्सहाप्नोति नान्यवज्जन्मकर्मभिः ॥ वर्तंते श्रोत्रिये भोगा युगपत् क्रमवर्जिताः ॥ २० ॥ युवा रूपी च विद्यावान्नीरोगो दृढचित्तवान् ॥ सैन्योपेतः सर्वपृथ्वीं वित्तपूर्णां प्रपालयन् ॥ २१ ॥ सर्वैर्मानुष्यकैर्भोगैः संपन्नस्तृप्तभूमिपः ॥ यमानंदमवाप्नोति ब्रह्मविच्च तमश्नुते ॥ २२ ॥ मर्त्यभोगे द्वयोर्नास्ति कामस्तृप्तिरतः समा ॥ भोगा-

षयप्राप्तीमध्यें साम्यता मुळींच नाहीं असें असून दोघांची तृप्ति सारखी कशी ह्मणतां? गु०—मनुष्यभोगाची इच्छा दोघांलाही राहिली नाहीं. याकरितां या उभयतांचीही तृप्ति सारखीच आहे. एकाला भोगानें तृप्ति आणि दुसऱ्याला विवेकानें. ॥ २३ ॥ शि०—तो विवेक कोणता गु०—वेदशास्त्रांत सांगितलेले विषयभोगांतील दोष ज्ञानी पाहतो, हाच आम्हीं म्हटलेला विवेक. बृहद्रथ राजानें मैत्रायणीय शाखेमध्यें या दोषांचें गाथारूपानें वर्णन केलें आहे ॥ २४ ॥ ते दोष कांहीं देहसंबंधीं, व कांहीं चित्तसंबंधी आणि कांहीं विषयसंबंधीं असे वर्णिले आहेत. शि०—दोषदर्शनानें इच्छा कशी जाते? गु०—कुत्र्याच्या ओकारीवर कोणाची इच्छा जाईल काय? त्याप्रमाणें विवेकी पुरुषास विषय वाटतात. ॥ २५ ॥ शि०—दोघांचीही तृप्ति सारखी झाल्यावर राजापेक्षां ज्ञान्याची प्रतिष्ठा ती काय? गु०—उभयतांची इच्छा तृप्ति जरी सारखी झाली तरी त्यामध्यें भेद आहे. राजाला साधनें मिळविण्याचें दुःख आणि भावी नाशाचें भय असतें ॥ २६ ॥ परंतु ज्ञान्यास तीं दोन्हीही नाहींत. म्हणून ज्ञान्याची योग्यता राजापेक्षां अधिक समजली पाहिजे. शिवाय राजाला सार्वभौमानंद मिळाल्यावर गंधर्वानंदाची आशा राहिलीच, ता ज्ञान्यास नाहीं. ॥ २७ ॥ गंधर्वांचे दोन प्रकार आहेत एक मर्त्यगंधर्व आणि एक देवगंधर्व. या कल्पीं मनुष्य असून कोण्या एका पुण्यपाकविशेषेंकरून गंधर्वत्व पावला असतां त्यास मर्त्यगंधर्व असें म्हणतात. ॥ २८ ॥ आणि पूर्व कल्पीं केलेल्या पुण्यपरिपाकेंकरून या कल्पाच्या आरंभींच गंधर्वत्व पावला असतां त्यास देवगंधर्व असें म्हणतात. ॥ २९ ॥ अग्निष्वात्तादिक जे पितर त्यांस चिरलोक पितर म्हणतात. आणि कल्पाच्या आरंभींच देवपद पावलेल्यास आजानदेवता असें ह्मणतात. ॥ ३० ॥ या कल्पाचेठायीं अश्वमेधादि कर्मेंकरून

---

न्निष्कामतैकस्य परस्यापि विवेकतः ॥ २३ ॥ श्रोत्रियत्वाद्वेदशास्त्रैर्भोगदोषानवेक्षते ॥ राजा बृहद्रथो दोषांस्तान् गाथाभिरुदाहरत् ॥ २४ ॥ देहदोषांश्चित्तदोषान् भोग्यदोषाननेकशः ॥ शुना वांते पायसे नो कामस्तद्वद्विवेकिनः ॥ २५ ॥ निष्कामत्वे समेऽप्यत्र राज्ञः साधनसंचये ॥ दुःखमासीद्भाविनाशादतिभीरनुवर्तते ॥ २६ ॥ नोभयं श्रोत्रियस्यातस्तदानंदोऽधिकोऽन्यतः ॥ गंधर्वानंद आशास्ति राज्ञो नास्ति विवेकिनः ॥ २७ ॥ अस्मिन्कल्पे मनुष्यः सन्पुण्यपाकविशेषतः ॥ गंधर्वत्वं समापन्नो मर्त्यगंधर्व उच्यते ॥ २८ ॥ पूर्वकल्पे कृतात्पुण्यात्कल्पादावेव चेद्भवेत् ॥ गंधर्वत्वं तादृशोऽत्र देवगंधर्व उच्यते ॥ २९ ॥ अग्निष्वात्तादयो लोके पितरश्चिरवासिनः ॥ कल्पादावेव देवत्वं गता आजानदेवताः ॥ ३० ॥ अस्मिन्कल्पेऽश्वमेधादि कर्म कृं-

त्यांणीं आजानदेवांकडून पूजा घेतली त्यांस कर्मदेवता असें ह्मणतात. ॥ ३१ ॥ यम, अग्नि हे मुख्य देव आहेत. इंद्र, बृहस्पति हे तर प्रसिद्धच आहेत. विराट् पुरुषासच प्रजापति ह्मणतात. आणि जो सूत्रात्मा तोच ब्रह्मदेव. ॥ ३२ ॥ याप्रमाणें सार्वभौमापासून सूत्रात्म्यापर्यंत उत्तरोत्तर अधिक अधिक आनंद इच्छिणारे आहेत. या सर्वांहून आत्मानंद श्रेष्ठ आहे. कारण तो वाणीस व मनास अगोचर आहे. ॥ ३३ ॥ कोणताही विषय पूर्णपणें प्राप्त झाला असतां मनुष्यास तो नकोसा होतो. श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठास सार्वभौमादि आनंदाविषयीं अलंबुद्धि असते. त्याअर्थी ते सर्व आनंद त्यास मिळालेच असें समजलें पाहिजे. ॥ ३४ ॥ यालाच सर्वकामाप्ति असें ह्मणतात. किंवा ज्याप्रमाणें स्वदेहाचेठायीं आनंदाकार बुद्धिसाक्षित्वेंकरून ब्रम्हनिष्ठ आनंदी असतो त्याप्रमाणें इतर देहाचेठायींही ज्या सुखाकारवृत्ति होतात त्यांचेंही त्यास साक्षित्व असल्यामुळें तो सदा आनंदीच म्हटला पाहिजे ॥ ३५ ॥ शि०–मग असें साक्षित्व अज्ञान्यास देखील असतें. म्हणून सर्वानंदप्राप्ति त्याला झाली असें म्हणतां येईल कीं काय? गु०–मी सर्व बुद्धीचा साक्षी आहें असें ज्ञान त्यास नसल्यामुळें त्यास ती प्राप्ति नाहीं. यो वेद सोऽश्नुते ( जो जाणेल त्याला मिळेल ) असें श्रुतिप्रमाण आहे. ॥३६॥ अथवा आणखी एका प्रकारें सामवेदांनीं सर्वकामाप्ति गायिली आहे. ती अशी " अहमन्न तथान्नादः " ( अन्नही मीच व अन्न खाणाराही मीच ) असें सार्वात्म्य वर्णिलें आहे. ॥ ३७ ॥ याप्रमाणें दुःखाभाव आणि सर्वकामाप्ति या दोन्हींचें निरूपण केलें. आतां कृतकृत्यत्व आणि प्राप्तप्राप्यत्व यांचा विचार करावयाचा. ॥ ३८ ॥ या दोहींचा विचार आम्हीं

---

त्वा महत्पदम् ॥ अवाप्याजानदेवैर्याः पूज्यास्ताः कर्मदेवताः ॥ ॥ ३१ ॥ यमाग्निमुख्या देवास्युर्ज्ञाताविंद्रबृहस्पती ॥ प्रजापतिर्विराट् प्रोक्तो ब्रह्मा सूत्रात्मनामकः ॥ ३२ ॥ सार्वभौमादिसूत्रांता उत्तरोत्तरगामिनः ॥ अवाङ्मनसगम्योयमात्मानंदस्ततः परः ॥ ३३ ॥ तैस्तैः काम्येषु सर्वेषु सुखेषु श्रोत्रियो यतः ॥ निस्पृहस्तेन सर्वेषामानंदाः संति तस्य ते ॥ ३४ ॥ सर्वकामाप्तिरेषोक्ता यद्वा साक्षिचिदात्मना ॥ स्वदेहवत्सर्वदेहेष्वपि भोगानवेक्ष्यते ॥ ३५ ॥ अज्ञस्याप्येतदस्त्येव न तु तृप्तिरबोधतः ॥ यो वेद सोश्नुते सर्वान्कामानित्यब्रवीच्छ्रुतिः ॥ ३६ ॥ यद्वा सर्वात्मतां स्वस्य साम्ना गायति सर्वदा ॥ अहमन्नं तथान्नादश्चेति सामह्य धीयते ॥ ॥ ३७ ॥ दुःखाभावश्च कामाप्तिरुभे ह्येवं निरूपिते ॥ कृतकृत्यत्वमन्यच्च प्राप्तप्राप्यत्वमीक्षताम् ॥ ३८ ॥ उभयं तृप्तिदीपे हि सम्यगस्माभिरीरितम् ॥ तएवात्रानुसंधेयाः श्लोका बुद्धिविशुद्धये

पूर्वी तृप्तिदीपांत विस्तारेंकरून केला आहे. तेच श्लोक वानकांनीं वाचून पहावे म्हणजे समजेल. ॥ ३९ ॥ *

---

॥ ३९ ॥ ऐहिकामुष्मिकव्रातसिद्धौ मुक्तेश्च सिद्धये ॥ बहुकृत्यं पुरास्याभूत्तत्सर्वमधुना कृतम् ॥ ४० ॥ तदेतत्कृतकृत्यत्वं प्रतियोगिपुरःसरम् ॥ अनुसंदधदेवायमेवं तृप्यति नित्यशः ॥४१॥ दुःखिनोज्ञाः संसरंतु कामं पुत्राद्यपेक्षया ॥ परमानंदपूर्णोहं संसरामि किमिच्छया ॥ ४२ ॥ अनुतिष्ठंतु कर्माणि परलोकयियासवः ॥ सर्वलोकात्मकः कस्मादनुतिष्ठामि किं कथम् ॥ ४३ ॥ व्याचक्षतां ते शास्त्राणि वेदानध्यापयंतु वा ॥ येऽत्राधिकारिणो मे तु नाधिकारोऽक्रियत्वतः ॥४४॥ निद्राभिक्षे स्नानशौचे नेच्छामि न करोभि च ॥ द्रष्टारश्चेत्कल्पयंति किं मे स्यादन्यकल्पनात् ॥ ४५ ॥ गुंजापुंजादि दह्येत नान्यारोपितवन्हिना ॥ नान्यारोपितसंसारधर्मानेवमहं भजे ॥ ४६ ॥ शृण्वंत्वज्ञाततत्त्वास्ते जानन् कस्माच्छृणोम्यहम् ॥ मन्यंतां संशयापन्ना न मन्येहमसंशयः ॥ ४७ ॥ विपर्यस्तो निदिध्यासेत्किं ध्यानमविपर्यये ॥ देहात्मत्वविपर्यासं न कदाचिद्भजाम्यहम् ॥ ४८ ॥ अहं मनुष्य इत्यादिव्यवहारो विनाप्यमुम् ॥ विपर्यासं चिराभ्यस्तवासनातोऽवकल्पते ॥ ४९ ॥ आरब्धकर्मणि क्षीणे व्यवहारो निवर्तते ॥ कर्माक्षये त्वसौ नैव शाम्येध्यानसहस्रतः ॥ ५० ॥ विरलत्वं व्यवहृतेरिष्टं चेध्यानमस्तु ते ॥ अबाधिकां व्यवहृतिं पश्यन्ध्यायाम्यहं कुतः ॥५१॥ विक्षेपो नास्ति यस्मान्मे न समाधिस्ततो मम ॥ विक्षेपो वा समाधिर्वा मनसः स्याद्विकारिणः ॥ ५२ ॥ नित्यानुभवरूपस्य को मेत्रानुभवः पृथक् ॥ कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव निश्चयः ॥ ५३ ॥ व्यवहारो लौकिको वा शास्त्रीयो वान्यथापि वा ॥ ममाकर्तुरलेपस्य यथारब्धं प्रवर्तताम् ॥ ५४ ॥ अथ वा कृतकृत्योपि लोकानुग्रहकाम्यया ॥ शास्त्रीयेनैव मार्गेण वर्तेहं का मम

---

* टीप—तृप्तिदीपांतील २९३–२७०–पर्यंत व २९१–२९७ पर्यंत श्लोक येथें घेतल्यामुळें श्लोक ४० पासून ६४ पर्यंत भाषांतर आम्हीं केलें नाहीं.

याप्रमाणें ब्रह्मानंद प्रकरणाच्या चौथ्या अध्यायांत विद्यानंदाचें निरूपण केलें. तो प्राप्त होई- पर्यंत मुमुक्षूनें त्याचा अभ्यास करावा. ॥ ६५ ॥ इति विद्यानंद समाप्त.

---

क्षतिः ॥ ५५ ॥ देवार्चनस्नानशौचभिक्षादौ वर्ततां वपुः ॥ तारं जपतु वाक् तद्वत्पठत्वाम्नायमस्तकम् ॥ ५६ ॥ विष्णुं ध्यायतु धीर्यद्वा ब्रह्मानंदे विलीयताम् ॥ साक्ष्यहं किंचिदप्यत्र न कुर्वे नापि कारये ॥ ५७ ॥ कृतकृत्यतया तृप्तः प्राप्तप्राप्यतया पुनः ॥ तृप्यन्नेवं स्वमनसा मन्यतेऽसौ निरंतरम्॥५८॥धन्योहं धन्योहं नित्यं स्वात्मानमंजसा वेद्मि॥ धन्योहं धन्योहं ब्रह्मानंदो विभाति मे स्पष्टम् ॥५९॥ धन्योहं धन्योहं दुःखं सांसारिकं न वीक्षेऽद्य॥ धन्योहं धन्योहं स्वस्याज्ञानं पलायितं क्वापि॥६०॥ धन्योहं धन्योहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ॥ धन्योहं धन्योहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम्॥६१॥ धन्योहं धन्योहं तृप्तेर्मे कोपमा भवेल्लोके॥ धन्योहं धन्योहं धन्यो धन्यः पुनः पुनर्धन्यः ॥ ६२ ॥ अहो पुण्यमहो पुण्यं फलितं फलितं दृढम् ॥ अस्य पुण्यस्य संपत्तेरहो वयमहो वयम् ॥६३॥ अहो शास्त्रमहो शास्त्रमहो गुरुरहो गुरुः ॥ अहो ज्ञानमहो ज्ञानमहो सुखमहो सुखम् ॥ ६४ ॥ ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे चतुर्थोऽध्याय ईरितः ॥ विद्यानंदस्तदुत्पत्तिपर्यंतोभ्यास इष्यताम् ॥ ६५ ॥ इति पंचदश्यां विद्यानंदो नाम चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥ १४ ॥

॥ इति विद्यानंदः ॥

---

# सार्थपंचदश्याम्

## ब्रह्मानन्दे विषयानन्दः ।

### पंचदशप्रकरणम् ।

विषयानंद प्रापंचिक असल्यामुळें जरी तो मुमुक्षूस ग्राह्य झाला नाहीं तथापि तो ब्रह्मानंदाचा अंश असल्यामुळें त्याचें निरूपण ब्रह्मज्ञान होण्यास फार उपयोगी आहे. म्हणून तें आह्मी या प्रकरणीं करितों. हा विषयानंद मोक्षाचें द्वार आहे. तो ब्रह्मानंदाचा अंश आहे एतद्विषयीं श्रुतिप्रमाण असें आहे कीं, ॥ १ ॥ " हा जो ब्रह्मनिष्ठाचा अखंडैकरस परमानंद त्याच्याच अंशभूत आनंदाचा उपभोग इतर भूतें घेतात. " असा श्रुत्यर्थ आहे. ॥ २ ॥ आतां विषयानंद ब्रह्मानंदाचाच अंश आहे हें नीट समजावें म्हणून तदुपाधिभूत अंतःकरणाच्या वृत्ति येथें सांगतों. या मताच्या वृत्ति तीन प्रकारच्या आहेत. शांत, घोर आणि मूढ. वैराग्य क्षमा, औदार्य इत्यादि वृत्ति शांत होत. ॥ ३ ॥ तृष्णा, स्नेह, राग, लोभ इत्यादि घोर वृत्ति समजाव्या. आणि मोह भय इत्यादि मूढ वृत्ति होत. ॥ ४ ॥ या सर्व वृत्तीचेठायीं ब्रह्माचा चैतन्यस्वभाव प्रतिबिंबित असतो. परंतु त्याच्या आनंदस्वभावाचें प्रतिबिंब केवळ शांतवृत्तीमध्यें मात्र पडतें. ॥ ५ ॥ यास "रूपं रूपं बभूवासौ प्रतिरूपः" (एकच परमात्मा भिन्न भिन्न रूपाप्रत पावला.) असें श्रुतिप्रमाण आहे. आणि उपमासूर्यक असें व्याससूत्राचें प्रमाण आहे. ॥ ६ ॥ परमात्मा एकच असून उपाधीच्या संपर्कानें, भिन्न भिन्न भूतांचे ठायीं व्यवस्थित होऊन जलप्रतिबिंबित चंद्राप्रमाणें बहुविध रूपांप्रत पावला. अशीही एक श्रुति आहे. ॥ ७ ॥ ज्याप्रमाणें चं-

---

श्रीगणेशाय नमः ॥ अथ विषयानंदः ॥ अथात्र विषयानंदो ब्रह्मानंदांशरूपभाक् ॥ निरूप्यते द्वारभूतस्तदंशत्वं श्रुतिर्जगौ ॥ १ ॥ एषोऽस्य परमानंदो योऽखंडैकरसात्मकः ॥ अन्यानि भूतान्येतस्य मात्रामेवोपभुंजते ॥ २ ॥ शांता घोरास्तथा मूढा मनसो वृत्तयास्त्रिधा ॥ वैराग्यं क्षांतिरौदार्यमित्याद्याः शांतवृत्तयः ॥ ३ ॥ तृष्णा स्नेहो रागलोभावित्याद्या घोरवृत्तयः॥संमोहो भयमित्याद्याः कथिता मूढवृत्तयः ॥४॥वृत्तिष्वेतासु सर्वासु ब्रह्मणश्चित्स्वभवाता॥ प्रतिबिंबति शांतासु सुखं च प्रतिबिंबति॥५॥रूपं रूपं बभूवासौ प्रतिरूप इति श्रुतिः॥उपमा सूर्यकेत्यादि सूत्रयामास सूत्रकृत्॥६॥एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः ॥ एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत् ॥ ७ ॥ जले प्रविष्टश्चंद्रोयमस्पष्टः कलुषे जले ॥ विं-

द्राचें प्रतिबिंब गढूळ पाण्यांत अस्पष्ट, व निर्मलोदकांत स्पष्ट दिसतें, त्याप्रमाणें ब्रह्मही वृत्तीचेठायीं दोन प्रकारें दिसतें. ॥ ८ ॥ घोर व मूढ वृत्ति मलीन असल्यामुळें त्यांत ब्रह्माचा आनंदांश आच्छादित असतो. व किंचित् पारदर्शकता असल्यामुळें त्यांत चैतन्याचें मात्र प्रतिबिंब पडतें. ॥ ९ ॥ अथवा यास् दुसरा एक दृष्टांत आहे. प्रकाश आणि उष्णता असे अग्नीचे दोन स्वभाव असून तापविलेल्या स्वच्छ पाण्यांत त्याचीं उष्णता मात्र उद्भूत होते. पण प्रकाशाचा प्रवेश होत नाहीं. तद्वत् घोर, मूढ वृत्तीचे ठायीं चैतन्य मात्र प्रतिबिंबित होतें. ॥ १० ॥ परंतु लांकडामध्यें उष्णता व प्रकाश असे दोनही धर्म उद्भव पावतात, त्याप्रमाणें शांत वृत्तीमध्यें सुख आणि चैतन्य दोनही ब्रह्माचे स्वभाव अनुभवास येतात. ॥ ११ ॥ ही व्यवस्था कशी केली ह्मणाल तर पदार्थांचे स्वभाव पाहून आह्मीं ती केली. कारण कोणताही नियम बांधणें झाल्यास अनुभवास अनुसरून तो कल्पिला पाहिजे. ॥ १२ ॥ घोर आणि मूढ वृत्तींचे ठायीं सुखानुभव होत नाहीं. शांतवृत्तीमध्यें देखील सुखातिशयाचा अनुभव केव्हां तरी होतो. ॥ १३ ॥ घरदार शेतभात इत्यादिकांविषयीं जेव्हां इच्छा होते, तेव्हां ती रजोगुणापासून उत्पन्न झाली असल्यामुळें तीं घोर वृत्ति होय. ह्मणून तेथें सुख नाहीं. ॥ १४ ॥ याचें कारण असें आहे कीं, सुख मिळेल किंवा नाहीं असा संशय असल्यामुळें दुःख होतें. न मिळालें असतां तें वाढतें. प्रतिबंध झाला असतां क्रोध होतो. किंवा प्रतिकूलतेनें द्वेष उत्पन्न होतो. ॥ १५ ॥ त्याचा परिहार करणें अशक्य झाल्यास विषाद होतो. याचें कारण तमोगुण होय. क्रोधादिकांचेठायीं महा दुःख असल्यामुळें सुखाची शंका देखील नाहीं. ॥ १६ ॥ इच्छिल्या विषयाचा लाभ

---

स्पष्टो निर्मले तद्वद् द्वेधा ब्रह्मापि वृत्तिषु ॥ ८ ॥ घोरमूढासु मालिन्यात्सुखांशश्च तिरोहितः ॥ ईषन्नैर्मल्यतस्तत्र चिदंशप्रतिबिंबनम् ॥ ९ ॥ यद्वाऽपि निर्मले नीरे वन्हेरौष्ण्यस्य संक्रमः ॥ न प्रकाशस्य तद्वत्स्याच्चिन्मात्रोद्भूतिरेव च ॥ १० ॥ काष्ठे त्वौष्ण्यप्रकाशौ द्वावुद्भवं गच्छतो यथा ॥ शांतासु सुखचैतन्ये तथैवोद्भूतिमाप्नुतः ॥ ११ ॥ वस्तुस्वभावमाश्रित्य व्यवस्था तूभयोः समा ॥ अनुभूत्यनुसारेण कल्प्यते हि नियामकम् ॥ १२ ॥ न घोरासु न मूढासु सुखानुभव ईक्ष्यते॥ शांतास्वपि क चित्कश्चित्सुखातिशय ईक्ष्यताम् ॥ १३ ॥ गृहक्षेत्रादिविषये यदा कामो भवेत्तदा ॥ राजसस्यास्य कामस्य घोरत्वात्तत्र नो सुखम् ॥१४॥ सिध्येन्नवेत्यस्ति दुःखमसिद्धौ तद्विवर्द्धते ॥ प्रतिबंधे भवेत् क्रोधो द्वेषो वा प्रतिकूलतः ॥१५॥ अशक्यश्चेत्प्रतीकारो विषादः स्यात्स तामसः ॥ क्रोधादिषु महद्दुःखं सुखशंकापि दूरतः ॥ १६ ॥ का-

लाभ असतां हर्षवृत्ति होते. ही शांतवृत्ति असल्यामुळें त्यांत महत्सुख आहे. भोगामध्यें महत्तर सुख आहे. लाभ होण्याचा प्रसंग दिसल्यास किंचित् सुख होतें. ॥ १७ ॥ विरक्तीचे-ठायीं इच्छेचाच अभाव असल्यानें सर्वांत मोठें सुख आहे. हें सुख विद्यानंद प्रकरणांत सांगितलें आहे. याप्रमाणेंच क्षांतीचेठायीं क्रोधाचा व औदार्याचेठायीं लोभाचा अभाव असल्यामुळें तेथेंही सुख आहे. ॥ १८ ॥ जें जें म्हणून सुख होतें तें तें सर्व ब्रह्माचें प्रतिबिंब असल्यामुळें ब्रह्मच समजलें पाहिजे. हें प्रतिबिंब जेव्हां वृत्ति अंतर्मुख असते तेव्हां निर्विघ्नपणें पडतें. ॥ १९ ॥ सत्ता, चैतन्य, आणि सुख हे तीन ब्रह्माचे स्वभाव आहेत. दगड माती इत्यादि जड पदार्थांत ब्रह्माचा सत्तास्वभाव मात्र व्यक्त होतो. इतर दोन स्वभाव आच्छादित असतात. ॥ २० ॥ घोर आणि मूढ या दोन वृत्तींमध्यें सत्ता आणि चैतन्य हे दोन स्वभाव व्यक्त असतात. आणि शांत वृत्तीमध्यें सत्ता, चैतन्य आणि सुख हे तीन-ही व्यक्त होतात. याप्रमाणें मिश्र ब्रह्म सांगितलें. ॥ २१ ॥ आतां जें अमिश्र म्हणजे शुद्ध ब्रह्म आहे तें ज्ञान आणि योग यांहींकरून समजलें जातें. तें ज्ञान व योग पूर्वींच सांगितले आहेत. प्रथमाध्यायीं म्हणजे ब्रह्मानंद प्रकरणीं योगाचा विचार सांगितला. पुढील दोन अध्यायांत ज्ञान सांगितलें. ॥ २२ ॥ असत्ता जाड्य आणि दुःख हीं तीन मायेचीं रूपें आहेत. नरशृंगादिकांचेठायीं असत्ता पहावी. काष्ठशिलादिकांचेठायीं जाड्य पहावें. ॥ २३ ॥ आणि घोर व मूढ वृत्तिचेठायीं दुःख अनुभवास येतें. याप्रकारें माया पसरली आहे. शांत आदिकरून ज्या बुद्धि-वृत्ति सांगितल्या त्यांशीं ऐक्य पावल्यामुळें मिश्र ब्रह्म असें म्हटलें. ॥ २४ ॥ हें सर्व येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, ब्रह्मध्यान करण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें नरशृंगा-

---

म्यलाभे हर्षवृत्तिः शांता तत्र महत्सुखम् ॥ भोगे महत्तरं लाभ-प्रसक्तावीषदेव हि ॥ १७ ॥ महत्तमं विरक्तौ तु विद्यानन्दे तदी-रितम् ॥ एवं क्षांतौ तथौदार्ये क्रोधलोभनिवारणात् ॥१८॥ यद्य-त्सुखं भवेत्तत्तद्ब्रह्मैव प्रतिबिंबनात् ॥वृत्तिष्वंतर्मुखास्वस्य निर्विघ्नं प्रतिबिंबनम्॥१९॥सत्ता चितिः सुखं चेति स्वभावा ब्रह्मणस्त्रयः॥ मृच्छिलादिषु सत्तैव व्यज्यते नेतरद्वयम् ॥ २० ॥ सत्ता चिति-द्वयं व्यक्तं धीवृत्त्योर्घोरमूढयोः॥शांतवृत्तौ त्रयं व्यक्तं मिश्रं ब्रह्मे-त्थमीरितम् ॥ २१ ॥ अमिश्रं ज्ञानयोगाभ्यां तौ च पूर्वमुदीरितौ॥ आद्येऽध्याये योगचिंता ज्ञानमध्याययोर्द्वयोः ॥ २२ ॥ असत्ता जाड्यदुःखे द्वे मायारूपत्रयं त्विदम् ॥ असत्ता नरशृंगादौ जाड्यं काष्ठशिलादिषु ॥ २३ ॥ घोरमूढधियोर्दुःखमेवं माया विजृंभिता॥ शांतादिबुद्धिवृत्त्यैक्यान्मिश्रं ब्रह्मेति कीर्तितम् ॥ २४ ॥ एवं स्थि-तेऽत्र यो ब्रह्म ध्यातुमिच्छेत्पुमानसौ॥नृशृंगादिमुपेक्षेत शिष्टं ध्या-

दिकांची उपेक्षा करून बाकी उरेल त्याचें ध्यान करावें. ॥ २५ ॥ ह्मणजे असें की, शिला-दिकांचेठायीं नाम आणि रूप हीं दोन वर्ज्य करून केवळ अस्तित्वाचें चिंतन करावें. घोर आणि मूढ या दोन वृत्तींचेठायीं दुःख तेवढें वर्ज्य करून सत्ता आणि चैतन्य याचें ध्यान करावें ॥ २६ ॥ आणि शांतवृत्तीचेठायीं सत्ता, चैतन्य आणि आनंद या तिहींचेंही ध्यान करावें. यांत पहिलें कनिष्ठ, दुसरें मध्यम आणि तिसरें उत्तम प्रतीचें ध्यान समजावें. ॥ २७ ॥ मूढाच्या व्यवहारांत देखील मिश्र ब्रह्माचें उत्कृष्ट चिंतन करतां यावें ह्मणून या प्रकरणीं विषयानंदाचा विचार आह्मीं सांगितला. ॥ २८ ॥ उदासीन स्थितीमध्यें वृत्ति शिथिल असल्यामुळें वासनानंद असतो. तेव्हां जें ब्रह्मध्यान होतें तें उत्तमोत्तम होय. याप्रमाणें चार प्रकारचें ध्यान समजावें. ॥ २९ ॥ हें जें शेवटलें ध्यान सांगितलें त्याला ध्यान ह्मणणें देखील गौणच. कारण ज्ञान आणि योग यांच्या साहाय्यानें ती ब्रह्मविद्याच होते. या ध्यानें-करून चित्ताचें ऐकाग्र्य झालें असतां ती विद्या दृढ होते. ॥ ३० ॥ ती विद्या स्थिर झाली असतां सत्, चित्, आनंद हे तीनही ब्रह्माचे स्वभाव भेदक उपाधि गेल्यामुळें अखंडैकरसा-त्मतेप्रत पावून एकरूप होतात. ॥ ३१ ॥ ते भेदक उपाधि कोणते ह्मणाल तर शांत वृत्ति, घोर वृत्ति आणि शिलादि जड पदार्थ हे होत. योगेंकरून किंवा विवेकेंकरून या उपाधींचा निरास होतो. ॥ ३२ ॥ मग निरुपाधि असें स्वयंप्रकाश ब्रह्मच राहते. तेथें त्रिपुटी नसल्या-मुळें त्यास भूमानंद असें ह्मणतात. ॥ ३३ ॥ याप्रमाणें ब्रह्मानंद प्रकरणाच्या पांचवे अ-ध्यायांत हा विषयानंदाचा विचार सांगितला. या द्वारें अंतरीं प्रवेश करावा. ॥ ३४ ॥ या

---

येद्यथायथम् ॥ २५ ॥ शिलादौ नामरूपे द्वे त्यक्त्वा सन्मात्र-चिंतनम् ॥ त्यक्त्वा दुःखं घोरमूढधियोः सच्चिद्विचिंतनम् ॥२६॥ शांतासु सच्चिदानंदांस्त्रीनप्येवं विचिंतयेत् ॥ कनिष्ठमध्यमोत्कृ-ष्टास्तिस्रश्चिंताः क्रमादिमाः ॥ २७ ॥ मंदस्य व्यवहारेऽपि मिश्र-ब्रह्मणि चिंतनम् ॥ उत्कृष्टं वक्तुमेवात्र विषयानंद ईरितः ॥२८॥ औदासीन्ये तु धीवृत्तेः शैथिल्यादुत्तमोत्तमम् ॥ चिंतनं वासना-नंदे ध्यानमुक्तं चतुर्विधम् ॥ २९ ॥ न ध्यानं ज्ञानयोगाभ्यां ब्र-ह्मविद्यैव सा खलु॥ध्यानेनैकाग्र्यमापन्ने चित्ते विद्या स्थिरीभवेत् ॥ ३० ॥ विद्यायां सच्चिदानंदा अखंडैकरसात्मताम् ॥ प्राप्य भांति न भेदेन भेदकोपाधिवर्जनात् ॥ ३१ ॥ शांता घोराः शि-लाद्याश्च भेदकोपाधयो मताः॥ योगाद्विवेकतो वैषामुपाधीनामपा-कृतिः ॥ ३२ ॥ निरुपाधिब्रह्मतत्त्वे भासमाने स्वयंप्रभे ॥ अद्वैते त्रिपुटी नास्ति भूमानंदोऽत उच्यते ॥ ३३ ॥ ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे पंचमोऽध्याय ईरितः ॥ विषयानंद एतेन द्वारेणांतः प्रविश्यताम्

ब्रह्मानंदेंकरून हरिहर प्रसन्न होवोत व आपल्याठायीं आश्रय पावलेले जे शुद्ध मनाचे प्राणी आहेत त्यांचें संरक्षण करोत. ॥ ३९ ॥

॥ विषयानंदः समाप्तः ॥

---

॥ ३४ ॥ प्रीयाद्धरिर्हरोऽनेन ब्रह्मानंदेन सर्वदा ॥ पायाच्च प्राणिनः सर्वान् स्वाश्रितांश्छुद्धमानसान् ॥ ३५ ॥ इति श्रीविद्या० पंच० ब्रह्मानंदे विषयानंदः ॥ ५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ समाप्तोऽयं ग्रंथः ॥ ६ ॥

